

आलें देवाचिया मना ।
तेथें कोणाचें चालेना ॥
तुकोबा

# विज्ञप्ती.

पुढें छापलेली श्रीतुकाराम महाराजांचे अभंगांची संहिता, संताजी तेली ( सोनवणी ) जगनाडे, चाकणकर याच्या हातच्या वहीवरून घेतली आहे. संताजी जगनाडे हा तुकोबांच्या चौदा टाळकऱ्यांपैकीं एक असून, त्यांचा जिवलग मैत्र होता, हें प्रसिद्ध आहे. या संताजीनें तुकाराम बुवांचे अभंग आपल्या हातानें लिहून ठेवलेले आहेत. तुकारामाच्या अभंगांना नीटनेटकें नागर स्वरूप रामेश्वरभट्टानें दिलें, व मग त्या स्वरूपांत त्यांचा प्रसार सर्वत्र झाला अशी एक आख्यायिका महाराष्ट्रांत ऐकूं येते. ही रामेश्वरभटाची झिलई चढण्यापूर्वींचें अस्सल रूप आपणास या जगनाडी संहितेंत पाहण्यास सांपडेल. तुकाराम महाराजांच्या मुखांतून या बहुमोल अभंगांची वाणी कोणत्या स्वरूपांत प्रगट होई याचाही अंदाज बांधण्यास यापासून मदत होईल.

या गाथेस "तुकाराम बुवांचा अस्सल गाथा" असें म्हटलें आहे. अस्सल ग्रंथ तीन प्रकारचे असूं शकतील. ( १ ) प्रत्यक्ष कवीनें स्वहस्तें लिहिलेले ग्रंथ; ( २ ) कवि स्वमुखानें बोलत असतां ते शब्द उतरून घेऊन तयार केलेले ग्रंथ; व ( ३ ) दुसरे कोणीं केलेली ग्रंथाची प्रत कवीचे नजरेखालून गेलेली आणि त्यानें दुरुस्त केलेली असे ग्रंथ. या तिहींपैकीं या गाथेचें अस्सलपण दुसऱ्या प्रकारचें असण्याचा संभव आहे. कारण ज्या वहीवरून हे अभंग नकल केले ती वही संताजी जगनाडे याचे हातची आहे. संताजीच्या मागें त्याच्या वह्यांच्या वाटण्या झाल्या. त्यांत ही वही एका भाऊबंदाचे वाट्यांत आली आणि पुढें परंपरेनें ही वही संताजीचे हल्लींचें एक वंशज, 'रघुनाथ लक्षुमण जनगाडे तेली' याचे मालकीची झाली. ती त्यानें मजला दिली व त्यावरून नकल करून ही प्रत मीं छापिली. वही अस्सलबरहुकुम कसोशीनें तपासून छापिली आहे. क्षेपक म्हणून जे कित्येक अभंग आज भाविक जनांत रूढ आहेत त्यांतलेही कांहीं अभंग या अस्सल वहींत आहेत ही विचार करण्यासारखी

गोष्ट आहे. या वहीप्रमाणेंच दुसरीही एक संताजीच्या हातची वही तळेगांव-दाभाडे जवळच्या साळुंब्रे या गांवांत संताजीच्या वंशाजाजवळ आहे. इ. स. १९०२ सालीं केसरी वर्तमान पत्रांत व नंतर १९०८ सालीं विश्ववृत्त मासिक पुस्तकांत या वहीची माहिती प्रसिद्ध झाली होती. या पुढें १९१४ मध्यें भा. इ. सं. मंडळाच्या शके १८३४ च्या वृत्तामध्यें रा. पोतदार यानीं त्या वही संबंधीं आणखी माहिती देऊन त्यांतील कांहीं अभंगही छापिले होते. ती वही ज्या वही-वरून मीं हे पुढील अभंग घेतले त्याहून भिन्न होय हें उघड आहे. ती दुसरी वही व हातीं आल्यास आणखी एक तिसरी वही यांतील अभंग पुढें केव्हां तरी छापून या पुस्तकास पुस्ती जोडावी असा विचार आहे.

हे पुढील अभंग छापतांना फिरवाफिरव किंवा बदल केला नाहीं. मात्र मुळांत शब्द तोडलेले नाहींत ते येथें तोडले आहेत. मुळांत प्रत्येक अभंगाचे डोक्यावर 'वीटल' असें लिहिलेलें आहे, येथें तसें न करतां त्या जागीं मीं क्रमांक घातले आहेत. या शिवाय दुसरा फरक केला नाहीं. तुकाराम महाराजांच्या सर्व प्रचलित गाथां-पेक्षां ही गाथा सर्व भाविकांना वंद्य वाटलीच पाहिजे.

थोडे दिवसां पूर्वीं श्री तुकाराम महाराजांच्या प्रत्यक्ष दर्शना साठीं हा लोक सोडून गेलेला माझा लाडका लेक **अनंत** ऊर्फ **सोनू** याचे तर्फे ही तुकाराम महाराजांच्या अभंगवाणीची अस्सल गाथा या अशा स्वरूपांत मी महाराष्ट्राच्या चरणावर वाहतों; आणि हिचा स्वीकार होऊन हा तुकाराम महाराजांच्या अद्भुत वाणीचा गोड प्रसाद महाराष्ट्रांत सर्वांच्या घरोंघर पोंचेल अशी भावना धरतों.

महाराजांचा हा निर्मळ प्रसाद सर्वांच्या मुखीं पाडावा, व माझ्या या मुलाच्या डोक्यावर तुकोब्बानीं कृपाळूपणें आपला हात ठेवावा, अशी रदबदली तुकोबांच्या चरणीं साधुसंतांनीं करावी, येवढीच त्यांस विनंती करितों.

बिंबस्थान ऊर्फ ठाणें.
कार्तिक शु. १ शके १८४१. } **विनायक लक्ष्मण भावे.**

## तुकारामबुवांचा अस्सल गाथा

# प्रस्तावना

तुकारामाच्या अभंगांचे लहान सहान वेचे किंवा कांहीं स्वतंत्र स्फुट प्रकरणें सोडलीं तर सुमारें दहाबारा गाथा आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या आढळतात. त्यांचें एक साधारण टांचण येथें देतों.

| अ. नं. | प्रसिद्धीसाल | ठिकाण | छापखाना | संपादक | अभंगसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | १८६७ | मुंबई | ग. कृष्णाजी | गणपत कृ. | ४५०० |
| २ | १८६९ | मुंबई | इंदुप्रकाश | शंकर पांडुरंग | ४६२१ |
| ३ | १८८६ | ,, | निर्णयसागर | रा. वि. मांडगांवकर | ४६४५ |
| ४ | १८८९ | ,, | सुबोधप्रकाश | तुकारामतात्या | ८४४१ |
| ५ | १९०१ | पुण | इंदिरा | जोग व गुळवे | ४५७५ |
| ६ | १९०३ | मुंबई | पूर्ण चंद्रोदय व इंदुप्रकाश | काशीबाई हेरलेकर | ४४७६ |
| ७ | १९०९ | ,, | जगद्धितेच्छु | विष्णुबुवा जोग | ४१४१ |
| ८ | १९१२ | ,, | निर्णयसागर | वा. ल. पणसीकर | ४५०५ |
| ९ | १९१३ | पुणें | आर्यभूषण | द्रविड | ४०९२ |
| १० | १९१३ | ,, | जगद्धितेच्छु | वि. ना. गोडबोले | ४४९९ |

यां शिवाय कदाचित् आणखी हि आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या असतील. पण त्या माझे पाहण्यांत आलेल्या नाहींत. वरील आवृत्त्यांपैकीं अ. नं. १, २, ७, ९ व १० या पांच गाथा जरा महत्त्वाच्या आहेत. बाकी राहिलेल्या पांच गाथा कोणत्या हि लेखी वहींवरून न छापतां पूर्वीच्या छापील प्रतीवरून च छापलेल्या दिसतात. यांपैकीं बहुतेकांनीं सन १८६९ मध्यें सरकारच्या आश्रया खालीं प्रसिद्ध झालेली विष्णु शास्त्री पंडित यांची च प्रत प्रायः आधार म्हणून घेतलेली आहे. सन १८८९ मध्यें छापलेली तुकाराम तात्या पडवळांची आवृत्ति सर्वांत मोठी व व्यापक अशी झाली आहे. जगद्धितेच्छूमध्यें छापलेल्या नामदेवाच्या गाथे-प्रमाणेंच ही तुकारामाची गाथा अगदीं अव्यवस्थित आहे. हल्लीं कै. तुकारामतात्यांचे चिरंजीव रा. राजाराम तुकाराम हे हि गाथा छापण्याच्या तजविजींत आहेत असें ऐकतों. तरी त्यांनीं कोणा तज्ज्ञाच्या साह्यानें हें काम उरकलें असतां बरें होईल. आतां बाकी राहिलेल्या म्हणजे अ. नं. १, २, ७, ९ व १० या आवृत्त्यां-पैकीं नं. १ म्हणजे मुंबई येथें गणपत कृष्णाजींनीं १८६७ मध्यें छापिलेली आवृत्ती ही

सर्वांत जुनी होय. ही पंढरपूर येथील एका वारकऱ्याच्या वहीवरून उतरून घेऊन छापली आहे. हा वारकरी कोण होता व याचा अधिकार काय होता हा खुलासा या गाथेंत केलेला नाहीं. पण हा कोणी विशेष लक्षांत घेण्यासारखा सर्वमान्य वारकरी असेल असें वाटत नाहीं.

नं. ७ म्हणजे ह. भ. प. विष्णुबुवा जोग यांनीं संपादिलेला गाथा. हा एके दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. विष्णुबुवा हे स्वतः वारकरी असून थोर अधिकारी होते. त्यांना कोणत्या हि मठांतील लेखी वही पाहण्याची सवड होती; व अभंगांच्या लेखी प्रतीची नीट छाननी करण्याचें ज्ञान व बुद्धी हि त्यांना होती. पण हल्लीं लौकिकांत व वारकरी मंडळीचे प्रचारांत कोणता पाठ आहे व त्यांना काय आवडेल यांवर त्यांची नजर असल्यामुळें तुकोबाच्या अस्सल कवित्वाचा सुगावा काढण्याकडे त्यांचें लक्ष्य जावें तितकें गेलें नाहीं. सर्व अभंगांचा सांप्रदायिक अर्थ करून सांगण्याकडे या आवृत्तींत मुख्य लक्ष्य होतें; अस्सल संहितेची छाननी करण्याकडें नव्हतें. याशिवाय त्यांचा जो स्वतंत्र फड होता त्याचा अभिमान त्यांस विशेष होता. या कारणामुळें योग्य छाननी त्यांचे हातून झाली नाहीं. जगनाडी संहिता प्रसिद्ध करण्यापूर्वीं मूळ वह्या बुवांनीं पाहिल्या होत्या. वही संताजी बुवाची म्हणून बुवांनीं आपले गळ्यांतील माळ काढून वहीवर ठेविली आणि वहीस नमस्कार केला. म्हणजे हें मूळ लिखाण संताजीचेंच अशी बुवांची खात्री पटली. नंतर क्षेपक म्हणून त्यांचे गाथ्यांत दिलेले कांहीं अभंग या वहींत आहेत असें त्यांस दाखविलें व क्षेपकत्वाचा दंडक काय मानावा असें हि त्यांस विचारलें. यावर बुवा म्हणाले " दंडक असा कांहीं सांगतां येणार नाहीं. हा अभिमानाचा प्रश्न आहे. आमच्या फडांत हे अभंग आम्ही क्षेपक मानतों. " बुवांच्या या उत्तरांत सर्व कांहीं येतें. यावर जास्त लिहिण्याचें कारण नाहीं, हें उघड आहे.

नं. ९ ही गाथा प्रसिद्ध कादंबरीकार कै. रा. हरिभाऊ आपटे यांच्या सल्ल्यानें रा. द्रविड यांनीं आर्यभूषणमध्यें छापिली आहे. ही प्रत पंढरपूर येथील प्रल्हादबुवा बडव्यांच्या वहीप्रमाणें संपादली आहे. हिला ह. भ. प. गंगुतात्या शिरवळकरांच्या पोथीचा आधार घेतला आहे. ही गंगुतात्यांची म्हणजेच पंढरपूरची प्रत किंवा हिची एक नक्कल इंदुप्रकाशच्या सरकारी प्रतीच्या संपादकांनीं पाहिलेली होती असें दिसतें. या संबंधें ते म्हणतात कीं "It is very recent; and the original Abhangas are here and there found modernized in it. It is in general less accurate &c. &c." हें ज्यावरून ही प्रत तयार केली त्यासंबंधें झालें. अर्थात् या मूळ प्रतीला आधार काय याचा खुलासा कोठें हि नाहीं. तुकारामबुवांच्या आदि उगमाच्या दिशेकडे कोठपर्यंत या प्रतीची परंपरा जाऊन भिडते याचा शोध करण्याची आवश्यकता रा. द्रविड किंवा रा.

आपटे यांपैकीं कोणास हि वाटलेली दिसत नाहीं; व ह. भ. प. गंगुतात्या शिरवळकरांच्या वहीपलिकडे ते गेले नाहींत. ही वही फार तर दोनशें वर्षांची जुनी असावी असें म्हणतात. नं १० ची म्हणजे रा. रा. गोडबोले यानीं संपादिलेली व जगद्धितेच्छुमध्यें छापलेली गाथा. ही ह. भ. प. देहूकर महाराज भागवतबुवा बेलापूरकर व वासकर यांच्या फडांतील वारकरी सांप्रदायिक गाथा यांच्या आधारें छापली आहे. ही ज्या वहीवरून छापली तीस माळ्यांची वही असें म्हणतात. ही गाथा मूळ लेखी पोथीप्रमाणेंच छापली असेल तर ती मूळलेखी प्रत फार जुनी आहे असें दिसत नाहीं, व हिची हि परंपरा कोठपर्यंत पोचते हें प्रकाशकांनीं दिलेलें नाहीं. मात्र वर उल्लेखिलेली 'बडव्यांची वही' व ही 'माळ्यांची वही' या दोन्ही हि वह्या वारकऱ्यांस मान्य आहेत, आणि त्यांचे पाठ या वह्याप्रमाणेंच म्हणण्याचा परिपाठ आहे.

आतांपर्यंत वर उल्लेखिलेल्या सर्व गाथा थोड्या फार सुधारून छापल्या आहेत. मूळ लिखाण जसेंच्या तसेंच छापावें ही दृष्टि यांपैकीं कोणाची हि नव्हती. आपण ज्या आधारानें गाथा तयार करतों आहों त्या आधाराची योग्यता काय, त्याचा आदि उगम कोठें, वगैरे गोष्टींकडे कोणा हि संपादकानें चाणाक्षपणानें पाहिलें नाहीं; व तसें पाहण्याची कल्पना हि कोणाला शिवलेली दिसत नाहीं. अर्थात् जी दृष्टि च नाहीं व ज्या दृष्टींची आवश्यकता व कल्पना हि संपादकांना आली नाहीं त्या दृष्टीनें या सर्व प्रकाशनाची महती फारशी राखली गेली नाहीं हें साहजीक च झालें. आतां राहतां राहिली सरकारी इंदुप्रकाशी गाथा. हिचा विचार थोड्या विस्तारानें करणें अवश्य आहे.

नं. २ ही मुंबई सरकारच्या आश्रयानें 'इंदुप्रकाश'च्या माजी मालकांनीं इ. स. १८६९ मध्यें म्हणजे शके १७९१ मध्यें छापली. हिजकरतां सरकारनें चोवीस हजार रुपये खर्च केले असें म्हणतात. ही तुकारामाच्या अभंगांची आवृत्ति त्या काळच्या पुस्तकप्रकाशनाचा उत्तम मासला आहे. अव्वल इंग्रजींतल्या प्रकाशकांच्या मामुली रिवाजाप्रमाणें प्रथम इंग्रजी व नंतर पुन्हां मराठी अशीं दोन मुखपृष्ठें व असे च दोन भाषांतील दोन प्रारंभाचे लेख आणि एखाद्या बड्या इंग्रजी अधिकाऱ्याला अर्पणपत्रिका हे तत्कालीन प्रकार या पुस्तकांत आहेत; आणि एकंदरीच्या मानानें फार मेहनतीनें, काळजीपूर्वक निरनिराळे पाठभेद देऊन हा ग्रंथ तयार केला आहे. या प्रतीला प्रायः इंदुप्रकाशची प्रत किंवा रा.ब. शंकर पांडुरंग पंडितांची प्रत असें म्हणतात. पण रा. ब. शंकररावांचें ही प्रत तयार करण्यांत केवळ देखरेखीपलिकडे कांहीं विशेष अंग असेल असें या ग्रंथावरून दिसत नाहीं. ही प्रत वास्तविक पाहतां कै. विष्णु परशराम शास्त्री पंडित यांनीं शं. पां. पंडितांच्या "साह्यानें

**शुद्ध करून** छापण्याकरतां तयार केली[1] " असें हिच्या मुखपृष्ठावरच म्हटलें आहे; आणि हिला रा. ब. गाडगिळांनीं एक तुकारामाचें चरित्र इंग्रजींत लिहून जोडलें आहे. दुसरें एक मराठी चरित्र हि दिलें आहे. तें इंग्रजी चरित्राचें भाषांतर नाहीं व तें कोणीं लिहिलें आहे हें हि यांत दिलें नाहीं. पण आज ज्या दृष्टीनें ही प्रत आपण पहात आहों त्या दृष्टीनें, या दोन्ही चरित्रांपेक्षां विशेष महत्त्वाची अशी सुमारें दीड पृष्ठांची अशी एक गुणदोषविवेचनात्मक इंग्रजी प्रस्तावना– critical preface– याला प्रारंभीं जोडली आहे. ही कोणीं लिहिली याचा हि खुलासा यांत कोठें नाहीं. या प्रस्तावनेंत ही प्रत तयार करण्याकरतां कोणकोणत्या हस्तलिखित प्रती गोळा केल्या होत्या व त्या प्रत्येक हस्तलिखित प्रतीची, संपादकांचे दृष्टीनें, किंमत काय वगैरे फार महत्त्वाच्या बाबींचा यांत खुलासा केला आहे.

ही प्रत तयार करतांना एक **देहू** येथील, दुसरी **तळेगांव** येथील, तिसरी **पंढरपूर** येथील व चौथी **कडुस** येथील कोणा मवाळ नांवाच्या ब्राह्मण कुटुंबांतील, अशा चार हस्तलिखित प्रती मिळविल्या होत्या. दुर्दैवानें लांबी, रुंदी, आकार, ओळी वगैरे देऊन या चोहोंपैकीं एका हि प्रतीचें वर्णन संपादकांनीं दिलें नाहीं. किंवा पुढें या प्रतींचें काय केलें हें हि ते सांगत नाहींत. तसें केलें असतें तर हल्लीं यांनीं उपयोगांत आणिलेल्या प्रती हुडकून काढण्यास आपणास ठीक पडलें असतें. तसेंच या प्रस्तावनेच्या शेवटच्या वाक्यांत उल्लेखिलेल्या सरकारी सूचनेची म्हणजे faithfully to reproduce the text of Tukaram and not to leave out any word or verse, even when it appeared indecent या इषारतीची खोंच या संपादकांच्या मुळींच लक्षांत आलेली दिसत नाहीं. शक्य तो यत्न करून तुकारामाच्या कवनाचें अस्सल वळण, तें कसें हि असलें तरी, तसेंच कायम ठेवावयाचें, ही महत्त्वाची बाब लक्षांत न घेतां, हातीं आलेल्या प्रती आपल्या अक्कलेप्रमाणें मखलाशी लढवून 'शुद्ध करण्याच्या' भानगडींत हे संपादक पडले आहेत. या करण्यानें अस्सलपणाच्या दृष्टीनें हा ग्रंथ किती कवडीमोल झाला आहे, हें ज्याला शिवकालीन मराठी हस्तलेखांचा थोडासा तरी परिचय आहे त्याच्या सहज लक्षांत येईल. इतकेंच नव्हे तर आपल्या हातीं आलेल्या हस्तलिखित प्रतींपैकीं कोणती प्रत जास्त महत्त्वाची आहे हें हि या विद्वान् संपादकांच्या ध्यानांत आलेलें दिसत नाहीं. या हस्तलिखित प्रतींपैकीं **पहिली प्रत देहू येथील.** संपादक लिहितात, ही प्रत महादेवबावांच्या हातची आहे असें म्हणतात, व यावरून ही दोनशें वर्षां-

---

[1] असें मराठी मुखपृष्ठावर आहे. इंग्रजी मुखपृष्ठावर 'साह्यानें' याबद्दल under the supervision of असें म्हटलें आहे.

पूर्वीची असावी असें वाटतें. 'महादेव बोवाच्या हातची' या लोकवार्ते पलिकडे या प्रतीचा काल ठरविणारा दुसरा कोणता हि पुरावा संपादक या ठिकाणीं देत नाहींत.!

क्षणभर असें मानूं कीं, ही प्रत महादेवबावाचे हातची होती. तरी देखील काय झालें ? महादेव बावा हे कधीं जन्मले तो शक नक्की मला माहीत नाहीं. पण तुकोबांच्या देहावसानकालीं महादेव बावाचें वय फार तर सतरा अठरा वर्षांचें असलें पाहिजे. शिवाय ह्या मुलाचा विशेष ओढा भक्तिमार्गाकडे होता असें दिसत नाहीं. तेव्हां यानें अभंग उतरून घेतले असले तरी ते तुकोबाच्या मरणानंतर घेतले असले पाहिजेत. या देहू–प्रतीसंबंधें संपादक आणखी असें लिहितात कीं, ही प्रत एकाच हस्ताक्षरानें लिहिलेली नसून हींत एकापेक्षां जास्त अशीं भिन्न भिन्न हस्ताक्षरें आढळतात. शिवाय या प्रतींतील शब्द तोडलेले आहेत ( words have been separated by spaces) आणि हिचें लिखाण शुद्धलेखनाच्या ( इ. सन १८६९ मधील ! ) सर्वमान्य नियमांप्रमाणें बिनचूक आहे. मला वाटतें कीं, यावर लिहिलेल्या बाबी ही वही अगदीं अलिकडली आहे हें निभ्रांतपणें सिद्ध करण्यास पुरेशा आहेत. पण आधुनिकत्व, अर्वाचीनत्व दर्शविणारे हे पुरावे संपादकांच्या मुळींच लक्षांत आलेले नाहींत; व या प्रतीचें जुनाटपण ठरविण्यासारखा इतर कोणता हि पुरावा संपादक देत नाहींत. म्हणजे अक्षरांचें वळण, शब्दांचीं रूपें, लेखनपद्धती वगैरे अनेक लक्षणांपैकीं एक हि प्राचीनत्व सिद्ध करणारें लक्षण संपादकांच्या डोळ्यांस दिसलें नाहीं. किंवा या लक्षणांची ओळख या संपादकास मुळींच नसावी असें हि म्हणण्यास हरकत नाहीं. एकंदर मराठी हस्तलिखित ग्रंथ अशुद्ध व निष्काळजीपणानें लिहिलेले असल्याचा, जो एक सरसकट शेरा या प्रस्तावनेंत मारला आहे त्यावरून तर चांगले मराठी बालबोध लेख या संपादकांच्या नजरेखालून गेलेले हि दिसत नाहींत.

पंढरपुरास जनाबाईची खाट व घोंगडी तेथील पुजारी भाविक वारकऱ्यांस नेहमीं दाखवितात. त्या वस्तूंत जसें वारंवार जुनेंनवें होतें त्याच प्रकारचें जुनेंनवें देहूस दाखविल्या जाणाऱ्या तुकोबांच्या वह्यांत होत असावें असें दिसतें. यामुळें ही विवक्षित प्रत प्रत्यक्ष पुढें असल्याशिवाय हिजबद्दल कोणतें हि विधान निश्चयानें करणें नीट नाहीं. महादेवबावानें तुकोबाचे अभंग लिहिलेले असते तर महिपतीला ही गोष्ट खास कळली असती; व तो तसा उल्लेख आपले ग्रंथांत अवश्य करता. क्षणभर महादेवबावानीं अभंग लिहिले असें हि धरलें तरी ते तुकाराम महाराजांचे हयातींतच लिहिले किंवा त्यांच्या पश्चात् कोणा एखाद्याच्या वहीवरून किंवा स्मरणावरून लिहिले हें कळण्यास मार्ग नाहीं. एकंदरींत ही देहूची हस्तलिखित प्रत एक–हातानें लिहिलेली नसून तींत एकापेक्षां जास्त वळणें आहेत, असें संपादक लिहितात. शिवाय, या प्रतींत दुरुस्त्या हि केलेल्या आहेत. म्हणजे मूळ प्रत अगदीं

निर्भेळ अस्सल व शुद्ध नसून तींत दुरुस्ती करणें हें त्या लेखकास अवश्य वाटलें होतें. या अशा अंतस्थ बाबींवरून या गाथेच्या संपादकांस देहू येथें मिळालेली प्रत बावनकशी नसून फार कमी दर्जाची होती हें उघड दिसतें.

**दुसरी प्रत तळेगांवची.** ही कोणा त्रिंबक कासार नांवाच्या एका वारकऱ्यानें लिहून ठेविलेली प्रत होय. यानें चाळीस वर्षें हे अभंग मिळविण्यांत, क्रमवार लावण्यांत व लिहिण्यांत घालविलीं. अर्थात् अभंग मिळाले तसे उतरून न घेतां त्रिंबकानें आपल्यास योग्य वाटली तशी ढवळाढवळ करून ही प्रत तयार केली. हिजवर १७०९ हा शक एका पृष्ठावर दिला आहे. अर्थात् ही प्रत अगदींच अलिकडली आहे हें उघड आहे. त्रिंबक कासारानें मेहनत घेऊन ही नीटनेटकी लिहिली असल्यामुळें हिचाच मुख्यत्वेंकरून उपयोग करणें छापील गाथेच्या संपादकांस फार सोयीचें, कमी मेहनतीचें व साधारणपणें सोपें असें वाटलें; आणि याच प्रतीवर सर्वांत जास्त भिस्त ठेवून त्यांनीं मुख्यत्वेंकरून हिचाच अनुवाद केला. मात्र वादग्रस्त ठिकाणीं देहू येथील प्रतीस जास्त महत्त्व दिलें असें ते आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात.

**तिसरी प्रत पंढरपूरची.** ही गंगुतात्यांनीं दुरुस्त केलेली आहे. म्हणजे ही अस्सल बरहुकुम नाहीं. गंगुतात्यांनीं आपल्या मठांतील वारकऱ्यांच्या मताप्रमाणें दुरुस्ती किंवा फेरबदल करून ही प्रत तयार केली; आणि ही इतर मठांतून हि 'दुरुस्त' केली गेली. या सर्वांनीं प्रत शुद्ध करण्याच्या मिषानें भोळेपणानें व आपआपल्या फडांतील सांप्रदायाच्या अभिमानानें काय काय प्रकार केले असतील याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. शिवाय ही प्रत म्हणजे पंढरपूर येथील गाथ्याची एक अलिकडील नक्कल आहे. या प्रतीबद्दल प्रस्तावनेच्या पहिल्या पृष्ठाचे शेवटीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, यांतील अभंग 'अर्वाचीन केलेले' ( modernized ) आहेत; व ही प्रत दुसऱ्या दोन्ही प्रतींच्या मानानें पाहतां कमी शुद्ध आहे. या प्रतीचा उल्लेख वर नं. ९ची छापील गाथा वर्णन करतांना त्यांत आलाच आहे. अस्सलपणाच्या दृष्टीनें तरी या प्रतीची किंमत फार अल्प आहे हें उघड आहे. ह्याबद्दल आतां आणखी लिहिण्याचें कारण दिसत नाहीं.

**चौथी** म्हणजे **कडूस** येथील प्रत. ही चौदा टाळकऱ्यांपैकीं गंगारामबुवा मवाळ यांचे येथील प्रत होय. प्रत म्हणण्यापेक्षां 'एक वही' असें म्हणणें सत्याला जास्त धरून होईल. कारण, संपादकांना सर्व वह्या न मिळतां मवाळाकडून एकच वही, आणि ती हि कांहीं दिवस मिळालेली दिसते. हिचा भाग १ पृ. ७४२ अभंग २२४७ या छापील गाथ्याच्या दोन्ही भागांत मिळून पृ. १२९ तें पृ. ३२४ म्हणजे सुमारें दोनशें पृष्ठांपुरताच अधून मधून कांहीं पाठभेद दाखल करण्यापुरतां उपयोग केलेला दिसतो. पण संपादकांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांना मिळालेल्या कडूस

येथील वहींतील अक्षराचें वळण सर्वभर येथून तेथून एक नसून कांहीं ठिकाणीं भिन्न भिन्न आहे. म्हणजे ही हि प्रत सर्व गंगारामबुवा मवाळ यांचेच हातची अस्सल असेल असें दिसत नाहीं. मवाळांच्या येथें असलेल्या वहीला अजून हि ते ओंवळ्यानें शिवून देत नाहींत. तेव्हां त्यावेळीं तरी त्यांनीं त्यांच्या येथील अस्सल प्रत या संपादकांचे स्वाधीन केली असेल असें मुळींच वाटत नाहीं. फार तर एखादी नक्कल त्यांनीं यांना कांहीं दिवस दिली असावी. कोणी सरकारी नोकरामार्फत हस्तलेख मिळवण्याचा यत्न केला असतां महाराष्ट्रांत काय काय प्रकार घडतात याचा अनुभव संशोधकांना आहे च. मवाळांच्या प्रतीसंबंधें पुढें थोडें लिहावयाचें आहे च; तेव्हां तूर्त इतकेंच म्हणून ठेवतों कीं, मवाळांकडील अस्सल प्रत या गाथेच्या संपादकांस मिळालेली दिसत नाहीं; आणि कदाचित् ती मिळाली असली तरी तिचें महत्त्व त्यांचे मनांत नीटसें उतरलें नाहीं, व तिचा योग्य उपयोग त्यांनीं करून हि घेतला नाहीं.

हें सर्व ज्या लेखी प्रतींवरून ही गाथा तयार केली त्यांबद्दल झालें. यावरून तुकोबाची अस्सल प्रत या गाथेच्या संपादकांच्या पुढें नव्हती हें उघड आहे. आतां ही गाथा ज्या रूपांत छापली गेली आहे त्याबद्दल इतकें च म्हणावयाचें आहे कीं, यांतील शब्द व शब्दांचीं रूपें पार पालटून अर्वाचीन केलीं गेलीं आहेत. तसें च या प्रतीच्या प्रकाशकांनीं मूळ अभंगांचे लेखन हि आपले समजुतीप्रमाणें सुधारून व दुरुस्त करून शुद्ध केलें आहे.

या सरकारी इंदुप्रकाशमुद्रित गाथेसंबंधें च नव्हे तर मीं छापिलेल्या गाथेशिवाय करून एकंदर सर्व छापील गाथांसंबंधें असें विधान करणें अवश्य आहे कीं, तुकारामाच्या वेळचे अस्सल शब्द व शब्दांचीं त्या वेळचीं अस्सल रूपें हीं मिळवून कायम ठेवण्याकडे एका हि संपादकानें नीट नजर ठेविली नाहीं. मृत भाषा व जिवंत भाषा यांच्या व्याकरणांत व शुद्धाशुद्धतेंत नेहमीं फरक असतो. जिवंत भाषेचें व्याकरण हें काल आणि स्थल यांनीं परिच्छिन्न व नियमित असतें. जो शब्द आज आपण जसा लिहिणें शुद्ध समजतों तसा तो पूर्वी हि समजला जात असेल असें नाहीं. उदाहरणार्थ, तंव हा शब्द शिवकालीन कोणत्या हि पोथींत तंवं म्हणजे दोन्ही अक्षरांवरअनुस्वार देऊनच लिहिलेला आढळेल. तसा तो ज्या पोथींत आढळणार नाहीं ती पोथी शिवकालीन नाहीं असें खास समजावें. ही एक बाब झाली. अशा लहान लहान अनेक बाबी सांगतां येण्यासारख्या आहेत. यांचें टिपण येथें देण्यापेक्षां मराठी भाषेच्या व्याकरणाचा व लेखनाचा इतिहास लिहितांना च देणें योग्य आहे. कोणी विद्वानानें गेल्या सात आठ शतकांचा हा असा इतिहास लिहिल्यास तो एक वाचण्याजोगा व मनन करण्याजोगा ग्रंथ होईल. असो.

तसें च एकाच नदीचें पाणी ती निरनिराळ्या प्रांतांतून वाहात जात असतां थोडेंसें निराळें दिसतें; त्याप्रमाणें एकाच शब्दाचे उच्चार वेगवेगळे केलेले ऐकू

येतात. हवा, पाणी व भोंवतालची स्थिति यांचा मनुष्याच्या आवाजावर अथवा बोलण्यावर म्हणजे च उच्चारावर अवश्य परिणाम होतो. कोंकणांतलीं कुटुंबें घाटावर गेलीं म्हणजे त्यांचे अनुनासिक उच्चार कमी कमी होऊं लागतात हा नेहमींचा अनुभव आहे. म्हणजे च निरनिराळ्या प्रांतांतलें शुद्धलेखन निरनिराळें असतें आणि तें त्या त्या प्रांतांतील शिष्ट लोकांच्या लिखाणावरून ठरवावयाचें असतें. हें च म्हणणें लौकिक भाषेंत लोक 'बारा कोसांवर भाषा बदलते' या वाक्यानें म्हणतात. अर्थात् तुकोबाची अस्सल संहिता, तुकोबाच्या काळच्या व तुकोबाच्या प्रांतांतल्या म्हणजे चाकणचैऱ्यांशींतल्या शुद्धलेखनानुसार अवश्य असली पाहिजे हें उघड आहे.

येथपर्यंत तुकाराम महाराजांच्या छापील ग्रंथांसंबंधीं जें कांहीं सांगण्यासारखें होतें तें सांगितलें. आतां त्यांच्या अभंगांच्या हस्तलिखित प्रतींच्या संबंधें थोडेंसें सांगतों.

तुकाराम महाराजांच्या घरीं म्हणजे देहूस तुकाराम महाराजांच्या स्वदस्तुरच्या वह्या त्यांचे वंशज भाविक वारकऱ्यांस दाखवितात; व पाण्यांत अठरा दिवसांनीं तरून वर आल्या त्या याच वह्या असें ते सांगतात. पण या वह्या तुकारामाच्या हातच्या असल्याचा कोणता हि पुरावा सदरहू वह्यांत नाहीं; व थोड्या चौकशीनें तपासल्या असतां या वह्या तुकारामबुवांच्या हातच्या नसाव्यात असें च वाटूं लागतें. साधारणपणें इतर वारकरी लोकांना दाखवितात त्यांपेक्षां अगदीं भिन्न अशी एक वही देहूस तुकारामाच्या वंशजांकडे आहे, असें रा. पांगारकर यांनीं मला सांगितलें. या वहींतील एका पृष्ठाचा फोटो हि त्यांनीं आपले तुकाराम–चरित्रांत दिला आहे. हें अक्षर तुकारामकालीन असावें असें तो फोटो पाहून माझें मत झालें आहे. पण तेवढ्यावरून ती वही तुकारामानें च आपल्या हातानें लिहिलेली आहे असें मात्र मानतां येत नाहीं. मजजवळील तुकारामाच्या हस्ताक्षराचें वळण व ह्या वहींतील अक्षराचें वळण निराळें आहे. तुकारामास लिहितां येत होतें[1] हें अगदीं निःसंशय आहे. परंतु स्वतःचेंच कवित्व तो लिहून ठेवीत असेल असें वाटत नाहीं. तो कीर्तनांत उभा राहिला म्हणजे तेथल्या तेथें च अभंग रचून म्हणे[2] व ते टाळकरी पाठ करीत किंवा मागाहून लिहून ठेवीत; असा क्रम असावा. म्हणजे तुकारामानें स्वहस्तें लिहून ठेविलेल्या

---

१ बालबोध अक्षरें लिहावीं पाहीं । हा मागें अभ्यास नव्हता कांहीं । कोऱ्या कागदांची करूनि वही । **स्वमती लिही आपुल्या ॥**

२ याच्या उलट 'घे गे बाईले लिहिलें' इ. अभंग आहेत.

त्याच्या अभंगांच्या वह्या तेव्हां नव्हत्या व हल्लीं हि त्या उपलब्ध नाहींत; आणि पुढें हि त्या तशा उपलब्ध होण्याचा संभव दिसत नाहीं. अर्थात् तुकारामाच्या अभंगांची अस्सल संहिता त्याच्या कोणा ना कोणा तरी तत्कालीन लेखकाचे हातची च असली पाहिजे हें उघड आहे.

तुकाराम बोवांच्या कवित्वलेखनाचें काम रामेश्वरभट व गंगाराम मवाळ किंवा संताजी तेली यांपैकीं कोणीं तरी एकानें किंवा या सर्वांनीं केलें असावें असें म्हणतात. या तिघांशिवाय अंबाजी लोहगांवकराचा ओझरता उल्लेख कचेश्वरानें आपल्या चारित्रांत केलेला आहे. तो म्हणतो, 'खेटक ग्रामीं-खेड येथें-अंबाजीच्या घरीं तुकोबाच्या वह्या आहेत. तेथें जाऊन त्या वाचाव्या असें मला नारायणानें सांगितलें.'[1] कचेश्वर हा शके १५६३ मध्यें वारला; तो नुसतें अंबाजी इतकें च म्हणतो. येवढ्यावरून हा अंबाजी लोहगांवकर च असावा असें म्हणतां येत नाहीं. कारण तुकारामशिष्य अंबाजी लोहगांवकराचें घर खेड येथें कधीं असल्याची माहिती मिळत नाहीं; व क्षणभर अंबाजी म्हणजे आंबाजी लोहगांवकर असें हि मानलें तरी या वेळीं अंबाजी स्वतः हयात होता असें हि म्हटलेलें नाहीं. फार तर त्याचे कोणी वंशज असतील. आणि तसें हि असलें तरी त्या वह्या अंबाजीच्या हातच्या च होत्या अथवा इतर कोणीं तरी नक्कल करून ठेवलेल्या होत्या याचा खुलासा कचेश्वर करीत नाहीं. तेव्हां अंबाजी लोहगांवकराच्या पदरीं कोणत्या हि पुराव्याच्या अभावीं लेखकत्व बळेंच बांधणें अशक्य आहे. हल्लीं खेड येथें ह॰ भ॰ प॰ चंडिरामबुवांचा मठ असून तेथील मठाधिपति थोर, विद्वान् व शोधक गृहस्थ आहेत. अशा वह्या त्या गांवांत असत्या तर या मठाधिपतीस त्यांची माहिती अवश्य असती. पण ती त्यांना नाहीं. मीं स्वतः खेड येथें जाऊन तपास केला व मागाहून आणखी करविला. पण या वह्यांबद्दलची कोणती हि माहिती तेथें उपलब्ध नाहीं.[2]

आतां बाकी राहिलेल्या व मागें उल्लेखिलेल्या तिघांपैकीं रामेश्वरभटानें तुकारामाचे अभंगांस नीटनेटकें रूप दिलें अशी एक आख्यायिका सर्वत्र प्रसिद्ध आहे. पण रामेश्वरभटानें हे अभंग लिहून ठेविल्याचा पत्ता कोठें हि लागत नाहीं. रामेश्वरभटाचे विद्यमान वंशज बहुळ व वाघोली येथें आहेत. यांपैकीं कोणाकडे हि तुकारामबुवांच्या अभंगांच्या वह्या नाहींत. रामेश्वरभटाची समाधी वाघोलीस आहे. पण तेथील

---

१ भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त पृ. २४४ पहा. २ खेड येथें हल्लीं लोहगांवकरांचीं दोन घरें आहेत. पण यांचा तुकारामशिष्य अंबाजी लोहगांवकर याच्याशीं संबंध नाहीं. या लोहगांवकरांचें मूळ उपनांव पाठक असें होतें. त्यांचे येथें तुकारामाच्या अभंगांच्या वह्या नाहींत.

शाखेकडे हि तुकोबाच्या वह्या नाहींत, किंवा रामेश्वरभटाच्या हातच्या वह्या असल्याचें हि हल्लींचे वंशज सांगत नाहींत.

गंगाधर मवाळ व संताजी तेली जगनाडे या दोघांबद्दल मात्र त्यांनीं अभंग लिहिले असल्याबद्दलचे स्पष्ट उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात. महिपतीबाबा ताहराबादकर म्हणतात–"**गंगाधर मवाळ** साचार । कडुसांत होता तो द्विजवर । जो तुकयाचा लेखक निरंतर । प्रासादिक उत्तर लिहितसे ॥ दुसरा **संताजी तेली** जाण । उपनाम **जगनाडे** त्या कारण । चाकणांत होता बहुत दिन । तुकोबासी शरण मग आला ॥ ऐसे दोघे उभयतां । सद्भावें शरण वैष्णव भक्ता । सोडोनि संसाराची आस्था । लिहित कविता निजांगें ॥" ( भक्तलीलामृत अ. १० ).

या जोडी पैकीं मवाळाचे वंशज अजून हि कडुस येथें राहतात. हल्लीं दोन भाऊ विष्णूपंत व महादेवबावा हे हयात आहेत. यां पैकीं रा· विष्णूपंत हे मी कडुस येथें गेलों होतों त्या वेळीं तेथें नव्हते. रा· महादेवबुवा हे मला तेथें भेटले पण त्यांचे घरीं वह्या वगैरे कांहीं एक नव्हतें. मवाळांचे घराजवळ एक मोठा चौक असून तेथें उत्सव होतो. चौकाजवळ घरांत एक लहानसें देऊळ आहे. येथील विठोबाची मूर्त तुकारामबुवानीं च बसविली असे रा. मवाळ सांगतात. विठोबाच्या मूर्तीचे खालचे बाजूस गंगाधर मवाळाची पाषाणमय मूर्ति दाखवतात. या खेरीज नोंद करण्या सारखें असें कांहीं तेथें दिसलें नाहीं रा· महादेवबुवांच्या सांगण्यावरून गंगाधरबुवांच्या वेळची तुकोबांच्या अभंगाची वही रा· विष्णूपंत यांजवळ असल्याचें कळलें व नंतर या वहीचा हि शोध केला. ही वही म्हणजे तुकोबानीं बुडविलेली व पाण्यांत अठरा दिवसांनीं तरून वर आलेली वही असें रा· मवाळ सांगतात.

ही वही पूर्तकाली पांढऱ्या कागदावर लिहिलेली आहे. कागदांत वाटरलाइन्स, स्पष्टपणें दिसतात. ही वही पूर्वी लांबट होती ती मध्यें फाडून हल्लीं बुकाप्रमाणें शिवून बांधिली आहे. वहीचीं पानें ६९९ आहेत व अभंग अदमासें १३७६ आहेत. यांत वेगळालीं अक्षरें आहेत. अभंगानां मथळे उर्फ 'हेडिंगें' आहेत. यांपैकीं कांहीं अभंगांवर 'रुजु' पाहिल्याच्या खुणा आहेत, व कांहींवर 'दुबार' असा शेरा आहे. कांहीं अभंग खोडलेले आहेत. हिची भाषा जुनी नाहीं. पण हींतील कांहीं कांहीं पाठ चांगले आहेत. हल्लींचे मालक ही वही दाखविण्यास कबूल आहेत. मात्र ती सोंवळें नेसूनच पाहिली पाहिजे अशी त्यांची इच्छा आहे. हिची नक्कल करूं देण्यास त्यांचें मन वळविलें पाहिजे. या वहींत 'आतां हे विनवणी प्रधान अष्टका प्रभुसी विवेक समजावा' हा व ' दिवट्या छेत्री घोडे इ. ' हे अभंग आहेत. आणखी एक मुख्य गोष्ट अशी कीं ' मुख्य महा विष्णु ' इ· नऊ कडव्यांचा महिपतीचा अभंग यांत आरंभीं आहे. ही वही पाहून पाहणाराचे मनांत असें येतें कीं, जुन्या एखाद्या वहीवरून, महिपतीचे

वेळीं किंवा लगेंच नंतर ही नकललेली असावी. मला वाटतें कीं या असल्या सर्व जुन्या नकला तुकारामबुवानीं अभंग कोणत्या क्रमानें रचिले असावेत तो क्रम किंवा निरनिराळे अभंग मनाच्या कोणत्या परिस्थितींत रचिले असावे ती परिस्थिति, यांसंबंधीं तर्क बांधण्यास फार उपयोगी आहेत.

आतां ज्या वह्यांवरून मीं हे अभंग छापले त्यां संबंधें सांगण्याचें राहिलें, तें सांगतों. संताजीच्या हातच्या अशा दोन वह्या मला उपलब्ध झाल्या. या दोन्ही वह्यांतील लेखनाचा प्रकार अगदीं एकसारखाच आहे. वह्या खतावणीप्रमाणें उभ्या लिहिलेल्या असून मध्यें शिवलेल्या आहेत. दर एक पृष्ठावर सरासरीनें चाळीस ओळी आल्या आहेत. प्रारंभींचीं व शेवटचीं पानें फाटून गेलीं आहेत. या दोन्ही वह्यांतील अक्षर चांगलें सुटें व सुवाच्य आहे. संताजी 'इ' हें अक्षर मोडीप्रमाणेंच नेहमीं लिहितो व 'ण' 'अ' 'स' वगैरे अक्षरें देखील कोठें मोडी लिपीचीं लिहितो. यावरून मोडी लिहिण्याचा सराव संताजीला होता असें वाटतें. 'ल'च्या जागीं 'ळ' 'ळ'च्या जागीं 'ल' 'ख'च्या जागीं 'ष' वगैरे शिवकालीन प्रकार या दोन्ही वह्यांत आहेत. या वह्यांचीं पानें सुमारें ६ इंच रुंद व ७॥ इंच लांब अशीं आहेत.

या वह्या संताजीनें कशा लिहिल्या हें कळण्यास साधन नाहीं. तुकारामाचे तोंडून कीर्तनांत अभंग ऐकतां च घरीं येऊन संताजीनें ते या वह्यांवर लिहिले असतील असें वाटत नाहीं. आपल्या कच्च्या टिपणांवरून किंवा आपल्या स्मरणानें हे अभंग संताजीनें लिहिले असावेत. किंवा तुकारामबुवा एकसारखे सांगत जाऊन त्यानें हे उतरून घेतले असले पाहिजेत. वह्यांच्या एकटाकी लिहिण्यावरून हा असा तर्क बांधण्याकडे मनाची प्रवृत्ती होते. वह्यांत कांहीं कांहीं अभंगांची पुनरावृत्ती झालेली आहे यावरून या तर्काला थोडी बळकटी हि येते. पण हा तर्क खरा धरला असतां वह्यांत कोठें कोठें कोरी जागा कां सुटली आहे याचा खुलासा होत नाहीं. कदाचित् हे सर्व अभंग एका अनुक्रमानें नित्यशः म्हणण्याचा परिपाठ असला, व आयते वेळीं एखादा अभंग नीट न आठवला तर अशी जागा सोडून ठेवणें संभवनीय आहे. या वह्या कशा लिहिल्या गेल्या हें मला कळलें नाहीं इतकेंच पुनः एकदां म्हणून ठेवतों. मीं वर सुचविलेले केवळ तर्क आहेत. त्यांस आधार नाहीं. इतकें मात्र खरें दिसतें कीं केव्हां तरी एकदम, थोडेच दिवसांचे मुदतींत, आणि तुकारामबुवांच्या मरणापूर्वीं सुमारें तीनचार वर्षेंच अगोदर या वह्या संताजीनें लिहिल्या असाव्यात.

मीं हल्लीं प्रसिद्ध केलेल्या संताजी जगनाड्याच्या वह्या, पूर्वीं छापलेल्या तुकारामाच्या अभंगांच्या कोणत्या हि प्रतीच्या संपादकानें पाहिलेल्या नव्हत्या. सरकारी गाथेच्या संपादकांपुढें तर संताजीची एक हि वही नव्हती. कारण सरकारी गाथेच्या संपादकांनीं टीपांत बारीकसारीक तेलीचे पाठ दिलेले आहेत, पण तीन संताजीच्या वह्यां-

तले महत्त्वाचे पाठभेद हि आढळत नाहींत. या वरून त्यांस संताजीची एक हि वही मिळाली नव्हती असें च म्हणावें लागतें. ती त्यांस मिळाली असती तर तीतील पाठभेद देऊन शिवाय त्या वहीचा उल्लेख हि त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत खास केला असता.

संताजीनें एकंदर चार वह्या लिहिल्या होत्या असें त्याचे वंशज सांगतात, आणि तें खरें दिसतें. यांपैकीं दोन वह्या मात्र हल्लीं उपलब्ध आहेत. बाकी दोहोंचा अद्याप नीटसा पत्ता लागत नाहीं. उपलब्ध असलेल्या वह्यांपैकीं हल्लीं मागाहून छापलेली वही ही बहुतकरून संताजीनें लिहिलेली शेवटची म्हणजे चौथी वही असावी.

असें दिसतें कीं, संताजी हा तुकारामाच्या सेवेंत राहूं लागला तेव्हां याचें वय वीस पंचविशींच्या सुमारांत होतें, व तुकारामाचे मरणापूर्वीं चार पांच वर्षें यानें तुकोबांचें कवित्व लिहिण्याचें काम केलें. पनवेलच्या—म्हणजे जीवरून पहिला भाग छापला—त्या वहींत संताजीच्याशिवाय अन्यलिखित मजकूर नाहीं. आणि या वहीच्या प्रमाणेंच हल्लीं अनुपलब्ध असलेल्या दोन वह्यांत हि संताजीच्या शिवाय अन्यलिखित मजकूर नसेल असें वाटतें. उपलब्ध असलेल्या दोन्ही वह्यांतील संताजीचें अक्षर एकतारखें व घोंसदार असून चांगलें घटलेलें असें आहे. अक्षरावरून पाहतां संताजी हा हुशार व चुणचुणीत मुलगा असून याला लिहिण्याचा सराव चांगला असावा; आणि म्हणून च तुकोबाच्या कवित्वाची लेखी प्रत करण्याची कामगिरी याचेकडे आली असावी. पहिल्या तीन वह्या लिहून झाल्यानंतर संताजीनें ही चौथी वही लिहिण्यास सुरवात केली; व या वहीचीं शंभर सवाशें पानें लिहून झाल्यावर त्यास उपलब्ध असें तुकोबाचें कवित्व संपलें. व ही वही बाकी कोरीच राहिली. तेव्हां हीं कोरीं पानें फुकट जाऊं न देतां यांजवर जुन्या काळच्या इतर साधुपुरुषांचें कवित्व लिहून ठेवण्याचें संताजीनें योजिलें. परंतु तुकोबारायाचें आणखी कांहीं अभंग उपलब्ध झाल्यास किंवा तुकोबानीं आणखी कांहीं कवित्व केल्यास तें एकाच ठिकाणीं एका ओळीनें लिहिण्याची सवड राहावी म्हणून वहीचीं ११५ पानांपुढील ४०।४५ पानें तशींच कोरीं सोडून नंतर पुढील पानांवर ज्ञानदेवादिकांच्या आरत्या वगैरे लिहिण्यास त्यानें सुरवात केली, व १७५ व्या पानावर 'आरतीया सोळा ज्ञानदेवाच्या' असा मथळा घालून या आरत्या लिहिल्यीं. १८४ वे पानापर्यंत या सोळा आरत्या लिहून झाल्यावर तेथें पुढील प्रमाणें शेरा लिहिला आहेः

---

१ पहा भा· इ· सं· मं· ग्रंथमाला पुस्तक २० पान ७८. २ या आरत्या पुढील प्रमाणें आहेत— १ चांगदेव, २ मुक्ताबाई, ३ ज्ञानदेव, ४ सोपानदेव, ५ निउर्ती ( निवृत्ती ), ६ नामदेव, ७ खेचर, ८ सोपानदेव, ९ पेचराविसा, १० चांगदेव, ११ मुक्ताबाई, १२ ज्ञानदेव, १३ निवृत्तीदेव, १४ नामदेव, १५ प्रसो मागींवंत, १६ नामदेव.

॥ छ ॥ सोळा आर । त्या संपुर्ण ळीहील्या हस्त अक्षर संतु तेळी । कसबे चाकण : सके १५६८ पार्थिव नाम । सवछरे अस्वीन सुध पुर्णीमा ते दीवसी स । मामा : ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ ॥ छ ॥

हस्त अक्षर संताजी तेळी जगनाडे : ॥

या १८४ व्या पानानंतर संताजीनें कान्होपाठक, जगमैत्रनागा, नामदेव, चांगदेव, खेचरविसा, बहिरोपिसा, सच्चिदानंद, जोगापरमानंद, धोंगडा, वछरा, भानुदास वगैरे कवींचीं कवनें लिहून ठेविलीं आहेत. यांत सात आठ ठिकाणीं संताजीशिवाय इतर कोणीं तरी लिहिलेलें अक्षर आढळतें. असो. येथें विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं या आरत्यांनंतरचा लेख शके १५६८ तला आहे. म्हणजे तुकारामाचे मरणापूर्वी तीन चार वर्षें हा भाग लिहून झाला होता, असें झालें.

यानंतर बरेच वर्षांनीं या वहींतील मध्यें सोडून दिलेल्या चाळीस पंचेचाळीस पानांवर कांहीं मजकूर लिहिण्याची इच्छा झाली. प्रथम कोणीं 'ज्ञानेश्वराची आदी' लिहिली, व मग संताजीनें त्यापुढें इतर मजकूर लिहिण्यास सुरवात करून १६४ व्या पानावर ' तीर्थावळीचे अभंग' पुरे केले. या पानावर पुढील प्रमाणें शेरा आहे.

---

१ हा शक व संवत्सर गत आहे. यावरून संताजी हा शक व संवत्सर गत किंवा चालू दोन्ही तऱ्हेनीं लिहीत असे, असें दिसतें. तळेगांव येथील वह्यांत संताजीच्या खेरीज आणखी तीन वह्या आहेत. या शके १६५३।१६५४ मध्यें लिहिल्या गेल्या यांत मूळ संताजीच्या लिखाणाची फार काळजीनें नक्कल केली आहे. कदाचित् पुढें भावाबंदाच्या वांटण्या झाल्या असाव्या व त्या वेळीं या नकला करण्यांत आल्या असाव्या. हें कसें हि असो. पण नकलकारांनीं नकला फारच जपून, काळजीपूर्वक अस्सलबरहुकुम केल्या आहेत. यांत तुकोबाचा प्रयाणकाळ शके १५७२ विकृती नाम संवत्सर फाल्गुन वद्य २ असा दिला आहे; आणि तो बरोबर आहे. मात्र यांतील शक व संवत्सर गत आहेत. संताजी हा संवत्सर गत व चालू दोन्ही तऱ्हेनें लिही. तुकोबाचे वेळीं शक व संवत्सर गत लिहिण्याचा प्रचार बराच होता. केव्हां केव्हां हे दोन्ही गत लिहीत व केव्हां केव्हां यापैकीं एकच गत लिहीत. राजवाडे म० इ० सा० खंड २० मध्यें लेखांक २३९ चा शक १५७० विरोधी संवत्सर असा आहे. यांत शक गत व संवत्सर चालू आहे. शिवाजीच्या महाबळेश्वर येथील गोपाळ भटास दिलेल्या सनदेंत हि शके १५७४ नंदन संवत्सर दिला आहे. हा हि गत आहे. संताजीनें हि आपल्या वहींत शके १५६८ पार्थीव संवत्सर असें लिहिलें आहे. म्हणजे येथें शक चालू व सवंत्सर गत लिहिला आहे. तेव्हां आतां आपणास असें निश्चयानें म्हणतां येतें कीं तुकोबा शके १५७२ गत म्हणजे १५७३ मध्यें हा लोक सोडून गेले.

'अभंग सेतावन : संपुर्ण तीर्थावळीचे : ॥ सके १६१० वीभव नाम सवछरे पौश वदी ३० अमावाश्या वार सुकुरवा ते दीनी समाप्त हस्त अक्षर संताजी तेळी जगनाडे याची पोथी कसबे चाकण': शुभं भवतु

या वरून असें होतें कीं तुकोबा मेल्यानंतर सुमारें सद्तीस वर्षांनीं संताजीनें ही तीर्थावळी लिहिली. या शिवाय या वहींत आणखी एक ठिकाणीं संताजीनें आपली सही लिहिली आहे.

ज्ञानदेवी ब्राह्मण धरणे बैसळा होता : दीवस ४२ ॥ बेताळीस : या कारणें तुकावा गोसावीं याणी अभंग केळें येकतीस ३१ हें ळीही सही : ॥ हस्त अक्षर : संताजी तेळी जगनाडे : कसबे चाकण *

संताजीनें तुकारामाच्या ह्यातींत च तुकारामाचें कवित्व लिहून पुरें केलें असें संताजीच्या वहींतलि यांपैकीं १५६८तल्या उताऱ्यावरून म्हणतां येतें;व हें लिहिल्या नंतर तुकारामाच्या पश्चात् चाळीस बेचाळीस वर्षांच्या अवधींत तुकारामाचे या पेक्षां आणखी अभंग त्यास मिळाले नाहींत. कारण जर मिळाले असते तर ते त्यानें या कोऱ्या पानांवर लिहून ठेविले असते. एक मन असें हि वाटतें कीं 'श्री नारायण गरुडावर बसून आले' त्या संबंधाचे व तसलेच इतर बालिश अभंग तुकारामानें म्हटलेले नसून मागाहून इतर कोणा भाविक भक्तानें तुकारामाचे तोंडांत भरविलेले असावेत. किंबहुना आपले वयाचे शेवटीं एक दोन वर्षे तुकोबांचें सर्व लक्ष ईश्वरचिंतनीं वेधून जाऊन त्यांनीं नवीन कवित्व हि बहुशा केलें नसावें. एकंदरीनें विचार करतां तुकोबांचे सर्व मिळून साडे-तीन ते चार हजार अभंग असावेत. यां पेक्षां जास्त अभंग त्यांनीं केले नसतील. पण पुढें कोणता हि चांगला अभंग दिसला कीं तो तुकारामाचा च असला पाहिजे अशी समजूत करून घेऊन भाविकांनीं शेवटीं 'तुका म्हणे' अशीं अक्षरें घालून तो तुकोबांचा म्हणून चालू केला, आणि यामुळें 'तुकोबाच्या अभंगांची' संख्या दिवसेंदिवस सारखी फुगत च चालली. चांगली आर्या आढळली कीं ती मोरो-पंताची, किंवा चांगला श्लोक असला म्हणजे तो वामनाचा, हा प्रकार आपल्या चांगला परिचयाचा आहे, आणि हा च प्रकार तुकोबाचे संबंधीं हि झाला असावा.

संताजीनें आपल्या वह्या तुकारामाच्या मरणापूर्वीं च लिहिल्या होत्या हें वर आलें च आहे. आणि संताजी हा तुकारामाच्या प्रीतींतला, त्याचा आवडता टाळकरी, नेहमीं त्याचे जवळ निकट सहवासांत असणारा, यांमुळें या वह्या तुकारामबुवांच्या नजरेखालून हि गेल्या असल्या पाहिजेत हें उघड आहे. इतर टाळकऱ्यांनीं हि त्या निःसंशय पाहिल्या असल्या च पाहिजेत. आणि म्हणून च तुकोबांच्या सद्गुरच्या लेखाच्या अभावीं या प्रतीस मीं 'तुकारामबुवांची अस्सल

१ स मोडी आहे. * 'क' व 'ण' मोडी.

गाथा' असें म्हटलें आहे. तुकारामाच्या आवडत्या शिष्यानें तुकारामाच्या हयातींत, तुकारामाच्या निकट सांनिध्यांत असतांना लिहून ठेविलेल्या या गाथ्यास 'अस्सल' न म्हणावें तर काय ' कम अस्सल ' म्हणावें ? आणि कदाचित् मीं असें म्हटलें तरी कोणता सुज्ञ हें असलें म्हणणें शहाणपणाचें मानील ?

आतां गंगाजी मवाळ किंवा इतर कोणा टाळकऱ्याच्या हातचा गाथा सांपडल्यास तो हि या गाथ्याच्या तोलाचा च प्रमाण समजला पाहिजे. कदाचित् पुढें मागें खुद्द तुकारामाच्या च हातचा गाथा सांपडल्यास तो मात्र निःसंशय यांहून वरच्या दर्जाचा अस्सल होय, हें निर्विवाद आहे. पण तसा गाथा अद्याप उपलब्ध नसल्यामुळें अस्सलपणाचा मान मीं या गाथ्यास दिला आहे. परंतु या संहितेस ' अस्सल ' म्हणणें कोणास दुःसह वाटल्यास त्यानें खुशाल त्या ठिकाणीं दुसरा शब्द योजावा; किंवा तो मुळीं च गाळावा. त्यांत माझा आग्रह नाहीं. तुकोबाचा टाळकरी संताजी तेली यानें अस्सल मानिलेली ही तुकारामाची संहिता आहे, इतकें च सुचविण्याचा माझा इरादा आहे. आणि हें स्पष्टपणें वाचकांस समजाविल्यावर मग आणखी नांवांत तें काय आहे ? देहशुद्धीसाठीं प्रायश्चित्त म्हणून घ्यावयाचें त्याला ' पंचगव्य ' म्हणा कीं गायीच्या ' दहीतुपांतलें शेणामुताचें मिश्रण ' म्हणा. त्याचा पवित्रपणा सारखा च.

या 'तुकारामाच्या अस्सल गाथ्याचा' पहिला भाग छापून प्रसिद्ध केला त्या वेळीं माझे इच्छे विरुद्ध, कांहीं मित्रांच्या आग्रहावरून, 'बावीस तेवीस प्रती' निरनिराळ्या पत्रांच्या व मासिकांच्या संपादकांस अभिप्रायार्थ पाठविल्या होत्या. या अशा पाठविण्यांत माझ्या मित्रांचा हेतु असा कीं या विद्वानांना ही एक कौतुकास्पद भेट होईल, व यावर त्यांचे विचार प्रगट झाल्यानें इतर कवींचे ग्रंथ त्यांच्या मूळ स्वरूपांत छापण्याचे प्रयत्न होऊं लागतील. पण अनुभवा अंतीं ही त्यांची आशा खोटी ठरली. बावीसपैकीं चार पांच च संपादकांनीं यांची पोंच दिली व दोघा तिघांनीं चार दोन ओळींचे अभिप्राय दिले. बाकीच्यांना नाहक तसदी मात्र दिल्यासारखें झालें. आलेलें बुक–पोस्ट फोडण्याची, कव्हर फाडून आंतील मजकुरावर क्षण मात्र नजर फिरवून तें दूर ठेवण्याची तसदी मात्र त्यांस विनाकरण पडली. पण मला हें एक बरें झालें कीं 'तुम्ही आपलीं पुस्तकें अभिप्रायार्थ वर्तमानपत्रकर्त्यांनां व मासिकवाल्यानां कां पाठवीत नाहीं' याचें उत्तर या माझे मित्रांस परस्पर मिळालें. या पुढें तरी, हीं आपलीं खुळें आपले जवळच ठेवावीं, आणि मुद्दाम कोणीं आंवतणें दिल्या शिवाय महाराष्ट्र विद्वानांच्या पेठेंत तीं डोक्यावर घेऊन मिरवूं नये, हा गोड धडा हे स्नेही शिकतील असा भरंवसा आहे.

ज्या विद्वानांनीं या गाथ्यासंबंधें कांहीं मजकूर लिहिला त्या सर्वांत सुबोधपत्रिकाकारांनीं मात्र बराच विचार करून व तसदी घेऊन आपला अभिप्राय दिला

आहे. यांच्या खेरीज बाकीच्यांचे अभिप्राय प्रायः एकसारखेच आहेत. त्या सर्वांनीं थोड्या व अटपसर शब्दांत आपली नापसंती दर्शविली आहे. यांत हि महाराष्ट्रांतले जुने, कसलेले, मार्मिक व चमचमीत टीकाकार 'महाराष्ट्रभाषाचित्र–मयूर' अशी कसलीशी पद्वी दिलेले लेखक रा॰ कृ॰ ना॰ आठल्ये यानीं हें पुस्तक पाहून अगदींच नाक मुरडलें आहे. त्यांच्या मतें राजवाड्या सारख्या मनुष्याला प्राचीन कालच्या लेखनकलेचा नमुना म्हणून कल्पनांच्या भराऱ्या मारावयाला, किंवा मूळ म्हणून भक्तिभावानें पूजा करून देव्हाऱ्यांत ठेवावयाला मात्र या ग्रंथाचा उपयोग होईल. बाकी कोणाला हि यापासून कांहीं इतका हि उपयोग होण्या सारखा नाहीं. लेखकवर्य आठल्यांचें हें म्हणणें मला अगदीं तंतोतंत पटलें. कारण तें अगदीं अक्षरशः खरें आहे. असल्या यत्नाची चव जाणण्याला व हीं संताजीनें जतन करून ठेविलेलीं मुक्ताफळें चाखून आनंदानें ढेंकर देण्याला तसलाच मानससरोवरांत यथेच्छ क्रीडा करणारा राजहंस च पाहिजे. येर गबाळांचें तें काम नाहीं. आणि या माझ्या यत्नानें एकट्या राजवाड्यांस थोडासा जरी आनंद झाला तरी तेवढ्यानेंच ह्या वह्या मिळविण्याकरतां घेतलेले श्रम, आणि लहान सहान माणसांच्या केलेल्या विनवण्या सार्थकीं लागल्या व ते नकल करून छापण्या करतां खर्च केलेले शेकडों रुपये शतगुणित मिळाले असेंच मला वाटेल. अगदीं लहानपणांत विद्यार्थी दशेंत असतांना च काव्यग्रंथांचें यथामति संशोधन करून त्यांचा मीं ओबडधोबड इतिहास लिहिला. तो वाचून रा॰ राजवाड्यांना कौतुक वाटलें, व त्यांचें हि मन काव्यग्रंथांच्या संशोधनाकडे वळलें हें ऐकून मला जसा आनंद वाटला, त्याप्रमाणेंच आतां पन्नाशीच्या घरांत पोचल्यावरचे हे माझे बसल्या बसल्या केलेले असले यत्न पाहून त्या विशाल बुद्धीच्या, अखंड उद्योगी पंडिताला थोडेंसें जरी बरें वाटलें आणि आपल्या नित्यस्वभावानुसार या प्रयत्ना संबंधें चार दोन आंसडे ओढण्या इतकें जर त्यास याचें महत्त्व वाटलें तर त्यापासून मला खरोखरच संतोष वाटेल. पण रा॰ आठल्यानीं उल्लेखिलेलीं जीं दुसरीं भाविक खुळसटें त्यांनीं हा ग्रंथ देव्हाऱ्यांत ठेविला काय किंवा आपल्या रांगल्या मुलांच्या कामीं लाविला काय, दोन्ही मला एकच. पशूंतां आणि दगडानां देव मानणाऱ्या भाविक भिक्षुकांच्या स्तुतीपेक्षां ज्ञात्यांचे खरमरीत शब्द विशेष आनंद देतात याची साक्ष कोणी हि देईल.

आतां रा॰ रा॰ सुबोधपत्रिकाकर्त्यांच्या लेखासंबंधीं दोन शब्द लिहितों. यांत च इतर टीकाकारांच्या आक्षेपाचें उत्तर हि त्यांस सांपडेल च. सुबोधपत्रिकाकारानां ही वही संताजीनें लिहिलेली आहे, व त्या बरहुकुम ही प्रत छापली आहे हें मान्य आहे. पण या प्रतीस विशेष महत्त्व देण्यास ते कबूल नाहींत. यासंबंधें सुबोधपत्रिकाकारांच्या मतें ( संताजीच्या संहितेसुद्धां ) सर्व प्रतींत १८६९ त छापलेली सरकारच्या आश्रयानें प्रसिद्ध झालेली प्रत सर्वांमध्यें अधिक विश्वसनीय होय. अनेक पद्वी-

धरांनीं मेहनतीनें तयार केलेली, अनेक शास्त्र्यांनीं संपादिलेली, अनेक रावबहादुरांच्या देखरेखी खालीं प्रसिद्ध झालेली, अनेक सहस्र रुपये खर्चीं घालून छापिलेली, आणि प्रत्यक्ष सरकारच्या आश्रयाखालीं अवतरलेली व सर. एच० बी० ई० फ्रीयर सारख्या एतद्देशीय भाषाभिमान्याच्या चरणीं वाहिलेली ही प्रत फार कौतुकास्पद व अनेक तऱ्हेनीं उपयोगी आहे असें कोणी हि म्हणेल. परंतु तुकोबांच्या अस्सल वाणीची ओळख करून देणारी व सर्वथैव प्रमाणभूत अशी ही प्रत मानतां येणार नाहीं. हिच्यावर आमच्या तुकोबारायाचें शिक्का मोर्तब आहे असें केव्हां हि म्हणतां येणार नाहीं. या प्रतीसंबंधें मला काय वाटतें हें मीं पूर्वीं सांगितलें च आहे. तेव्हां त्यासंबंधें पुन्हां कांहीं लिहिण्याचें आतां कारण नाहीं.

या हल्लीं छापलेल्या 'अस्सल गाथे' संबंधें सुबोधपत्रिकाकार म्हणतात कीं:–

१ या वहीस 'अस्सल' म्हणण्यास आम्ही तयार नाहीं.

२ या वहींत अशुद्धें फार आहेत सबब ही वाणी तुकोबांची असें मानण्यास हि आम्ही तयार नाहीं.

यां पैकीं पहिल्या आक्षेपासंबंधें ते म्हणतात कीं इतर टाळकऱ्यांच्या हातच्या वह्या सांपडल्या तर त्यांची वाट काय ! त्या अस्सल नानावयाच्या कीं नाहीं ! याचें उत्तर मागें आलें च आहे. प्रत्यक्ष तुकोबांच्या हातचें लिखाण हें पहिल्या प्रतीचें अस्सल. पण त्याच्या अभावीं कोणा हि टाळकऱ्याच्या हातच्या वह्या 'अस्सलच' समजल्या पाहिजेत. मात्र त्यांसंबंधाची इतर परिस्थिति लक्षांत आणून त्यांच्या अस्सलपणाची आणेवारी लावावी लागेल.

एखाद्या वर्गांतील मुलांची परीक्षा घेऊन परीक्षकानें एकास 'पहिला नंबर' म्हटल्यावर कोणीं बाहेरून येऊन विचारलें कीं, 'अहो याच्याहून हुशार मुलगा या वर्गांत आल्यास या पहिल्या नंबरची वाट काय ? याला उत्तर कशाचें ! असा कोणी आणखी हुशार मुलगा आल्यावर तो पहिला होईल आणि हा दुसरा होईल. पण तो येई पर्यंत हा नंबर पहिलाच. आतां दुसरा आक्षेप अशुद्धत्वाचा. या संबंधें मुख्य गोष्ट अशी आहे कीं 'शुद्ध' किंवा 'अशुद्ध' हें आजच्या आपल्या कल्पनेनें ठरवावयाचें नसून, त्या कालीं व त्या प्रांतांत कोणता प्रचार रूढ होता हें लक्ष्यांत आणून ठरविलें पाहिजे. रा. राजवाडे यानीं संपादिलेली ज्ञानेश्वरी, रा. देवानीं छापिलेला दासबोध, 'महाराष्ट्र कवीं'त प्रसिद्ध झालेला दासोपंताचा गीतार्णव वगैरे ग्रंथांत ज्यांस आपण हल्लीं अशुद्ध म्हणूं अशीं अनेक रूपें व पुष्कळ शब्द सांपडतील. तसें च महिपती, श्रीधर, जयरामस्वामी वगैरे सर्वमान्य कवींच्या मूळ पोथ्यांत हि असें च सध्यां 'अशुद्ध' म्हणून समजले जाणारे प्रकार शेंकड्यांनीं मोजण्या इतके आढळतील. पण हे सर्व शब्द किंवा हीं रूपें बिलकूल अशुद्ध नसून पूर्णपणें शुद्ध च समजलीं पाहिजेत. कारण त्या त्या

काळचे व त्या प्रांतांतले शिष्ट लोक तीं तशींच योजीत व सर्वमान्य लेखक हि तीं तशींच लिहीत.

सुबोधपत्रिकाकारांनीं अशुद्धतेचीं अशीं निवडून पांच उदाहरणें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत—

१ मुष्य आधी वीशये त्याग

२ धाई अंतरीच्या सुषें : काये बडबड वाचाळी मुषे

३ आंब्रुताची फळें अंब्रुताची वली

४ असो सटपट, क्षीणक्षीणा हाची करावा वीचार

५ अवघ्या जेस्टा दंवी कोण पुजणाचा ठाव

यांत 'ख' च्या ऐवजीं 'ष' योजिल्याचें पहिलें अशुद्ध आहे. हा च दोष रा. आठल्ये यानीं व इतरांनीं हि दाखविला आहे. पण हा दोष किंवा हें अशुद्ध नसून पूर्णपणें शुद्ध आहे. तत्कालीन अनेक मराठी लेखांत 'ख' हा उच्चार 'ष' या च चिन्हानें दाखविला जातो. 'ख' हा उच्चार 'ष' या चिन्हानें दाखविण्याची वहिवाट फार जुनी व शिष्टसंमत आहे. ज्ञानेश्वर, विसाखेचर, नामदेव, चक्रधर वगैरे अनेक कवींच्या पोथ्यांत हा प्रकार आढळतो. 'महाराष्ट्रसारस्वतां'त उतरून घेतलेल्या अनेक उताऱ्यांत हा प्रकार नजरेस पडेल. ळ, ल्ल वगैरेसंबंधीं हि असा च खुलासा आहे.

वीशये त्याग, काये बडबड वगैरे ठिकाणीं 'य' वर दिलेल्या मात्रेसंबंधीं आक्षेप आहे. पण हा हि प्रकार वरीलप्रमाणें च जाणावा. रामदास, महिपती सारखे ब्राह्मण कवी हि असें च लिहितात. महिपतीच्या सर्व लिखाणांत 'य' च्या ऐवजी 'ये' नेहमीं आढळतो. 'य'कार किंवा 'य'कारासारखा उच्चार असला तरी हि मराठी लेखक त्याला 'ए'कार लावतात. चरण, चेरण; दक्ष, दक्षे; देह, देहे; इ. इ. याचप्रमाणें पुजणाचा. यांत 'न'चे ऐवजीं ण, तसें च 'वली' यांत 'ळ'चे ऐवजीं 'ल' हे प्रकार हि तत्कालीन समजाप्रमाणें शुद्ध च होत. इतर लेखकांच्या लेखांत तर राहो च पण खुद्द तुकाराम महाराजांच्या हस्ताक्षराच्या प्रसिद्ध फोटोंत हि वर उल्लेखिलेले सर्व प्रकार पाहण्यास सांपडतील. प्रत्यक्ष तुकोबांच्या हातच्या लेखांत हि हे प्रकार जर आहेत तर संताजीच्या वह्यांत ते असल्याचें नवल काय ! 'अंब्रुत' या शब्दांत 'म्र' ऐवजीं 'ब्र' आहे. हा हि प्रकार कांहीं नवा किंवा अशिष्ट नाहीं. शके ९०० मधील चालुक्यांच्या ताम्रपटांत हा मराठी शब्द आला आहे, व तेथें हा 'ब'कारयुक्त च लिहिला आहे; आणि तेव्हांपासून पुढें अनेक ठिकाणीं हा 'म' चे एवेजी 'ब' वारंवार नजरेस पडतो. ऱ्हस्वदीर्घा संबंधीचे

प्रकार हि कांहीं चूक म्हणतां येणार नाहींत. वीशय, वीचार वगैरे शब्दांत दीर्घ इकार आहे. पण या दीर्घ इकाराची लकब मराठ्यांचे लिहिण्यांत फार जुनी व शिष्टसंमत आहे. 'महाराष्ट्र सारस्वतांत' शके १३०९ व शके ११२८ च्या छायारूपानें दिलेल्या उताऱ्यांत 'सकुटुंबी', 'वीसोवा', 'दीन्हली' वगैरे अनेक शब्द दीर्घ इकारान्त लिहिलेले आढळतील. या दीर्घ इकारा संबंधें असें दिसतें कीं ज्यांचें संकृत भाषेचें ज्ञान गाढें आहे असे कांहीं कांहीं लेखक वगळले तर बाकी येथून तेथून सर्व मराठी लेखकांची प्रवृत्ती दीर्घाकडे निःसंशय फार दिसते. रामदास तर बहुतकरून सर्व भर दीर्घ इकार च योजतो. रामदासाचा उत्तम लेखकानें लिहिलेला दासबोध मूळा प्रमाणेंच छापिलेला आहे. त्यांतील त्रुती, उसीणें, विदेसी, येहलोक, स्मा ( क्षमा ), वगैरे शेकडों रूपें लक्षांत घेतलीं म्हणजे संताजीच्या संहितेला अशुद्ध म्हणण्यास फारसा अवकाश राहणार नाहीं. महिपतीबाबा ताहराबादकर, विठोबादादा, विश्वंभरबावा, कृष्णदयार्णवाचे परंपरेंतील शिष्यमंडळी, वगैरे सारख्या आजन्म लेखनव्यवसायांत गर्क असलेल्या अनेक नामांकित लेखकांच्या पोथ्या व लेख मजजवळ आहेत. त्या सर्वांत हे लेखनाचे प्रकार वर प्रमाणेंच आढळतात. तेव्हां हे प्रकार अशुद्ध कसे मानावे? आणि संताजीला च तेवढा दोष कोणत्या तोंडानें द्यावा ? तेव्हां संताजीच्या लेखनांतले हे प्रकार शुद्धच मानले पाहिजेत. तुकारामाचे इतर टाळकरी व शिष्यमंडळ हें लिखाण 'अशुद्ध' समजत नसले पाहिजेत. पंढरीच्या सर्व वारकऱ्यानां तर हें पूर्णपणें मान्य होतें. व अजून हि त्यांना हें मान्य व पूज्य आहे.

संताजीच्या शुद्धलेखनापेक्षां तुकारामाचें लिखाण कांहीं विशेष निराळें असेल असें मला वाटत नाहीं. अनेक वर्षे तुकारामाच्या निकट सांनिध्यांत भक्तिप्रेमानें राहिल्यावर या चुणचुणित तरुण मुलानें आपल्या गुरूजीची प्रत्येक गोष्ट पूर्णपणें उचलली असली पाहिजे. आणि हें असें नसेल तर यांत शिष्याच्या शिष्यपणाप्रमाणेंच गुरूच्या गुरुपणाला हि थोडेंसें कमीपण येईल.

ही छापिलेली 'अस्सल गाथा' तुकोबांच्या प्रत्यक्ष वाणीची ओळख पटवून देणारी आहे असें मानण्यास कांहीं लोक तयार नाहींत, याचें कारण पुढील प्रमाणें आहे. तुकाराम कसा असला पाहिजे याची कल्पना बांधून, या लोकांनीं एक सर्वगुणसंपन्न, सर्व तऱ्हेच्या ज्ञानानीं पूर्ण, सर्वांगसुंदर असा मानसपुरुष निर्माण केलेला असतो. त्यांच्या मताप्रमाणें जेंजें म्हणून न्यून वाटेल किंवा चुकीचें दिसेल तें कांहीं हि त्याच्या ठिकाणीं शक्य मानण्यास हे कबूल नसतात; व आपलें कल्पनामय चित्र यत्किंचित् तरी चुकलेलें असण्याचा संभव आहे, ही कल्पना हि करण्याची ताकद त्यांचे बुद्धीला उरलेली नसते. पुष्कळ वर्षे एकाच विचाराची संवय झाल्यामुळें ती बुद्धी दुसरा विचार ग्रहण करूं शकत नाहीं. व बुद्धीला एक तऱ्हेचें जडत्व येऊन खऱ्या वस्तुस्थितीचें आकलन त्या मंडळीला चट-

करून होत नाहीं. कदाचित् कांहीं प्रयासांनीं तें झालें च तर तें खरें मानण्यास व आपण निराधार कल्पनेनें पूर्वीं काढलेलें बिनतोड चित्र सुधारण्यास त्यांचें मन धजत नाहीं.

वास्तविक पाहतां ' माझीया मीपणां वरी पडो पाशाण ' ( अस्सल गाथा पृ. ६४ अ. ३५६ ) या अभंगांतील ' काया वाचा मनें अघटीत करनें : चर्मचक्षु हात पायें : नींदा द्वेश घात : विस्वासी वीभचार : लक्ष्मीमद मात घडले मांहां दोश : पत्नी दोन भेदाभेद: पीत्रुवचनी घडली अवज्ञा : अवीचार : कुटळ कुचरवादी नींदा : वीषवी लंपट होणा :, इत्यादि स्वतःसंबंधींच्या उल्लेखांवरून तुकोबा पूर्ववयांत थोडेसे वाहवलेले असावे, अशी कल्पना कोणाच्या हि मनांत यावी, व 'परस्त्री आतां मज माते समान ' ( अस्सल गाथा पृ. ११९ अ ६३८ ) या अभंगांतील शब्दांची खोंच लक्षांत येऊन ती कल्पना दृढ व्हावी; आणि मनुष्य कोणत्या हि वृत्तीचा असला तरी पश्चात्तापाच्या धगधगीत ज्वालांनीं त्याच्यांतील सर्व हिणकस भाग जळून जाऊन तो पूर्णपणें शुद्ध होऊं शकतो, व सर्व जगाला वंद्य ठरून, अत्युच्च पदाला जाऊन पोंचूं शकतो, हा उत्तम धडा मनानें शिकावा. पण असें कांहींच होत नाहीं. भक्तीच्या प्रेमाश्रूंनीं भरून गेलेल्या डोळ्यानां या अभंगांत कांहीं च दिसूं शकत नाहीं. आणि मन या अभंगांपासून हा धडा घेऊं जाणत नाही.

भक्तीच्या आणि श्रद्धेच्या परंपरेनें मन एका चकारींत खिळून गेलें व त्यानें चिकित्साबुद्धीला एकदां रजा दिली, म्हणजे काय प्रकार घडूं शकतात याचें हें एक मीं उदाहरण दिलें, इतकेंच; पण या माझे लिहिण्याचा भलताच अभिप्राय घेऊन, तुकारामांत कांहीं अवगूण होते, किंवा त्याचें साधुत्व कमी दर्जाचें होतें असें मला वाटतें असा कोणीं हि आपला समज करून घेऊं नये. तुकारामाची बुद्धि कुशाग्र होती, त्याची भक्ती व श्रद्धा अलौकिक होती, त्याचे वाणींत प्रसाद होता, व तो निःसंशय श्रेष्ठ दर्जाचा कवि होता, आणि आपणां सर्वांपेक्षां तो सहस्रपटींनीं अनेक बाबींत वरच्या पायरीचा होता याबद्दल मला कधीं हि लवमात्र शंका नव्हती व नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच्या अनेक अलौकिक गुणां बद्दल अत्यंत आदर वाटत असल्यामुळेंच त्याचीं प्रेमळ व गोड मुक्ताफळें मीं शबरीप्रमाणें अत्यंत मेहनतीनें व प्रेमानें मिळवून महाराष्ट्राच्या आत्मारामा पुढें ठेवीत आहे. पण हें गोड काम करीत असतानां, ज्यांच्या ज्यांच्या शब्दांमुळें महाराष्ट्रांतील लोक सुदैवानें अथवा दुर्दैवानें प्रयत्नाच्या वाटेवरून मुरडून दैवाकडे वळले व अंध भक्तींत गढून जाऊन कार्यविन्मुख झाले त्या सर्वांत तुकारामाचे शब्द या कामीं जास्त लागू पडले असें मला वारंवार वाटलें. चांगल्या चांगल्या शहाण्या, व एरवीं राखोळी शिवाय कोठें हि वावरूं देण्यास हरकत नाहीं अशा लोकांचीं मनें, कोणी हि मनुष्य या जडदेहानिशीं आपल्या टाळगोधडी सुद्धां उडून जाऊन

अदृश्य होऊं शकतो हें मानण्या इतकी दुबळी कशी झाली याचें मला पुन्हां पुन्हां नवल वाटलें. पोरी लहानपणीं बाहुल्या करतात, आणि त्यांना कोणीं नांवें ठेविलीं किंवा हंसलें म्हणजे त्या मोडून कुसकरून टाकतात व मुरकुंडी मारून बसतात, त्याप्रमाणेंच जरा कोणी वाचाटानें ब्र म्हटल्या बरोबर तुकारामानें आपल्या वह्या पाण्यांत बुडवीत सुटावें व खाणेंपिणें टाकून दगडावर मुरकुंडी मारून निजून रहावें, हें एक त्याच्या हळुवार स्वभावामुळें होऊं शकेल; पण असें होतांच—अजून तुकारामाचें साधुत्व पिकून तयार व्हावयाचें होतें तोंच—सृष्टिक्रम उरफाटा करून त्या वह्या तारून ईश्वरानें याची समजूत घातली हें अजून हि हे लोक बुद्धीला व कल्पनेला विशेष त्रास न पडूं देतां खरें मानूं शकतात याचें आश्चर्य वाटलें. आणि लोकांच्यापेक्षां तुकाराम स्वतः च हें खरें मानी व आपल्याकरतां सृष्टी हि आपला क्रम बदलते अशी भावना करून घेई हें तर फारच गमतीचें वाटेल. जें प्रत्यक्ष अभिमन्यूकरितां श्रीभगवान् कृष्णाला करतां आलें नाहीं तें करून तुकाराम मेलेलें मूल सहज जिवंत करूं शकतो, व जो आपली सर्व चीजवस्त दारच्या मागणेकऱ्याला सहज देऊं शकतो त्याला, आपले चार दोन अभंग बदलून सालोमालोनें त्यांत आपलें नांव घातल्याचा इतका राग यावा याचा तर मला कधीं च उलगडा झाला नाहीं. तुकारामासारख्या परदुःखानें विव्हळ होऊन जाणाऱ्या प्रेमळ मनाच्या पुरुषाला, सभोंवतीं लोकांची दुर्दशा उडालेली पाहून, अनेक तऱ्हेच्या संकटतापानें जग गादलेलें दिसत असतां त्यांतून कांहीं मार्ग-उपाय काढण्याकडे त्याचे कुशाग्र व विशाल बुद्धीनें वळूं देखील नये, व लाज राखण्यापुरती कंबरेला लंगोटी लावून कदान्न खावें व त्यांत च समाधान मानावें हें च तो लोकांना शिकवीत सुटला याचें फार आश्चर्य वाटे. अशा अडचणीच्या काळीं हि उद्योगधंदा न करतां, आपल्या पोटाचा भार हि शेजाऱ्यावर च टाकावा ही त्याची शिकवण लोकांना पटलेली पाहून त्याच्या वाणीचा जोर मात्र नजरेस पडतो. खेड, चाकण, कडूस वगैरे प्रांतांतील वैष्णवभक्त पाहिले व पंढरीस अनेक कष्ट सोसून जाणाऱ्या लक्षावधि वारकऱ्यांच्या झुंडी पाहिल्या म्हणजे ईश्वरानें कोणा एकाद्याच्या अंगांत कांहीं विशेष गुण दिले असतां त्यांच्या योगानें आपल्या देशांतील लोकांचें बरें किंवा वाईट करणें हें ते गुण अंगीं असणाऱ्या मनुष्याच्या योजनेवर किती अवलंबून राहतें, हें मनांत येऊन मन चकित होऊन जातें. आणि जों जों एका च दिशेनें जास्त जास्त विचार करावा तों तों असें वाटूं लागतें कीं आपण यःकश्चित् सामान्य मानवी प्राणी या विभूतींच्या कृत्यांचें चिकित्सक बुद्धीनें नीटसें आकलन करण्याला केवळ अनधिकारी आहों. आपली दृष्टि यांच्या चरित्राकडे अशी लावणें हें अयोग्य आहे. व साधारण कसोटीनें या विभूतींचें मापन करूं जाणें केवळ गैर आहे. शेवटीं मनाचा असा सिद्धांत ठरतो कीं अशा विचारांनीं बुद्धी चळूं न देतां,

त्यांची आपल्या हातून होईल तेवढी सेवा चाकरी च तूर्त निमूटपणें करावी हें च श्रेयस्कर आहे. आणि असें शांत चित्तानें सदैव करीत राहिल्यास त्यांच्या चरित्राचें रहस्य आपणास त्यांच्याच रुपेनें हळूहळू नीट कळूं लागेल. आणि हे च विचार मनांत आणून आगखी खोल पाण्यांत मन वाहून न देतां तुकोबांचे शब्द आदिउगमाच्या दिशेकडे धुंडीत जाऊन जितके निर्मळ मिळवितां आले तितके मिळवून ते आज महाराष्ट्राच्या चरणीं मी सादर करतों. डाळिंबाची तुरट साल तेवढ्यापुरती काढून बाजूला ठेवून आंतील गोड दाणे जसे आपण आनंदानें घेतों, त्याप्रमाणें च ही प्रस्तावना आतां दूर ठेवून आपण या पुस्तकांतील गोड अभंगांचा आस्वाद आनंदानें घ्यावा. एखादे वेळीं ही तुरट साल गुणकारक असते हें खरें असलें तरी डाळिंब देणाराचा हेतु साल देण्याचा नसून आंतील दाणे खावयास देण्याचा असतो हें जाणलें पाहिजे.

विनायक लक्ष्मण भावे.

---

# तुकारामबुवांचा अस्सल गाथा.

वीठल १

+ + गारा : सीधसामग्री : अ + टणत्कारी दी + + + + सांगावें तें काई : सांगावें तें काई : वी + + + अनुभउ तो : ॥ छ ॥ अ + सांगो येतें + + + + व : करुनी उपावा घेउं होवा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे + + ले जीवनी जीवन : तेथें कोण कोण नाव ठेवी ॥ ३ ॥ छ ॥

२

( बा ) ळाचे जीवन : माता जाणे भुक तांन : ॥ १ ॥ धृ ॥ का ( य करुं ) वीनवणी : असो मस्तक चरनी : ॥ छ ॥ ( ठेविली ) ये ठांई : चींत ठेउनी आसें पांई : ॥ २ ॥ करीतो ( हे से ) वा : चींतन सर्व ठांई देवा : ॥ ३ ॥ नीउन्ये ते पुरे : ( घ्या ) वें करुनी दातांरें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे बुधी : आल्प असे अपराधी : ॥ ५ ॥ छ ॥

३

+ + वाचं बांधलें जवळी ते वसें : प्रकासी प्र + सर्वकाळ : ॥ १ ॥ अंतरी वसावी उत्तम + + उ काहीं तुटी नसे केवी : ॥ छ ॥ ब्रह्मड कव + ने साटी : धरावा तो पोटीं भाव बरा : **तुका** म्हणे लाभ घरीचीया घरीं : प्रेमतंतु दा + तां : ॥ ३ ॥ छ ॥

४

दुषवलें चीत आजीच्या प्रसंगें ॥ बहु पीडा जगे ( के ) ली देवा : ॥ १ ॥ धृ ॥ कधी हा समंध तोडीसी तें ने ( णे ) : ( आ ) ठउनी मनें पाये असे : ॥ छ ॥ आणीकांची येती ( अंत ) रा अंतरें : सुषदुष बरें वाईट तीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे ( घडे ) येकांताचा वास : तरी च या नास समंधाचा : ॥ ३ ॥

५

काये दीनकरा : कोंबड्याने केला षरा : ॥ १ ॥ धृ ॥ का ( हो येसा ) संत ठेवा : भार माझे माथां देवा : ॥ छ ॥ आडवीलें दासीं : तरी कां मरती उपवासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे हाती : कळा सकळ अनंतीं : ॥ ३ ॥ छ ॥

६

+टे ये ची ठाई : बहु पाई संताचे : ॥ १ ॥ धृ ॥ + + + नीवारली चींता हे ॥ २ ॥ **तुका** म्हणे + + + लागती :

७

पदोपदी दील्हे आंग : जालें सांग कारण : ॥ १ ॥ धृ ॥ रुघउनी ठेलो ठाव : जगा वाव सकळ : ॥ छ ॥ पुढती + + + +

८

देउं कपाट : कीं कोण काळ राषो वाट : ॥ १ ॥ धृ ॥ काये होईल ते सीरीं : अज्ञा धरुनीयां करी : ॥ छ ॥ करुं कळे यैसी मात : किंवा राखावा येकांत : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जागो कींवा कोण्हां नेडुं वागो : ॥ ३ ॥

९

+ र्णो तों समये : परी मत कामा नये : ॥ १ ॥ धृ ॥ तुंम्हीं + गावें तें बरें : देवा सकळ वीचारें : ॥ छ ॥ फुकाची + + पुसी : चींता नाही होते असी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे + + : धर पाये मज साहे : ॥ ३ ॥ छ ॥

१०

द्वारपाळ विनती करी : उभे द्वारीं राउळा : ॥ १ ॥ धृ ॥ ( आ ) पुलीया शरणांगता : वाहों चींता नेंदावी : ॥ छ ॥ ( वचनां ) चीत द्यावें : असो ठावें पायासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे कृपासींधु : दीनबंधु केशवा :॥ छ ॥

११

+ दोही बांहीं आम्हां वास : आसों कास घालुनी : ॥ + + बोलो उमयेतां : स्वामीसता सेवेचें : ॥ छ ॥ + + + अज्ञा केली : असों च + + ते नीती : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जो हारी तों : आहें + तों ते ठांई ॥ ३ ॥

१२

आईकाजी देवा माझी वीनवणी : मस्तक चरणी ठेवीतसे : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ सनीध पातोलों सांडुनीयां संका : सन्मुष ची येकायेकी पुढें : ॥ छ ॥ जाणवीले कोठें पावे पायांपासीं : केली या जीवासी साटी म्हुण ॥ २ ॥ **तुका** म्हणे माझे हातीं दया उधार : करी कर (कर) म्हणउनी : ॥ ३ ॥ छ ॥

१३

मायेबापापुढें लेंकराची आळी : आणीक हे पाळी कोण लळे : ॥ १ ॥ धृ ॥ सांभाळाजी माझी वीशमें अनंतां : जवळी आसतां अव्हेरु कां : ॥ छ ॥ आणी-

कांची चालें सता आम्हावरीं : तुमची ते थोरी काये मग : ॥२॥ **तुका म्हणे** आलो दुरुनी जवळी : आतां टाळाटाळी करु नये ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१४

बैसोलों तों कडीये वरी : नव्हें दुरी वेगळा : ॥ १ ॥ धृ ॥ घडलें हें बव्हा दीसा : आतां ईछा पुरवीन : ॥ छ ॥ बहु होता जाला सीन : नाही क्षीण वीसांवां ॥ २ ॥ दुषी केलें नेणेंपणें : जवळी नेणें होतें तें : ॥ ३ ॥ पाहात + + + + + +

१५

तुझें नाम मुषी तयासी वीपती : अस्चींर हें चीती वाटतसें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ काये जाणो काये होसील नीजेला : नेणोजी वीठला मायेबापा : ॥ छ ॥ भवबंधनाचें तुटतील फांसें : तें कां येथें अैसें अव्हेरीले : ॥ २ ॥ **तुका म्हणे** माझें द्चकलें मन : वाटे वायां वीण स्रम केला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१६

सेवकें करावें सांगीतले काम : सीक्याचा तो धर्म स्वामी राषे : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ काये देवा नेणो आलें गार्ढेपणं : तुम्ही शत्कीहीण जाले दीसा : ॥ छ ॥ वीस्णुदास आम्ही नीर्भर ज्यां बळें : ते दीसे या काळे अव्हेनलें : ॥२॥ **तुका म्हणे** मुळ पाठवा लोकरी : कीवा करु ही काये सांगा ॥ ३ ॥ छ ॥ छ १०० ॥

१७

तुम्ही बैसलेती नीर्गुणाचे षोळें आम्हां कां हे डोळे कान दील्हे : ॥ १ ॥ धृ ॥ नाईकवे तुझी अपकीर्त देवा : अव्हेरली सेवा नेद्षवे : ॥ छ ॥ आपलें पोटीं तो राषीयेला वाव : आम्हांसी का भाव अल्प दील्हा : ॥ २ ॥ **तुका म्हणे** दुषी असेल कळों द्या : पुढीलीया धंद्या : मन नेघे : ॥ ३ ॥

१८

अैसें कां जालें ते मज न कळे : कीर्तनाचें रळेपळे जगीं : ॥ १ ॥ धृ ॥ कैसें तुम्हां देवा वाटतसे बरें : संतांची उत्तरें लाजवीली : ॥ छ ॥ भांवीकां कंटक करीताती पीडा : हा तवं रोकडा : अनुभव : ॥ २ ॥ **तुका म्हणे** नाम नीर्वाणीचा बान : याचा आभीमान नाही तुम्हा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१९

धीग जीणें ज्याचा स्वामी हीनवर : मरणें तें वर भलें मग : ॥ १ ॥ धृ ॥ आईकाजी देवा अैसी अहे नीत : काये ते उचीत साभाळंवें : ॥ छ ॥

देसोदेसीं धाक जयाच्या उतरें : तयाचे कुतरें परी भलें : ॥ २ ॥ तुका म्हणे का हे सुचलें उतरें : जाणोनी अंतर वोळषावें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ।

२०

षेळतां नीभावें समर्थाच्या बळें : तयाच्या सकळें सतेषालीं : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ तरी लेववीला शोभे अलंकार : नाहींतरी भार मानावीन : ॥छ॥ अवघी च दीसा असाई मोकळी : मायेबाप बळी म्हणउनी : ॥ २ ॥ अैईसे आहे जी देवा : म्हणउनी सेवा समर्पीली : ॥ ३ ॥ छ ॥ ६ ॥

२१

पुसावेंसे हे वाटें : जें जें भेटे तयासी : ॥ १ ॥ धृ ॥ देव कृपा करील मज : काये लाज राषैल : ॥ छ ॥ अवघीयांचा वीसर जाला : हो राहीला उद्वेग : ॥ २ ॥ तुका म्हणे चींतां वाटे : कोण भेटें सांगसें : ॥ ३ ॥ छ ॥

२२

नीरांजनी येकटवाणें : सांग नेणे दुसरा : ॥ १ ॥ धृ ॥ पाहा चाळवीले कैसें : लाउनी पीसे गोवळे : लपलें आंगें आंग : दील्हा संग होता तो : ॥ २ ॥ तुका म्हणे नव्हेतें ठावें : जालें भावें वाटोळें : ॥ ३ ॥ ३ ॥ छ ॥ १०६ ॥

२३

नव्हती भेटी तो ची बरें : होतां चोरें नाडीलें : ॥ १ ॥ धृ ॥ आवघीयांचा केला झाडा : रीता वाडा षोंकर : ॥ छ ॥ चींतनाचें मुळ चीत : नेलें वीत हरुनी : ॥ २ ॥ तुका म्हणे मुळा अले : होतें केले तैसें ची : ॥ ३ ॥ छ ॥

२४

जये ठांई आवडी ठेली : मज ते बोली न सडें : ॥ १ ॥ धृ ॥ पुरवावें जीवींचें कोड : भेटी गोड तुज मज ॥ छ ॥ आणीलें तें येथेंवर : रुप दुरी न करावें : ॥ २ ॥ तुका म्हणे नारायेणा : सेवाहीण। धीग वृती : ॥ ३ ॥ छ ॥

२५

सरलीयाचा सोस मंनी : लाजोनीयां राहीलों : ॥ १ ॥ धृ ॥ आवडीनें बोलावीतों : येथें तें तों लपावें : ॥ छ ॥ माझें ते ची मज द्यावें : होतें भावें जोडीलें : ॥ २ ॥ तुका म्हणे वीस्वंभरा : आळीकरा बुझावा ॥ ३ ॥

२६

नाचावेंसें वाटे मना : छद गुणाआधीन : ॥ १ ॥ चेस्टवीली माझीं गात्रें : सतासूत्रें हालती : ॥ नामे रूपें रंगा आली : तें ची चाली स्वभावें : ॥ २ ॥ तुका म्हणे पांडुरंगें : अंगसगें कवळीलें : ॥ ३ ॥ छ ॥

२७

षेळोतों तो षेळ पांयांच्या प्रसादें : नव्हेती ही छेदें नासीवंतें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ माझा मायेबाप उभा ईटेवरी : कवतुकें करी कृपादान ॥ छ ॥ प्रसादाची वाणी वर्दे तें उतरें : नाहीं मतांतरें जोडीयेलीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे रस वाढोतीया आंगे : छाया पांडुरंगें केलीवरी : ॥ ३ ॥ छ ॥

२८

सेवट तों भला : माझा बहु गोड जाला : ॥ १ ॥ धृ ॥ आलों निजांच्या माहेरा : भेटी रखुमाईच्या वरा : ॥ छ ॥ परीहरु जाला अवघ्या दुषाचा मागील : ॥ **तुका** म्हणे वाणी : गेली आतां घेउं धणी : ॥ ३ ॥ छ ॥

२९

अषंड मुडतर : सासुरवास करकर : ॥ १ ॥ धृ ॥ याची जाली बोळवण : आतां नेद्षों तो सीण : ॥ छ ॥ बहुतांचीं दासी : तये घरी सासुरवासीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मुळें : षंड जाला येका वेळे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३०

धरीली जी होती : चीती डोळां ती दीसती : ॥ १ ॥ धृ ॥ आले आवडीस फळ : जालें कारण सकळ : ॥ छ ॥ घेईन भातुकें : मागोणीयां कवतुकें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे लाड : वीठोबा पुरवील कोड : ॥ ३ ॥ ॥ छ ॥ ११४

३१

बहुतां दीसांची आजी जाली भेटी : जाली होती तुटी काळगती : ॥ १ ॥ धृ ॥ येथे सावकासें घेईन ते धनी : गेली आडचनी उगवोणी : ॥ छ ॥ बहु दुष दील्हे होते घरी कामें : वाढला हा स्रमें श्रम होता : ॥ २ ॥ बहु दीस होता पाहीला मारग : क्लेशांचा त्या त्याग आजी जाला : ॥ ३ ॥ बहु होती केली सोंगसंपादणी : लोकीकापासुनी नीर्गमलें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे येथें जालें अवसान : परमानंदी मन वीसांवलें : ॥ ५ ॥ छ ॥

३२

जेवीतां ही धरी : नाक हागतयां परी : ॥ १ ॥ धृ ॥ यैसीयाचा करी चाळा : आपली च अवकळा : ॥ छ ॥ सांडावें मांडावें : काये अैसें नाही ठांवें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे करी : ताका दुधा येकी सरी : ॥ ३ ॥ छ ॥

३३

सोंगें छंदें काहीं : देव जोडे अैसा नाही : ॥ १ ॥ धृ ॥ सारा अवघे गावाळ : डोळ्या अडुनी पडळ : ॥ छ ॥ शुध भावावीण : केला तो तो होये सीण : ॥ २ ॥ तुका म्हणे कळे : परी होतील अंधळे : ॥ ३ ॥ छ ॥

३४

अवघी भुतें साम्यां आली : देषीली म्या कै होती ॥ १ ॥ धृ ॥ वीस्वास तो षरा मग : पांडुरंगकृपेचा ॥ छ ॥ माझी कोन्ही न धरी संकां : अैसें हों कां नीर्द्वंद : ॥२॥ तुका म्हणे जें जें भेट : तें मी वाटे हो अैसें ॥३॥छ॥

३५

अवघा भार वाटे देवा : संतसेवा न घडतां : ॥ १ ॥ धृ ॥ कसोटी हे असें हातीं : सत्य मुर्ती भगवंत :॥ छ ॥ चुकलोंसा दींस पंथ : गेंलें संत तो अैसा : ॥२॥ तुका म्हणे सोग वायां : कारण या अनुभवें : ॥ ३ ॥ छ ॥

३६

सत्य सकल्पाचा दाता नारायेन : सर्व करी पुर्ण मनोरथ : ॥ १ ॥धृ॥ येथें अळंकार सोभती सकल : भावबळें फळ ईछेचे तें : ॥ छ ॥ अंतरींचें बीज जाणें कळवळ : व्यापक सकळ ब्रम्हांडाचा : ॥ २ ॥ तुका म्हण नाही चालत तातडी : प्राप्तकाळ घडी आल्यावीण : ॥ ३ ॥ छ ॥

३७

अंतरेंची गोड : राहे आवडीचें कोड : ॥ १ ॥ धृ ॥ संघटणे येती आंगा : गुण दोश मनभंगा : ॥ छ ॥ उच्चीताच्या कळा : नाही कळती सकळा : ॥ २ ॥ तुका म्हणे अभावणा : भावी मुळ तें पतना : ॥ ३ ॥

३८

सीळा जयां देव : तैसा फळे त्यांचा भाव : ॥ १ ॥ धृ ॥ होये जतन ते गोड : अंतराये येती नाड : ॥ छ ॥ देव ज़ोडे भावे : ईछेचें तें प्रेम घ्यावे : ॥ २ ॥ तुका म्हणे मोड दावी : तैसी फळें आली व्होवी : ॥ ३ ॥ १२३ ॥

३९

करावें चीतंन : ते ची बरे नेमेटोन : ॥ १ ॥ धृ ॥ बरवा आगी राहे भाव : तो गे तो ची जवळी देव : ॥ छ ॥ दरशनाची उरी : अवस्था ची आंग धरी : ॥ २ ॥ तुका म्हणे मन : तेथें सकळ कारण : ॥ ३ ॥ छ ॥

४०

कासयाजी अैसा माझे माथां ठेवा : भार तुम्ही देवा संतजन : ॥ १ ॥ धृ ॥ वीचीत्र वीदाणी नाना कळा षेळे : नाचवी पुतळे नारायेन : ॥ छ ॥ काये वाणराचें आंगीची ते शग्ती : उदकां तरती वरी सीळा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे करी नीमीत्य ची आड : चेस्टउनी जड दावी पुढें : ॥ ३ ॥ छ ॥

४१

पायां पडवें हे माझें भांडवळ : सरती हे बोळ कोठे पांई : ॥ १ ॥ धृ ॥ तरी हें सलगी कवतुक केलें : लडीवाळ धाकुलें : असें बाळ : ॥ छ ॥ काये उने तुम्हां संताचीये घरी : वीदीत यापरी सकळ ही : ॥ २ ॥ **तुका** म्हणे माझें उचीत ते सेवा : नये करू ठेवाठेवी कांही ॥ ३ ॥ छ ॥

४२

वद्वावी वाणी माझी क्रुपावंता वागपुस्पे संतां समर्पीसी : ॥ १ ॥ धृ ॥ सर्व संकटाचा तुम्हां परीहार : घालावा म्यां भार : पांडुंरंगा : ॥ छ ॥ येकसरें चीत ठेउनीयां पाई : जालों उतराई होतें तेणे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे येथें जालें अवसान : कायावाचामन वेचुनीयां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४३

नमावे पाये हे माझें उचीत : असीर्वादें हीत तुमचीया : १ ॥ क्रुपेचा वोरस न समाये ची पोटी : म्हणउनी उफराटी : वचने हीं : ॥ २ ॥ तुमंची उस्टावळी ते माझें भोजन : झाडावें आंगण केरपुंजें : ॥ ३ ॥ परी अैसें पुन्ये नाही माझें गाठी : जेणे पडे मीठी पायांसवे : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे राहे आठवण चीतीं : क्रुपा अैसी संती केली तुम्हीं : ॥ ५ ॥ छ ॥

४४

काये नाहीं माता गौरवीत बाळा : काये नाही ळळा पाळीत तो : १ ॥ काये नाही त्याची करीत ते सेवा : काये नांही जीवा गोमटे तें : ॥ २ ॥ अमंगळपणें कंटाळा न धरी : उचुलुनी करी कंठी लावी : ॥ ३ ॥ लेववी आपलें आंगी अळकार : संतोशावें फार देषोनीयां : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे स्तुती योग्य नाही परी : तुम्हां लाज थोरी अंकीताची : ॥ ५ ॥ छ ॥ छ

४५

काये वाणु आतां न पुरे हें वाणी : मस्तक चरणी आसो माझा : ॥ १ ॥ थोरीव सांडीली अपली परीसें : नेणें सीवो कैसें लोषंडासी : ॥ २ ॥

जगाच्या कल्याणा संताच्या वीभुती : देहे कस्टवीती उपकरें : ॥ ३ ॥ भुतांची दया हे भांडवल संता : आपल्या ममंता नाही देही : ॥ ४ ॥ तुका म्हणे सुष परावीया सुषें : अम्रुत हे मुषें स्रवतसे : ॥ ५ ॥ छ ॥ १२९

४६

जन्मा आंलों त्याचें : आजी फळ जालें साचें : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्ही सांभाळीलो संती : भये निरसली षंती : ॥ छ ॥ कुत्याकुत्य जालो : ईछा केली ते पावलों : ॥ २ ॥ तुका म्हणे काळ : आंतां करुं न सके बळ : ॥ ३ ॥ छ ॥

४७

काये पुन्यरासी : गेल्या भेदुनी आकासी : ॥ १ ॥ धृ॥ तुम्ही जालेती कुपाळ : माझा केला जी साभाळ : काये उग्ळले संचींत : असें नेणवे अगणीत : ॥ २ ॥ तुका म्हणे नेणें : काये केले नारायेणे : ॥ ३ ॥ छ ॥

४८

असें यथीचीया दीन : भाग्यहीण सकळा : ॥ १ ॥ धृ ॥ भाडवल येव्हेढे गांठी : नाम कंठी धरयिलें ॥ छ ॥ आणीक तें दुजे कांहीं : मज नाहीं यावरी ॥ २ ॥ छ ॥ तुका म्हणे केला कोणे : येव्हडा नेणें लोकीक : ॥ ३ ॥

४९

आतां तुम्ही कुपावंत : साधु संत जीवलग : ॥ १ ॥ धृ ॥ गोमटें तें करा माझें : भार वोझें तुम्हंसी : छ ॥ वंचीलें तें पायांपासी : नाहीं यासी वेगळें ॥ २ ॥ तुका म्हणे सोडिल्या गांठीं : दील्ही मीठी पांयांसी ॥ ३ ॥ छ

५०

सुष वाटे परी वर्म : धर्माधर्म न कळें : ॥ १ ॥ धृ । गायेनाचें येव्हडें जाणें : वीठल म्हणे नीर्लज : ॥ छ ॥ अवघें माझें येव्हेडें धन : साधन हीं सकळ : ॥ २ ॥ तुका म्हणे पांयां पडें : तुमच्या कोडें संतांच्या : ॥ ३ ॥

५१

सेवटी हे वीनवनी : संतजनी परीसांवी : ॥ १ ॥ धृ ॥ वीसरु तो न पडावा : माझा देवा तुम्हांसी : ॥ छ ॥ पुढें फार बोलो काई : अवघें पाई वीदीत : ॥ २ ॥ तुका म्हणे पडीलों पांयां : करा छाया कुपेची : ॥ ३ ॥ छ

५२

पुत्र जाला चोर : मायेबापा हरुश थोर : ॥ १ ॥ धृ ॥ अतां काशा-साटी जोडी : हाट घाटें गुडगें घडी : ॥ छ ॥ अईतें अपाहार : आणुनीयां भरी घर : ॥ २ ॥ मानीली नीस्वीतीं : नका ज्याया उभयेती : ॥ ३ ॥ झोडाझोडगींचे पोटीं : फळे वीजाती कंरटी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणें बेटचा : भाडवल न लगें षटऱ्या : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १३५

५३

येवढी अपकीर्ती : आईकोणीयां फजीतीं : ॥ १ ॥ धृ ॥ जरी दावील वदन : थुंका थुका तो देषोन : ॥ छ ॥ काळीमेचे जीणे : जेउनीयां राहे सुणे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे गुण : दरुशणे अपशकुण : ॥ ३ ॥ छ ॥

५४

हो का पुत्र पत्नी बंधु : त्याचा तोडावा समंधु ॥ धृ ॥ कळो आलें षटऱ्याळसें : सीवो नये लीपो दोशें ॥ छ ॥ फोडावे मडकें : मेले लेषी घाये येकें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे त्यागें : वीण चुकीजेणा भोगें : ॥ ३ ॥ छ ॥

नाट ५५

बरवा जाला वेवसाव : पावलों चीतींला ची ठाव : दृढ पांई राहीला ये भाव : पावला जीव : वीश्रांती : ॥ १ ॥ बरवे फळले शकुण : अवघां मीवारला सीण : तुमचें जालीयां दरुशन : जन्ममरण नाहीं आतां : ॥ २ ॥ बरवें जालें आलो या ठाया : होतें संचीत ठांईचा पाया : देहेभाव पालटली काया : पडीली छाया ब्रम्हीची : ॥ ३ ॥ जोडलें न सरे हें धन : अवीनाश अनंदघन : अमुर्तमुर्ती मदशुदन : समचरण देषीयेला : ॥ ४ ॥ जुनाट जुगादींचें नाणें : बहुतां काळाचें ठेवणें : लोपलें होतें पारीषेपणे : ठाव चळनें चुकवीला ॥ ५ ॥ आतां या जीवाचीये साटी : न सोडी पडीलीयां मीठी **तुका** म्हणे सीणलों जगजेंठी : न लगो दीठी दुसऱ्याची : ॥ ६ ॥ छ ॥

नाट ५६

[व. पृ. २५] आतां पावैन सकळ सुषें : षादलें कदा ते नषें : अवघें सरलें पारीषें : सकळ देषें माहीयेर : ॥१॥ जवळी वीठलरषमाई : बहीणी बंधु बाप आई : सकळ गोताची च साई : पारीषें काई : अैसे नेणींजे : ॥ २ ॥ जगदाकारी जाली सता : वारोनी गे प्राधीनतां : अवघें आपुले ची आतां : लाज आणी चीतां दुरावली : ॥ ३ ॥ वावरें ईछा वसे घरी : आपुले सतेंचे माहेरी : करवीं

तैसें आपण करी : भीड न धरी चुकल्यांची : ॥ ४ ॥ सोसीला होता सासुरवास : बहुतांचा बहु दीवस : बहु कामें पुरवीला सोस : आतां उदास आपुल्यात : ॥ ५ ॥ करीती कवतुक लाडें : मज बोलवीती कोडें : माये बापे उतरें गोडे : बोले बोबडें पुढें तुका : ॥ ६ ॥ छ ॥ १४९

नाट ५७

सर्व सुषाचीया असा जन्म गेला : क्षीण येक नाही मुग्तीयत्न केला : हींडतां दीसा सीण पावला : माया वेवस्टीला जीव माझा ॥ १ ॥ माझें स्वहीत नेणती कोन्ही : कांही न करीतां मजवांचुनी : सजनें तव सुषमाडनी : नेणती कोन्ही अदीअंत : ॥ २ ॥ काये सांगो गर्भीची यातना : मज भोगीतां नारायेना : मांउंस मळ मुत्र जाणा : तुज क्षीणक्षीणा : ध्यातु असे : ॥ ३ ॥ मज चालतां प्रयानकाळी : असती न दीसें जवळी : मृतीके मृतीका कवळी : येकला मेळीं संचीताचीये : ॥ ४ ॥ आतां मज यैसें करी गा देवा: कांही घडे तुझी चरणसेवा : तुका वीनवीतसें केशवा : चालवी दावा : संवंसारेसी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १४४ १४१

नाट ५८

आगा ये सावळ्या सगुणा : गुननीधी नारायेना : आमंची परीसावीं वीज्ञापणा : सांभाळा दीना अपुलीया : ॥ १ ॥ बहु या उदराचे कस्ट : आम्हांसी केलें कर्मभ्रस्ट : तुमची चुकवी वाट : करी वट्वट : या च नीमीत्यें : ॥ २ ॥ जालो या पांगीला जनासी : संवंसाराची अंदनी दासी : न कळें कधीं सोडवीसी : बहुत फांसी : द्रुढ बांधलो : ॥ ३ ॥ येथे तो न ये आठवों कांहीं : वीसांवां क्षीण तो ही नाही : पडीलों आणीकीये वाही : हीत तों काहीं दीसचना : ॥ ४ ॥ जीवींत्व वेचलें वीयोगें : हीडतां प्रवासी वाउगे : कांहीं या व्याधी पीडारोगे : केली या भोगें तडातोडी : ॥ ५ ॥ माझा मी च जालो आपना शत्रु : कैची पुत्र दारा कैचे मीत्रु : कासया घातला पसरु : आहो जगुरु : तुका म्हणे : ॥ ६ ॥ छ ॥

नाट ५९

[व. पृ. २६] आतां मज धरवावी सुधी : येथुनी परतवावी बुधी : ध्यावें सोडउनी कुपानीधी : सांपडलों मधी : काळचक्रीं : ॥१॥ करीसील तरी नव्हे काई: राईचा डोंगर परर्वत राई : अपलें करुणेची साई : करी वो आई मजवरी : ॥ २ ॥ मागील काळ आज्ञांनपणे : सरला स्वभावें त्या गुणे : नेणें आयुस्य

जालें तें उणें : पुढील पेणे : अंतरलें : ॥ ३ ॥ आतां मज वाटतसे भये : दीवसें दीवस चालत जाये : येथे म्यां येउनी केलें काये : नाही तुझें पाये आठवीलें : ॥ ४ ॥ करुनी अपराधक्षेमा : होतील केले पुरुशोतमा : आपुला नामीं द्यावा प्रेमा : सोडवीं स्रमा : पासुनीयां : ॥ ५ ॥ ऱ्हुदये वसो तुमच्या गुणी : ठाव हा पांयांपे चरणी : करुं हा रस सेवण वाणी : फीटें तो धणी तुका म्हणे : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥ १४५

नाट ६०

चांगल तरी तु पुर्णकाम : गोड तें तरी तुमचें नाम : द्याळु तरी अवघा धर्म : भला दासां श्रम होउं नेंदी : ॥ १ ॥ उदार तरी लक्ष्मींसीं : जुझार तरी कळी-काळासी : चतुर तरी गुणाची च रासी : जाणता त्यासी : तो ची येकु : ॥२॥ जुनाट तरी हा बहुत काळा : न कळे तरी याची च लीळा : नेणतां गोवळी गोवळां लाघवी अबळाभुलवणा : ॥ ३ ॥ षेळु तो येणे ची षेळावा : नट्ट तो येणें ची अवगावा : लपोनी जीवी न कळे जीवा : धरीतां देवा : नातुडसी : ॥ ४ ॥ गांढ्या तरी भावाचा अंकीत : बराडी उचीस्टाची प्रीत : वोंगळ वोंगळ कुबीजेसी रत : भ्याड आनंत : बहु पापा : ॥ ५ ॥ उंच तरी तुं बहुत उंच : नीच तरी बहुत नींच : तुका म्हणे बोलीलो हे साच : नाहीं आहाच पुजा केली : ॥ ६ ॥ छ ॥

**नाट ६१**

जेणें हा जीव दील्हा दान : तयाचें करीनं चींतन : जगजीवण नारायेन : गाईन गुण तयाचे : ॥ १ ॥ जो ये उभा भीमरेचा तीरीं : कट धरुनीयां करीं : पाउलें सम ची साजीरीं : अंतरी धरुण राहेन तीं : ॥ २ ॥ जो या असुरांचा काळ : भग्तजनप्रतीपाळ : षेळ ही लाघवें सकळ : तयाच्या भाळ पांयांवरी : ॥ ३ ॥ जो या गोपाळांचा मेळी : षेळु षेळें वनमाळी : रसांतळा नेला बळी : राहे पाळीं स्वामी माझा : ॥ ४ ॥ जो हा लावन्येपुतळा : तयाचें आंगी सकळ कळा : जयाचें गळा वैजअंती माळा : तया वेळोवेळा दडवत : ॥५॥ जयाचे नाम पाप नासी : लक्ष्मी यैसी जयाची दासी : [व. पृ. २७] जो (हा) तेजपुजरासी : सर्व भावें त्यासी तुका शरण : ॥ ६ ॥

**नाट ६२**

कै देषता होईन ये डोळी : सकळां भूतीं मुर्ती सांवळी : जीवा नावें भुमंडळीं : जळीं स्थळी : कास्टी पास्याणी : ॥ १ ॥ अैसी क्रुपा करील

१ ' कान्होबा ' अशीं अक्षरें वहींत या ठिकाणीं आहेत.

नारायेण : जीव या जगाचा होईन : प्रेमसागरीं बुडईल मन : होईल स्तान अनुतापी : ॥ २ ॥ अैसा कई येन दैवांस : द्रुस्ये नासोनी जाईल आस : सदा संतचरणी थाहाचा वास : सेवीन शेश धणीवरी : ॥ ३ ॥ कै नवसा येती अंकुर : सुषा नाहींसा होईल पार : अमृतें प्रुथीवीजळ सागर : वाहाती पुर अनंदाचें : ॥ ४ ॥ प्रसन दया क्षेमा शांती : कैं नववीधा होईल भगती : भोगीन वैराग्येसंपती : मनोरथ कळती : तई पुरलें : ॥ ५ ॥ **तुकया**बंधु म्हणे सांग : णह्वे तुजवीण नीरसेना पांग : म्हणंउनी घातलें सास्टांगं : पांडुरंगावरी चरणां : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

## नाट ६३

तु बळी बळीयां सीरोमणी : आहेसी माजीये त्रीभुवनी : रीघालों पाठी तुझी म्हणउनी : आतां करी मनी आसैल ते : ॥ १ ॥ तुं देवा प्रताप-दींनकर : सुरअसुरांचा सुर : माहा वीरां वीर धनोर्धर : मी तो पामर : काये तेथें : ॥ २ ॥ २ ॥ क्रुपासींधु दीनवछळ : फोडीली देवांची बंद्साळ : राक्षेसदळ सव्हांरुणी : ॥३॥ उपकर्म करावा बहुत : तरी तुं जाणसी धर्मनीत : उचीत कये तें अनुचीत : राष सरनागत आलों आतां : ॥ ४ ॥ कीती म्यां काये वीनवावें : **तुकयाबंधु** म्हणे करवें : क्षेम आघवें येणे काळें : ॥ ५ ॥ छ ॥

## नाट ६४

देवा मीं चांडांळ चाडाळ : म्हणतां लागोतो हे वेळ : नसें पाहातां मुमंडळ : अैसा अमगळ : षळ दुसरा : ॥ १ ॥ जन्म उपजलीयापासुनी : असते कर्मे ते अझुनी : सते आचरण नेणे स्वप्नी : नीषळ षाणी आवगुणाची : ॥ २ ॥ भगती दया अथवा कथा : कानी न साये हे वारता : अषड वीशयांची वेथा : अधम पुरता अधमाहुनी : ॥ ३ ॥ कामक्रोधडंबअहंकार : गर्वताठामदमछर : यांचें तरी माहेरघर : परउपकार : वैरी तैसा ॥ ४ ॥ नींदा द्वेश घात वीस्वास [ व. पृ. २८ ] : वारीतां नाहीं केला अळस : करूं नये ते केले संतंउपहास : अभक्ष भक्ष तें ही भलें : ॥ ५ ॥ पाळीलें नाही पत्रुवचन : सदा परद्वारी परधनी घ्यान : बोलों नये घडलें अैसें अनोवीन : दासीगमन अदीकरुनी ॥ ६ ॥ : कायामनवाचाईद्रीयांसी : सकळ पापाची च रासी : **तुकयाबंधु** म्हणे अैसीयासी : आलो रुसीकेशी : तुज शरण : ॥ ७ ॥

### नाट ६५

येक मागणे आहे रुसीकेशी : चीत सांगोतो दें या वचणासी : मज अतर तुझ्या चरनासी : न पडे अैसी क्रुपा करीं : ॥ १ ॥ न लगे दुजें काही आणीक : रीधीसीधी परलोक : स्वामी तेथे तु मी सेवक : षंडणा नको करुं यैसी : ॥ २ ॥ येईल मना जन्म तो देई : भलते याती भलते ठाई : ऱ्हुदई-हुनी परी न वजे : ॥ ३ ॥ ईतुले हे करी भतीयपरी : भलतीया भावें तुझीये द्वारी : राहें दासी होउनी कामारी : वदे वैषरी नीत राम ॥ ४ ॥ नको वीचरुं दुसरें आतां : सरन अलो जी पंढरीनाथा : **तुकयाबंधु** म्हणे क्रुपावंता : आहेसी दाता दानसुर : ॥ ५ ॥ छ ॥

### नाट ६६

काये काये करीतों या मना : परी नाईके नारायेणा : करुं नये त्याची करी वेवंचणा : पतना नेंऊं आदरीलें : ॥ १ ॥ भलती सवा धावें सईराट : वाट अढवांट दरे दरकुट : न वीचारी कडे काहीं कपाट : घात बळकट : मांडीयेला : ॥ २ ॥ नुपरती भ्रमंना दाही दीसा : सहीत पाताळा आकाशा: घाली उडी बळें ची देषोनी फांसा : केलो या देस पाहुणां : ॥ ३ ॥ चेतउनी ईंद्रीये सकळ : आसा त्रुस्णा कल्पना काम क्रोध काळ : दुरावीली सुध बुधी केली राळ : यैसें चांडाळ : अनीवार हें : ॥ ४ ॥ आतां काय कैसें करावें यासी : बहु जाचीलों केलो कासावीसी : **तुकयाबंधु** म्हणे रुसीकेसी : धांवं मज यैसी परी जाली : ॥ ५ ॥ छ ॥

### धुर्वक ६७

समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद : सामग्री ते सीध सर्व घरीं: ॥ १ ॥ आदराचें ठाई बहु च अदर : मागीतलें फार तेथे वाढी : ॥ २ ॥ न म्हणे सुह्रद सोईरा अवसेक : राजा आणी रंक सारीषे ची : ॥ ३ ॥ [व० पृ० २९] भाव देष तेथे करील बडबड : जडा राषे जड : नीराळें ची : ॥ ४ ॥ कोन्हा न वीसंभे याचकाचा ठाव : × उनीया देव संकां फेडी : ॥ ५ ॥ **तुका** म्हणे पोट भरोनी उरवी : आले यैसें दावी अनुभवा : ॥ ६ ॥ छ ॥

### ६८

आणुनीयां मना : अवघें धांडोळीलें षुणा : देषीला तो राणा : पंढरपुरनीवासी : ॥ १ ॥ धृ ॥ त्यासी अनुसरलें काये : घडे यैसें वायां जाये : देषीलें ते पाये : सम जीवी राहाती : ॥ छ ॥ तो देषावा तो वीध : चींतन तें

१ हा चरण काक पद घालून वर लिहिला आहे.

कार्ये सीध: आणीकां समध: नाही पर्वकाळासी: ॥२॥ तुका म्हणे षळ: होती क्षीर्णे ची निर्मळ: जाउनीयां मळ: वांळवंटी नांचती: ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

६९

पुंडलीक भक्तराज: तेणें साधीयेले हें काज : वैकुंठीचें नीज परब्रह्म आणीलें ॥ १ ॥ धृ ॥ पांडुरंग बाळमुर्ती : गाई गोपाळां संगती: येउनीयां प्रीती: उभें समची राहीले: ॥ छ ॥ येका आगळें अक्षेरें: वैकुंठ ची दुसरे: म्हणवीती येरें: परी ती यैसी नव्हेती: ॥ २ ॥ पाप पंचक्रोसीमधी: येउं न सके ची ना आधी: कैंची तेंथें वीधी: नीशधाची वसती: ॥ ३॥ पुराणें वदती यैसें: चतुर्भुज तें माणुसें: शुद्रसेनवसे: रीग न घडे कल्पातीं: ॥ ४ ॥ मांहां क्षेत्र हें पंढरी: अनुउपम्यं याची थोरी: धन्ये वारकरी: तुका म्हणें तेथीचें: ॥ ५ ॥ छ ॥

७०

धरीतां ये पंढरीची वाट: नाही संकट मुगतीचें: ॥ १ ॥धृ॥ वंदु येती देव पदें: त्या आनंदें उछायें: ॥ छ ॥ नृते छंदें उडती रज। जे सहज चालतां: ॥ २ ॥ तुका म्हणे गरुड टके: वैस्णव नीके सभ्रम: ॥ ३ ॥ छ॥

७१

वीचारीलें आधीं आपल्या मनासी: वांचों येथें कैसी: कोन्या द्वारें: ॥ १ ॥ धृ ॥ तंव जाला साहे न्हुदयेनीवासी: बुधी दीव्ही यैसी नास नाही: ॥ छ ॥ उद्वेगाचें होतों पंडीलो समुद्री : कोणे रीती तीरी पांवीजैल ॥ २ ॥ तुका म्हणे दुषें जाल अयुर्भाव: जाला बहु जीव: कासावीस: ॥ ३ ॥ छ ॥

७२

[व. पृ. ३०] रवीचा प्रकांस तो ची नीसी घडें नास: जल्या बहुवस तरी त्या दीपीका: ॥ १ ॥ धृ ॥ आतां हा ची वसों जीवी: माझें अंतरीं गोसावीं: होउं येती ठांवीं: काये वर्मे याच्यानी: ॥ छ ॥ सर्वे असतां धणी: आड येउं न सके कोन्ही: न लगे वीनवनी: पृथकाची कराई: ॥ २ ॥ जन्माचीया गर्ती: येने अवघ्या षुटती: कारण ते प्रीती तुका म्हणे जवळी: ॥३॥

७३

आपले वेचुनी षोडा घाली पाव। यैसेचीये भाव हीनबुधीचे: ॥ १ ॥ धृ ॥ वीशयांच्या संगे आयुस्याचा नास: पडीयेलें वोस स्वहीताचें: ॥ छ ॥

भुलल्याचें आंग आपन्यां पारीषें : छदाच सारीषें व्रततसें : ॥ २ ॥ तुका म्हणे दुष उमटे परीनामी : लंपटासी कामी : रातलीयां : ॥ ३ ॥ छ ॥

७४

केलें सकुनें प्रयाण : आतां मागे फीरे कोण : ॥ १ ॥ धृ ॥ होये तैसें होये आतां : देहे बळी काये चीतां : ॥ छ ॥ पडीलें पालवी : त्याचा धाक वाहें जीवीं : ॥ २ ॥ तुका म्हणे जीर्णे : देवा काये हीणपणें : ॥ ३ ॥

७५

दाउनीयां माड : पुरें न करी तें भांड ॥ १ ॥ धृ ॥ जळो जळो तैसें जीणें : फटमर लाजीरवाणें ॥ छ ॥ घेतलें तें सोंग : बरवे सपादावे साग : ॥ २ ॥ तुका म्हणे धीरें : देव नुपेक्षील षरें ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

७६

आळनी यैसें कळो आलें : त्यासी भलें मौने ची ॥ १ ॥ धृ ॥ नये काही वेचु वाणी : वेडे घाणी सांगातें ॥ छ ॥ वेगळें तें देहभावा : भ्रम जीवा माजीरा : ॥ २ ॥ तुका म्हणे कवतुक केलें : कींवा भलें दवडीतां : ॥ ३ ॥ छ ॥

७७

चीताचा चाळक : त्याचें उभये शुत्र येक : ॥ १ ॥ धृ ॥ नाचवीतें नाचें छंदें : सुषें अपल्या विनोदे : ॥ छ ॥ चंद्र कंमंळनी : नाहीं धाडीत सांगोनी : ॥ २ ॥ तुका म्हणे उठी : लोंहो चुंबकाचें द्रुस्टी ॥ ३ ॥

७८

करीतां तडातोडी : वछा मातें साई वोढी ॥ १ ॥ धृ ॥ करी त्याचा अग्रहो उरें : येक येकासाटी झुरे ॥ छ ॥ भुक ईछी अंनं : तें हीं त्यासाटी निर्मान : ॥ २ ॥ [व. पृ. ३१] तुका म्हणे जाती : येक येकांचीयें चीतीं : ॥ ३ ॥ छ ॥

७९

न पालटें जाती जीवाचीये साटी : बाहे ते ची पोटी दावी वरी : ॥ १ ॥ धृ ॥ अंतरीं सबाही सारीषा ची रंग : वीट आणी भंग नाहीं रसा : ॥ छ ॥ घणांचीया घायें पोटी सीरे हीरा : सांडु नेणें धीरा : आपुलीया : ॥ २ ॥ तुका म्हणे कढे करावी सीतळ : यैसें जातीबळ चंदनाचें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८०

करुनी संध्या स्नान : वारी षाउनीयां अंनं : ॥ १ ॥ धृ ॥ त्यासी

लाभ नाही हाणी : आदा वेचाचीये मानी : ॥ छ ॥ मजुराचें धन : वीळा द्रोग ची जतन : ॥ २ ॥ तुंका म्हणे नाही : देवा अधारापें काहीं : ॥ ३ ॥

८१

देवावरी भार : वृती आयाचीत सार : ॥ १ ॥ धृ ॥ देहे देवाचे साभाळी : मार योजे येथा काळीं ॥ छ ॥ वीस्वासी नीर्धार : वीस्वासल वीस्वंभर : ॥२॥ तुका म्हणे हावें : बळ येक ची जाणावें ॥ ३ ॥ छ ॥

८२

दील्ही मान तन्ही नेघावी स्तुची : शरण आलें त्यासी : जतन जीवें : ॥ १ ॥ धृ ॥ समर्थासी असे वीचाराची आण : भली पापपुन्ये वीचारावें : ॥ छ ॥ काकुळतीसाटी सत्याचा वीसर : पडीलें अतर न पाहीजे : ॥ २ ॥ तुका म्हणे येश कीर्ती आणी मान : करीतां जतन देव जोडे ॥ ३ ॥ छ ॥

८३

देहे मृत्याचें भातुकें : कळो आला कवतुकें : ॥ १ ॥ धृ ॥ काये मानीयेलें सार : हें ची वाटातें अस्वीर : ॥ छ ॥ नाणा भागांची संचीतें : करुण ठेवीलें अईनेः ॥ २ ॥ तुका म्हणे कोडी : उगउं न सकती बापुडी : ॥ ३ ॥

८४

त्यामें भोग माझ्या येतील अतरा : मग मी दातारा : काये करुं : ॥ १ ॥ धृ ॥ आतां असो तुझे पांई हें मोटळे : ईद्रीयें सकळें काया मन : ॥ छ ॥ सांडीमांडी वीचीनींसंचाचा ठाव : न कळतां भाव : जाईल वायां : ॥ २ ॥ तुका म्हणे आतां नको उजगरा : लपवी दातार आंगी मज : ॥ ३ ॥

८५

आमचीया भावें तुज देवपण : हे कां वीसरोण : राहीलासी : ॥ १ ॥ धृ ॥ समर्थासी नाहीं उपकारस्मरण [ व. पृ. ३२ ] दील्ह्या आठवण वाचुनीयां ॥ छ ॥ चळणवळण सेवकांच्या बळें : नीर्गुणाच्या मुळें : साभाळावें: ॥ २ ॥ तुका म्हणे आतां आलो पंडावरी : प्रेम देउनी हरी : बुझावणें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८६

नीघाले दीवाळे : जालें देवाचें वाटोळें : ॥ १ ॥ धृ ॥ आतां वेचु नये वाणीं : वीचारावें मनीच्या मनी : ॥ छ ॥ गुंडाळीली पोती : भीतरी लावीयेली वाती : ॥ २ ॥ तुका म्हणे करा : यैसा राहे माजी घरा : ॥ ३ ॥ छ ॥

८७

न सगांवे वर्म : जनी असों यावा भ्रमं : ॥ १ ॥ धृ ॥ उगी च लागतील पाठीं : होती रीती च हीपुस्टी : ॥ छ ॥ सीकवील्या गोठीं : सीकोन धरीतील पोटीं : ॥ २ ॥ तुका म्हणे सीण : होईल अनुभवावीण ॥३॥ छ॥ ४ ॥

८८

तीर्थाचीये आसे पंथ तों नीट देव : पावीजे तों ठाव अतराये : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ म्हणउनी भलें निस्वीळ ची स्थळी : मनाचीये मुळी : बैसोनींयां : ॥ छ ॥ संकल्पारुढ तें प्राधीन ची जीनें : कार्ये ची कारणें : वाढतसें : ॥ २ ॥ तुका म्हणे कामा नाहीं येक मुष : जीरवीतां सुष होतें पोटीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८९

अभीनव सुष तरी या वीचारें : वीचारावें बरें संतजनी : ॥ १ ॥ धृ ॥ रुपाच्या आठवें दोन्ही ही अपण : वीयोग तो क्षीण होत नाहीं : ॥ छ ॥ पुजा तरी चीतें कल्पा तें ब्रम्हाड : आहा च तो षंड येकदेसी ॥ २ ॥ तुका म्हणे माझा अनुभव यापरी : डोई पायांवरी ठेवीतसें : ॥ ३ ॥ छ ॥

९०

क्षीणक्षीणा हा ची करावा वीचार : तरावया पार भवसींधु : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ नासीवंत देह जाणा रे सकळ : आयुस्यु षातो काळ सावधान : ॥ छ ॥ संतसमागमी धरुनी आवडी : करावी तांतडी परमार्थीं : ॥ २ ॥ तुका म्हणे येहलोकीच्या वेव्हारे : नयें डोळे धुरे भरुनी राहों : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९१

कोणासी वीचार करावा सेवटीं : येवढ्या लाभें तुटी : जाल्या तरे : ॥ १ ॥ धृ ॥ साभाळीतो शुर आला घावडाव : पुढे दील्हा पाव न करी मागें : ॥ छ ॥ घात तो या णावें येथें अंतराये : अंत(र)ल्या पाये : गोवींदाचे : ॥ २ ॥ [ व. पृ. ३३ ] तुका म्हणे गडसंदीचा हा ठाव : केला तो उपावो कार्या येतो : ॥ ३ ॥ छ ॥

३

९२

आसा जी सोवळे : आहा तैसें ची नीराळे : ॥१॥ धृ ॥ आम्ही नयों तुमच्या वाटा : काये लटीका ची तांठा : ॥ छ ॥ चींतन ची पुरे : काये सलगी सर्वे धुरें : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : नका नावडे ते सेवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९३

अहंकार तो नासा भेद : जगीं नींद वोवळा : ॥ १ ॥ धृ ॥ नातळे तो धन्य यासी : जाला वंसी : दीपक : ॥ छ ॥ करवीतो अत्महत्या : नेदी सत्या आतोळों : ॥ २ ॥ तुका म्हणे गुरगुरी : माथां थोरी धरुनी : ॥ ३ ॥

९४

ईछीले ते सकुणवंतीं : होये देती तात्काळ : ॥ १ ॥ धृ ॥ क्षीरानीरा नीवाड करी : वरावरी वीठल ॥ छ ॥ भग्यावीण कैचें फळ : अंतर मळमुत्राचे : ॥ २ ॥ तुका म्हणे संचीत कुडे : ते बापुडें करीतसे : ॥ ३

९५

द्याल माळ तरी पडैन पायां : दंडवत वायां कोण वेची : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ आलें तें हीसोबें अवघ्यासी प्रमाण : द्यावे तरी दान मान होतो : ॥ छ ॥ मोकळीया मनें घ्याल तरी सेवा : प्रसाद पाठवा : लवकरी : ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्हां जालीया कृपण : नामाची जतन नव्हे देवा : ॥ ३ ॥

९६

कास्यासाटी आम्ही जाळीला सर्वसार : न करा वीचार यैसा देवा : ॥ १ ॥ धृ ॥ कैसे नेणों तुम्हां करावांतें उदास : माझा प्रेमरस भंगावया : ॥ छ ॥ समर्पुनी ठेलों देहे हा सकळ : घरीतां वीटाळ न लजा माझा : ॥ २ ॥ तुका म्हणे अवघी मोकलुनी आस : फीरोतो उदास कोणासाटी ॥ ३ ॥

९७

नाहीं तुम्हा काही लावीले मागणे : कांटाळ्याच्या भेणें : त्रासलेतीं : ॥ १ ॥ धृ ॥ येषादीये परी टाळावी करकर : हा नका वीचर देषों काहीं : ॥ छ ॥ पायांच्या वीयोगे प्रणासर्वेसाटी : सेघवेसी तुटी जाली आतां ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्हा मागने ते आतां : हे ची कृपावंतां चरणी वास : ॥ ३ ॥

९८

जग अभंग (ळ) : लागें देषतां वीटाळ : ॥ १ ॥ धृ ॥ धर्म भुतांची ते दया : सते कारणे यैसीया : ॥ छ ॥ नव्हे माझें मत : साक्षी करुनी सांगे संते : ॥ २ ॥ तुका म्हणे जीवें : दावी उमटुनी अनुभवें : ॥ ३ ॥ छ ॥

९९

दंड अन्यायाचे माथा : देषोनी करावा सर्वथा : [व. पृ. ३४] ॥ १ ॥ ॥ धृ ॥ न ये उगे बहुतां घाटुं : सीसे सोनीयांत आटु : ॥ छ ॥ पापपुन्यां-साटीं : नीत केली सता षोटी : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : दोश कोणाचा तो दावा ॥ ३ ॥ छ ॥

१००

आम्हीं पापी तुं पावण : हे तो पुर्वापार जाणं : ॥ १ ॥ धृ ॥ नवे करुं नये जुनें : सांभाळावे ज्याचे त्याणे : ॥ छ ॥ राषावा तो ठाव । मीरासी करुनी उपाव : ॥ २ ॥ वादे मारी हाका : देवा आईकवी तुका : ॥ ३ ॥

१०१

पाडावी ते बरी : गांठी धुरेसवें षरी : ॥ १ ॥ धृ ॥ नये मरों लंडी-पणें : काये बापुडे तें जीणें : ॥ छ ॥ लुटांवें भाडार : तरी जंया नाहीं पार : ॥ २ ॥ तुका म्हणे नावें : कीर्ती आगळीने ज्यावें : ॥ ३ ॥ छ ॥

१०२

भोजने ची जालें : मग जीवाचे काये आलें : ॥१॥ धृ ॥ नेउं नेदावी ते पुढती : आड भयाची ते जाती : ॥ छ ॥ करीता सरोबरी : कांहीं नेठवावी उरी : ॥ २ ॥ तुका म्हणे शुर : व्हांवें धुरेसीं च धुर : ॥ ३ ॥ छ ॥

१०३

कां रे तुम्ही ठेवा बहुतां नींमीतें : माझीया संचीतें वोडवलें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ भगती प्रेम गोडी बैसली जीव्हारी : अनंदु अंतरी येणे जाला : ॥ छ ॥ पुसीलें पडळ त्रीमीर वीठलें : जग ची भरलें ब्रम्हानंदें : ॥ २ ॥ तुका म्हणे केलो कामनेंवेगळा : अवडी गोपाळावरी वसे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १२ ॥

१०४

परद्रव्य परनारी : अभीळासुनी नाक धरीं : ॥ १ ॥ धृ ॥ जळो तयाचा आचार : वायां भार वाहे षर : ॥ छ ॥ सोवळ्याची स्फीत : कोर्वे वीटाळलें चीत : ॥ २ ॥ तुका म्हणे सोग : दावी बाहीरील रंग : ॥ ३ ॥

१०५

आसन सयेनं भोजन गोवींदें : भरलें आनंदें त्रीभुवन : ॥ १ ॥ धृ ॥ अवघीयां केली काळे तडातोडी : अवस्वरु घडी पुरों नय : ॥ छ ॥ वांटणीं घातले शरीराचें भाग : दुजीयाच्या लाग षंडीयेला : ॥ २ ॥ आवडीच्या आलें आहारासी रुप : प्रुथक संकंल्प मावळले : ॥ ३ ॥ काम तरी क्रोध बुधी मग नासें : वीभ्रमांचे वळसे गीळीले शांती : ॥ ४ ॥ तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग : बैसला अभंग : येकवीध : ॥ ६ ॥ छ ॥

१०६

[व. पृ. ३५] भेद तुटलीयावरी : आम्ही तुमची च हो हरी : ॥ १ ॥ धृ ॥ आतां पाळावे पाळोवे : आम्हा लडीवाळांचें लळे : ॥ छ ॥ आणीकाची देवा : नाही जाणत ची सेव : ॥ २ ॥ तुका म्हणे हेवा : माझा ये च पायीं देवा : ॥ ३ ॥

१०७

कळस वाइयेल सीरी : सहस्र नामें पुजा करीं : ॥ १ ॥ धृ ॥ पीक पीकलें पीकलें : धन दाटोनीयां आलें ॥ २ ॥ छ ॥ सेवटीचें दान : भागा आला नारायेण : ॥ २ ॥ तुका म्हणे पोट : भरलें वारला बोभाट : ॥३॥छ॥२॥

ळळीत १०८

आमची वीश्रांती : तुमंचे चरण कमळापती : ॥ १ ॥ धृ ॥ पुढती पुढती नमन : घालुनीयां लोटांगंन ॥ छ ॥ हे ची येक जाण : काया वाचा आणी मने : : ॥ २ ॥ नीच जना लोकां : तळीलें पाईरीस तुका : ॥ ३ ॥ छ ॥

ळळीत १०९

तुझ्या रुपें डोळे : नीवती सकळ सोहळे : ॥ १ ॥ धृ ॥ ठाण साजीरें गोजीरें : कुंडलें ती मकराकारें : छ ॥ ध्यानाचे आवडी : आवलोकीतों घडी-घडी : ॥ २ ॥ तुका म्हणे आतां : नव्हे चीता च परता : ॥ ३ ॥ छ ॥

ळळीत ११०

वीनवीतो सेवटीं : आहे तैसें माझे पोटी : ॥ १ ॥ धृ ॥ कंठी राहावें राहावें : हे ची मागतसें भावें : ॥ छ ॥ पुरली वासना : येने होईल नारा-येणा : ॥ २ ॥ तुका म्हणे जो देहाडा : तो ची वर्णीन पवाडा : ॥ ३ ॥ छ ॥

१११

जरेल्यासी कढा औशध पाचन : मुंढा नारायेन स्मरवीतो : ॥ १ ॥ धृ ॥ भवव्याधी याने तुटैल रोकडा : करुनीयां झाडा नीस्चयेसी : ॥ २ ॥ छ ॥'

आणीकां उपाया अनुपाण कठीण : भार्गे बरें सीण सीघ्रवत : ॥ २ ॥ तुका म्हणे केला उघडा पसारा : भाग्ये आलें घरा : दारावरीं : ॥ ३ ॥ छ ॥

११२

लये लक्षीं मन न व्हाये नीस्चळ : मुषे तेथे बळ आसनाचें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ हें तों असाधे जी सरवत्र जना : भलें नारायेणा : आळवीतां ॥ छ ॥ कामनेचा त्याग वैराग्ये या नावें : कुटुंब तें सवे वीशयेजात : ॥ २ ॥ कर्म उसंतावें चालतां पाउली : होये जों राहीली देहबुंधी : ॥ ३ ॥ भग्ती ते नमावें जीवजात भूत : सांतवूनी उत कामक्रोध : ॥ ४ ॥ तुका म्हणे साध्या साधनें अवघडे : देतां हें सांकडें जीव बळी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

११३

[व. पृ. ३६] जपाचें नीमीत झोपेचा पसरु : देहाचा विसरु पाडुनीया : ॥ १ ॥ धृ ॥ यैसी ती भजनें अमगळवाणीं : सोंग संपादनी बहुरुप्याची : ॥ छ ॥ सेवेसी वीकलें लोभाचीये असे : तया कोठे असे उरला देव : ॥ २ ॥ तुका म्हणे मान दंभ जया चीती : तयाची फजीती : करुं आम्हीं : ॥ ३ ॥ छ ॥

११४

नामाचें चीतंन : प्रकट पसारा : असाल ते करा तेथे तेथे : ॥ १ ॥ धृ ॥ सोडवील माझा स्वामी नीस्चेयेसी : प्रज्यां हे दासी केली आम्ही : ॥ छ ॥ गुन दोश नाहीं पाहात कीर्तनी : प्रेमे चक्रपाणी वैश होये : ॥ २ ॥ तुका म्हणे कडु वाटे तो प्रपच : रोकडे रोमाच कंठ दाटे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११५

कपट काहीं येक : नेणे भुलवायाचे लोक : ॥ १ ॥ धृ ॥ तुमचें करीतों कीर्तन : गातो नीर्मळ तें गुण : ॥ छ ॥ दाउं नेंणे जडीबुटी : चमत्कार उठाउठी : ॥ २ ॥ नाहीं सीस्यसाका : सागो आयाचीत लोकां : ॥ ३ ॥ नव्हे मठपती : नाहीं चावराच्या वृती : ॥ ४ ॥ नाहीं देवार्चन : असे माडीला दुकान : ॥ ५ ॥ नाहीं वेताळ प्रसन : कांहीं सांगो षाणषुन : ॥ ६ ॥ नव्हें पुराणीक : करणें सागणे आणीक : ॥ ७ ॥ नव्हे वाद घटापटा : करीतां पंडीत करटा : ॥ ८ ॥ नाही जाळीत भनंदी : कपटें म्हणवीत आनंदी : ॥ ९ ॥ नाहीं हालवीत माळ : भोवतें मेळउनी गबाळ : ॥ १० ॥ आगमीचें कुडे : नेणें स्थबनं मोहन उचाटणे : ॥ ११ ॥ नव्हे याच्या यैसा : तुका नरयेगांवी पींसा : ॥ १२ ॥ छ ॥

११६

दुर्जे धंडे तरी : उरला तो आवघा हरी : आपणाबाहेरी : न लगें ठाव धुंडावा : ॥ १ ॥ धृ ॥ ईतुलें जाणावया जाणा : कोंडे तरी मंन मंनां : पारधीच्या धुणा : त्यानें ते ची साधावें : ॥ छ ॥ देहें आधी काये धरा : देहें समंध पसारा : बुजगवणे चोरा : रक्षणसें भासातें : ॥२॥ तुका करी जागा : नको वासपो वाउगा : अहेसी तुं आंगा : आंगी डोळें उघडीतां : ॥ ३ ॥ छ ॥

११७

परद्रव्ये परकांतां : नातळें जयाचीया चीता : आणिक कर्मी तो तत्वता : बांधला नव जाये : ॥ १ ॥ धृ ॥ यैसा अनुभव रोकडा : वस्विासी-तो जीवा जाडा येकांत त्यां पुढां : अवघा करी उकल : ॥ छ ॥ [ व. पृ. ३७ ] संकट आंबील तें अंन : शोध तें ची मद्येपानं : वीशमानें मीनं : केलें शुघाअशुघ : ॥ २ ॥ तुका म्हणे नीत : बरवे अनुभवे उचीत : तरी काये हीत : मोलें घ्यावें लागातें : ॥ ३ ॥ छ ॥

११८

भुक पोटापुरती : त्रुस्णा भरीवी वाधती : करवी फजीती : हांवं भार वाढला : ॥ १ ॥ धृ ॥ कुळीकेसी लास फांस : डोई दाढी बोडवी दोश : अवींहीत नास : करवी वजन चुकतां : ॥ छ ॥ वीधीसेवनें वीहींतें : कार्ये कारणांपुरतें : न बाटे जो चीतें : अधर्माच्या तो त्यागी : ॥ २ ॥ अश्या-पाळन तें सेवा : भये धरुणींयां जीवा : तुका म्हणे ठेवा : ठेविला तो जतन : ॥ ३ ॥ छ ॥ छ

११९

कळे न कळे त्या धर्म : आईका सागोतो रे वर्म : माझ्या विठोबाचें नाम : अटाहासें उचारा : ॥ १ ॥ धृ ॥ तो या दाषवील वाट : तया पाहे जे त्या नीट । : कुपावंत मोटा : पाहीजे तो कळवळा : ॥ छ ॥ पुसतां चुका होतो वाटा : सर्वे बोळावा गोमटा : मोडों नेदी काटा घेउं साटा चोरासी : ॥ २ ॥ तुका म्हणे मोल : न लगे द्यावें वेंचावे बोल : वीठल वीठल छंद मनासी : ॥ ३ ॥

१२०

तका सीस्या मान : दुग्धा म्हणे नारायेन : ॥१ ॥ धृ ॥ यैसीं ग्यानाची डोवडें : आशा वींटंबीली मुढे : ॥ छ ॥ उपदेश तो जगा : आपण सोवळा

ईत्का मागा : ॥ २ ॥ रसनासीस्नाचे अंकीत : तुका म्हणे वरदळ स्फीत : ॥ १ ॥ छ ॥ छ ॥

१२१

तरी कां वोळगणे : राजद्वारी होती सुनें : ॥ १ ॥ धृ ॥ आंगी दाउनी नीह्कामता : पोकळ पोकळी ते वृथ्या : ॥ छ ॥ कासया मोकळ । भोवतें सीस्याचे गबाळ : ॥ ३ ॥ तुका म्हणे ढाळे : बाहेर गुदें तें नीराळे : ॥ ३ ॥

१२२

तुटे भवरोग : संचीत क्रीयेमान भोग : ॥ १ ॥ धृ ॥ ऐसे वीठोबाचें नांमं : उचारीतां षडे जन्म : ॥ छ ॥ वर्सो नं सके पाप : पळे त्रीवीध तो ताप : ॥ २ ॥ तुका म्हणे माया : होये दासी लागे पांयां: ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२३

हरीच्या दासां सोपे वर्म : सर्व धर्म पाउलें : ॥ १ ॥ धृ ॥ कडीये देव वाहे षांदी : वैस्णंव मांदी क्रीडेसी : ॥ छ ॥ सतंत ते आटाआटी : नाहीं तुटी लाभाची : ॥ २ ॥ तुका म्हणे समाधान : सदा मंन आमुचें : ॥ ३ ॥ ४ ॥

१२४

हारपल्यांची नकचीती : धरुं षंती वायां चं : ॥ १ ॥ धृ ॥ [व. पृ. ३८] पावले ते म्हणो देवा : सहज सेवा : या नावें : ॥ छ ॥ होनार तें भोगें घडे : लाभ जोडें : सकल्पें : ॥ २ ॥ तुका म्हणे मोकळें मंन : अवघे पुन्ये या नावें : ॥ ३ ॥ छ ॥

१२५

जळो आगी पडो षाणं : नारायेन भोगीता : ॥ १ ॥ धृ ॥ यैसी ज्याची वदे वाणी : जनार्दननी सरते तें : ॥ छ ॥ भोजनकाळी करीतां धदा : म्हण गोवीदा : पावलें ॥ २ ॥ तुका म्हणे न लगे मोल : देवा बोल : अवडती : ॥ ३ ॥ छ ॥

१२६

भुतांचीये नांदे जी : गोसांवी च सकळां : ॥ १ ॥ क्षीणक्षीणा जागा ठाई : द्रुढ पाई वीस्वास : ॥ छ ॥ दाउनीयां सांगे दुजें : अंतर बीजें वसतसें : ॥ २ ॥ तुका म्हणे जाणें धर्म : धरी ते वर्म चींतनं ॥ ३ ॥ छ ॥

१२७

संत आलें घरा : तों मीं आमागी दातारा : ॥ १ ॥ धृ ॥ कासयानें पुजा करुं : चरण ह्रुदई च धरुं : ॥ छ ॥ काया कुवडी : करुणं वोवाळुन साडी : ॥ २ ॥ तुका म्हणे भावें : हात जोडी असो ठावें : ॥ ३ ॥ छ ॥

१२८

आवडीची सलगी पुजा : वीश्रम दुजा भाव तो : ॥ १ ॥ धृ ॥ येसीं उफराटीं वर्मे : कळो भ्रमें न येती : ॥ छ ॥ न लगें समाधाना मोल : रुचती बोल प्रीतीचे : ॥ २ ॥ तुका म्हणे येका जीवें : सुत्रु व्हावें गुतलें : ॥ ३ ॥ छ ॥

१२९

बाळ माते लात वरी : मारी त्याणें संतोशे : ॥ १ ॥ धृ ॥ सुष वसे चीता आंगी : ते हो रंगी : मीळालें : ॥ छ ॥ मक्षी त्याचा जीव नाग : आला भाग तो वरा : ॥ २ ॥ तुका म्हणे रुणांन्बंधें : सांगे सुधें सकळा : ॥ ३ ॥ छ ॥ २

१३०

सीजल्यावरी जाळ : वांयां जायाचें तें मुळ : ॥ १ ॥ धृ ॥ यैसा वारावा तो श्रम : अतीशई नांही काम : ॥ छ ॥ सांभाळवें वर्म : उचीताच्या काळें धर्म : ॥२॥ तुका म्हणे कळें : यैसें कारणाचे वेळें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३१

उभा अईल थडी : त्याणे घालु नये उडी : ॥ १ ॥ धृ ॥ पुढें गेल्याचे उपाये : करावे ते केले काये : ॥ छ ॥ दीसातें आहारीं : नये जाउं यैस्यावरी : अळसाची घाटी । तुका म्हणे बहु नाडी : ॥ ३ ॥ छ ॥

१३२

शेत्की याव्या देवा : नाही पदारथी सेवा : ॥ १ ॥ धृ ॥ [व. पृ. ३९] मुषे आहे यैसा धर्म : जानते हो जाणा वर्म : ॥ छ ॥ मनां पोटी देव : जाणे जैसा तैसा भाव : ॥ २ ॥ तुक म्हणे सोसें : लागे लावील्याचें पीसें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३३

कार्यई च कारन : त्रुस्णा पावीते सीणं : ॥ १ ॥ धृ ॥ काये करुणी यैसा संग : सोसें चीं तु पांडुरंग : ॥ छ ॥ रुपीं नाहीं गोडी : हावं हवें उर फोडी : ॥ २ ॥ तुका म्हणे पडे भरी : यैस्या वरदळाचे थोरी : ॥ ३ ॥

१३४

सवंसाराच्या नावें घालुनीयां सुंनें : वाढता हा पुन्ये केला धर्म : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ हरीभजनें हे धवळीलें जग : चुकवीला लाग कळीकाळाचा : ॥ छ ॥ कोण्हा हीं न लगे साधनाचा पांग : करणें केला त्याग : देहेबुधी : ॥ २ ॥ तुका म्हणे सुषसमाधी हरीकथा : नेणे भववेथा : गाईल तो : ॥ ३ ॥ छ ॥

१३५

शुकसंनकादीकी उभारीला बाहो : प्रक्षीतीस लाहो : दीवसां सातां : ॥ १ ॥ धृ ॥ उठाउठी करी स्मरणाचा धावा : धरवत देवा नांही धीर ॥ छ ॥ त्वरा जाली गरुड टाकीयेला मागे : द्रुपदीच्या लागें नारायेनं : ॥ २ ॥ तुका म्हणे करी बहु च तांतडी : प्रेमाच आवडी : लोभापर ॥ ३ ॥ छ ॥

१३६

वीस्वासीयां नांही लागत सायास : अनंयारों रस आंगा येतो : ॥ १ ॥ धृ ॥ लेकराच्या हातें घास मागे माता : वोरसोनी चीता : सुष पावे : ॥ छ ॥ गोरव त्या माणी अरुशा वचनी : भुशण ते वाणी : मीरवावी : ॥ २ ॥ तुका म्हणे आहे सकळ ही साक्षी : माझा कईपक्षी : पांडुरंग ॥ ३ ॥ छ ॥

१३७

वैभवाचे धणी सकळा शरणांगत : सते भावें चीत : आर्पीले ते : ॥ १ ॥ धृ ॥ नेंदी उरो देव आपणांवेगळें : भावाचीया बळे : ठाया ठाव : ॥ छ ॥ जाणोंन नेणोनी आगा आली दसा : मग होये ईछा : आपण च : ॥ २ ॥ तुका म्हणे बरे धाकट्याचें जीणें : माता स्थनपाने वाढवीते : ॥ ३ ॥ छ ॥

१३८

कई यैसी दसा येईल माझ्या आंगा : चीत पांडुरंगा झुरतसें : ॥ १ ॥ माठवोनी देहे पायांचें चींतन : अवसान ते क्षीन : नाही मधी : ॥ छ ॥ [व·पृ.४०] काये यैस्या पात्र होईन लाभासी : नेंणों रुसीकेसी तुस्टईल : ॥ २ ॥ तुका म्हणे धनें मानीं न संचीत : घेईन ते नीत : प्रेमसुष : ॥ ३ छ छ ॥ ५ ॥

१३९

नाहीं वागवीत जाणीवेचे वोझें : स्वामीसेवे काजें : नीर्धारु हा : ॥ १ ॥ धृ ॥ आज्ञ्या ते प्रमाण हा मंणी नीर्धार : येणे फीटे भार : नीस्चयेंसी : ॥ छ ॥ आळीकरें आम्हीं येकवीधें चीते तैसें होउं येतें मायेबापें : ॥ २ ॥ तुका म्हणे माझी ये जातीची सेवा : घातलासे देवावरी भार : ॥ ३ ॥ छ ॥

१४०

कायें नाही माझें अंतरी वसती : व्यापक हा भुती : सकळा नादे : ॥ १ ॥ धृ ॥ चीतासी प्रसाद होईल चळण : ते ची ते वळण : मनास ही : ॥ छ ॥ सर्व शत्की जीवी राहील्या कुंटीत : नाही केले होत आपले तें : ॥ २ ॥ तुका म्हणे दोसी षाब सुत्र्या हांतीं : नाचवी नाचती जडें तैसीं : ॥ ३ ॥ छ ॥ २ ॥

१४१

देवाचें नीर्माल्य कोण सीवे हाती : सकल्पासी होती वीकल्प ते : ॥ १ ॥ धृ ॥ वाहीले देहे हे देवा येकसरे : होईल तें बरें तेणें द्वारें : ॥ छ ॥ होता भार त्याची निवारली षंती : येथें आतां रीती सांटवण : ॥ २ ॥ तुका म्हणे ईछे पाववीलें कस्ट ; म्हणउनी नस्ट दुरावली : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१४२

देव तीर्थ येर दीस जया वोस : तो ची तयां दोश जाणतीयां : ॥ १ ॥ धृ ॥ तयां बरें फावें देवा चुकवीतां : संचीताची सता अंतराये : ॥ छ ॥ शुधाशुधठाव पापपुन्येबीजें : फाववील दुजे फळभोग : ॥ २ ॥ तुका म्हणे वीस्वंभरा येसे वर्म : चुकलीयां धर्म : अवघे मीथ्या : ॥ ३ ॥ छ ॥

१४३

काये करुं सागतां ही न कळे वर्म : उपर्थ्सि(स्थि)त भ्रम उपजवीतो ॥१॥ ॥धृ॥ मंन आर्थी ज्याचें आले होईल हाता : तयावरी सता केली चालें : ॥छ॥ अमुंकेचें आंगीं चवी ना सवाद : मीथ्या येसा वाद : दुराअग्र : ॥ २ ॥ तुका म्हणे आप राषावे आपणां : संकोचो ची कोण्हां न ये आतां : ॥३॥ छ ॥

१४४

[व.धृ.४१] अंद्रुत अह्वेरे उचलेंलें जातां : वीश अर्तभुतां: अवस्यक : ॥१॥ धृ आदरासी मोळ न ये लउं केजें : धीर सुध बीजें : गोमटा तो : ॥छ॥ षऱ्याचीये आंगीं अपण ची चाली : लावणी लावीली काये लागे : ॥ २ ॥ तुका म्हणे चाड करावी वेवसाव : आम्हांसी तों वाव : धीर आहे : ॥ ३ ॥ छ ॥

१४५

अनुभवाचे रस देउं तंभुतां : सोडुं चोजवीतां : पुढें पोतीं : ॥ १ ॥ धृ ॥ देवाचा प्रसाद रत्नांच्या वोवणी : सोभतील गुणी आपुलीयां : ॥ छ ॥ आधी भाव सार सुध ते भुमीका : बीज अणी पीका चींतां नाहीं : ॥ २ ॥ तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत : तें नाहीं लागत : पसरांवे ॥ ३ ॥ छ ॥

---

१ ज्यास्ती पडला आहे.

१४६

काये मज येव्हडा भार : हे वेह्वार चाळायां : ॥ १ ॥ धृ ॥ उकल तों जाणे धणी : मज भोजणी कारणं : ॥ छ ॥ चींतां ज्याची तया सीरी : लेंकरीं ते षेळावें : ॥२॥ तुका म्हणे सेवट जाला : देव या बोला भोगीतां : ॥३॥ छ ॥६॥

१४७

धृ ॥ न गमे न गमे हीरीवीन : न गमे न गमे न गमे : मेळवा स्याम कोन्ही गे : ॥ छ ॥ तळमळ करी तैसा : जीव जळावीन मासा : दीसती दीसा वोसा वो : ॥ १ ॥ नाठवे भुक तान : वीकळ जालें मन : घडी जाये प्रमान : जुगा येकी वो : ॥ २ ॥ जरी तुम्ही नोळषा : सागतें आईका : तुकयाबंधुचा सषा : जगजीवन : ॥ ३ ॥ छ ॥

धृवक १४८

वीठला रे तुझे वर्णीतां गुणवाद : वीठल रे दग्ध जाली पापें : ॥ १ ॥ वीठला रे तुझें पाहातां श्रीमुष : वीठला रे सुष जालें नयना : ॥ २ ॥ वीठला रे तुज देतां आळीगन : वीठला तनमन नीवाल्या बाह्या : ॥ ३ ॥ [व. पृ. ४२] वीठला रे तुझी आईकतां कीर्ती : वीठल हे वीश्रांती : पावलें स्रवण : ॥ ४ ॥ वीठला रे तुकयाबंधु म्हणे देहेभाव : वीठला जीवी पाव : धरीतां गेला ॥५॥ छ ॥

१४९

राम म्हणतां कामक्रोधाचे दहन : होये अभीमान देशधडी : ॥ १ ॥ राम म्हणतां कर्म तुठईल बंधन : न ये श्रम सीण स्वप्ना नासी : ॥ २ ॥ राम म्हणतां जन्म नाही गर्भवास : नव्हे दारिद्रास : पात्र कधी : ॥ ३ ॥ राम म्हणतां येम सरनागत काळ : बापुडें आढळ पद ते काये : ॥ ४ ॥ राम म्हणतां धर्म घडती सकळ त्रीमीरपडळ नासे हेळा : ॥ ५ ॥ राम म्हणतां म्हणे तुकयाचा बंधु : तरीजेल भवसीधु सदेहे नाही : ॥ ६ ॥

धुर्वक १५०

मरोनी जाईन गुणनामावरुणी : तुझ्या चक्रपाणी मायेबापा : ॥ १॥ चुंकवीली दुषें मायचा वळसा : तोडुनीयां आशापाश तेगें : ॥ २ ॥ केली काया तनु हीवंसी सीतळ : चीतां तळमळ नाहीं येसी : ॥ ३ ॥ काळे तोंड काळ करुणी राहीलें : भुतमात्र जालें सजनसषे : ॥ ४ ॥ तुकयाबंधु म्हणे अवघ्या देस दीसा : मुक्तपरीशा तुझ्या पुन्यें : ॥ ५ ॥

धुर्वक १५१

आतां मागोतो तें आईका नारायेणा : भावपुर्वक मना : पासुनीया : ॥ १ ॥ आसो दे मोकळी जीह्वा जरी गाईल गुण : नाही तरी षेळुन : टाकी परती : ॥२॥ मातेचीये परी देषती परनारी : ठेवी नेत्र तरी : नाहीं तरी नको : ॥ ३ ॥ तरी बरे कटांळा करीती नीदास्तुतीचा : नाही तरी कोणाचा : ही देषे प्रेन : ॥ ४ सकळा ईंद्रीयांचा नीग्र करुणी : येक : राषावी प्रुथक : तोडुनी भ्रम : ॥ ५ ॥ तुकयाबंधु म्हणे ते ची वाटे प्राणा : पडतां नारायेणा वीसर तुझा : ॥ ६ ॥ छ ॥

१५२

[व.प्र.४३]नमस्कारी भुतें वीसरोनी याती : त्याणें अत्मस्थीती जाणीतली : ॥१॥ परउपकारी वेचील्या शक्ती : त्याने अत्मस्थीती जणतीली : ॥२॥ द्वयेद्वईत भाव नाही जया चीर्ती : त्याणें अत्मस्थी जाणीतली : ॥ ३ ॥ जयाचीये वाचें न ये नीदास्तुती : त्याणे अत्मस्थीती जाणीतली : ॥ ४ ॥ उचीत अनुचीत जाणे धर्म नीती : द्रुढ भाव भग्ती मनुसे तो : ॥ ५ ॥ तुकयाबंधु म्हणे वरकड ते येर : संवंसार घर : भारवाही : ॥ ६ ॥ छ ॥

धुर्वक १५३

चौदा भुवने लोक तीन्ही दाढे कवळी : संपुस्ट तो संबळी : मधें देषा : ॥ १ ॥ उत्पती सह्वार करीतां जो पाळन : तो नंदा नंदन म्हणवीतसे : ॥ २ ॥ असुर तोंरडी दैतांचा काळ : जाला द्वारपाळ : बळीचा तो : ॥ ३ ॥ लक्षीमीचा स्वामी क्षीराचा सागर : उचीस्टां कवळाकर : पसरी मुष : ॥ ४ ॥ तुकयाबंधु म्हणे चतुराचा राव भावें तो पाहो केला वेडा : ॥ ५ ॥ छ ॥

१५४

नीनावा हें तुला नावं साजे रे वीठला : बरा सीरवीला : फाटक्यामधें पाव : ॥ १ ॥ कांही तरी वीचारीलें : पाप पुने यैसें केलें : भुरळे घातले : येकायेकी भावासी : ॥ छ ॥ मुद्रा धरणे माळा टीळे : बोल रसाळ कोवळे : हातीं फांस्यांचें गुडाळे : कोण चाळे मस्त हे : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे मीस्कीन : करीतोसी देषोन : पाहा द्रुस्वरी वीछीन : केला परी सौंसार : ॥ ३ ॥

१५५

नाही घटीका म्हणसी : लाग लागला तुजसी : पडीला रुसीकेसी : जांब सकळ करणें : ॥ १ ॥ धृ ॥ माझें नेले पाघुरण : ठावे असोन द्रुबळ दीन : मांनसामधुन उठवीलें षानोऱ्या ॥ छ ॥ [व.पृ.४४] आम्ही हे जगउनी होतों पाणी : संदी देव देव करुनी : जालासी कोठुणी : पैदा चोरा याहाच्या : ॥ २ ॥ **तुकयाबंधु** म्हणे केले : उघडे मज ची उमगीले : येसें काये गेले : होतें तुज नुपरतें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ २ ॥

१५६

कनवाळ क्रुपाळ : उदार दयाळ : मयाळ : म्हणवीताती परी केवळ : गळेकाटुं दीसोतोसी : ॥ १ ॥ धृ ॥ काये केले होतें आम्ही : सांग तुझें : येक ये जन्मी : जालासी जो स्वामी : येवढा सता कराया : ॥ छ ॥ भलेपणाचा पवाडा : बरा दावीला रोकडा : करुनी बंधु वेडा : जोडा माझा वीषंडीला : ॥ २ ॥ **तुकयाबंधु** म्हणे भला : कैसें म्हणताती तुजला : जीव आमंचा नेला : अंत पाहीला कांहीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ३

१५७

आतां कळो आलें गुण : अवघे ची यावरुण : चोषट लक्षण : धरीले हें घरघेणें : ॥ १ ॥ धृ ॥ या च नावे क्रुपासीधु : म्हणवीतोसी दीनबंधु : मज तरी मैंदु : दीसोतोसी पाहातां ॥ छ ॥ आमळ माया नाहीं पोटीं ॥ कठीण तैसा ची कपटी : अधळ्याची काठी : माझें गुदरसी च ना : २ : **तुकयाबंधु** म्हणे पुसतां : नांही म्हुण बरे अनतां : येऱ्हवी असतां : तुझा घोट भरीयेला : ॥ ३ ॥ छ ॥ ४ ॥

१५८

काये सागो रुसीकेशा : आहे आनुताप आला यैसा : गीळावास नीस्या नीमीस्या लागो नेदावें : ॥ १ ॥ धृ ॥ माझें बुडवीलें घर : लेकरे बाळे दारोदार : लावीले काहार : तारातीर करुनी : ॥ छ ॥ जीव घ्यावा यावा : तुझा की आपला देवा : ईतुके उरले आहे भावा : चीया नीमीतें : ॥ २ ॥ **तुकयाबंधु** म्हणे जग : बरें वा वीट म्हणो मग : याकारणे लाग : परी नं संडावा सर्वथा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ५ ॥

१५९

[व.पृ.४५] मायेबाप नीमाल्यावरी : घातलें भावाचे अभारी : तो ही घरी हरी : तुज जाला असमाई : ॥ १ ॥ धृ ॥ हे का भग्तीचे उपकार : नादतें वीट्ठ-

सीले घर : प्रसनतां वेह्वार : सेवटी हे जालासी : ॥ छ ॥ येका जीवावरी : होतो दोनी कुटवारी : चाळउनी तो तह्वी : तुज येतो नीलजा : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे भला : आणीक काये म्हणावें तुला : वेडा त्याणे केला : तुजसवे समंध : ॥ ३ ॥ छ ॥ ६ ॥

१६०

पुर्वी पुर्वजाची गती : हे ची आकीली होती : सेवे लाउनी श्रीपती : नीस्चीती : केली तयांचीं : ॥१॥ धृ ॥ का रे पांठी लागलासी : अैंसा सांग रुसीकेसी : आद्याप परी न व्हासी : अंत पाहासी : कीर्ती म्हुण : ॥ छ ॥ जन्मजन्मांतरी दावा : आम्हा आपणा केशेवा : नीमीत्ये चालवा : अस्तवा हे कवना : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे अदषणा : कीती होसी नारायेणा : देषो सकवेणा : षातीयासी न षातें : ॥ ३ ॥ छ ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥

१६१

नीसुंर संवसार करुण : होतों सुषे पोट भरुण : केली वीवसी नीर्माण : देवपण दाषवीलें : ॥ १ ॥ धृ ॥ यैसा काढीयेला नीस : काये म्हुण सहीत वोस : आणीलें सेवटास : हाउस तऱ्ही ही नुपरे : ॥ छ ॥ उरलो पालव्या सेवटी : ते ही नेद्षवे द्रुस्टी : दोघामधे तुटी : रोकडी च पाडीली : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे गोड : बहु जालें आती वाड : म्हणउनी का बुढ : मुळ्यासहीत षावें : ॥ ३ ॥ ८ ॥

१६२

बरा जाणोतोसी धर्मनीति : उचीतं आनुचीत श्रीपती करूं येते राती : यैसी डोळे झांकुणी : ॥ १ ॥ धृ ॥ आतां जाब काये कैसा : देसी तो जगदेशा : आणीला वळसा : आपणीयां भोवतां : ॥ छ ॥ सेवेचीया सुषाआस्तवः बळे धरीले अज्याणत्व : येईल परी हा भाव : ज्याचा त्यासी कारणा : ॥२॥ तुकयाबंधु म्हणे नाही : आतां आम्हां बोल काही : जोडुनीयां पाई : तुझें तो घेतलें ॥ ३ ॥ छ ॥ ९ ॥

१६३

( ब. पृ. ४६ ) काही वीपती अपतां : आतां अमचीया होता : काये होवील ते अंनतां : पाहा बोलो कासया : ॥ १ ॥ धृ ॥ बरे अनयासें

जालें : सायासार्वीण बोलें चालें : काबाड चुकलें : केलें कस्टांवेगळें : ॥ छ ॥ बरा सापडलासी वोजा : वर्मावरी केशीराजा : बोलायासी तुझा : उजुरु ची नाहीसा ॥ २ ॥ **तुकया**बंधु म्हणे दगा : बरा दील्हा होता बगा : झडकरी चला गा : चांग देवी पावलों : ॥ ३ ॥ छ ॥ १० ॥

१६४

देवा तुजपें माझ्या पुर्वजाचे रीन : आहे तें नेदीस कां आझुन : आवगलासी झोडपण : परी जीवें न सोडी : ॥ १ ॥ धृ ॥ कळों येईल रोकडे : उभा करीन संतांपुढें : तुझें काये येवढें : भये आलें मागतां : ॥ छ ॥ आजीवरी होंतों नेणता : तों तुज फावलें गा आंतां : कवडीचा तो आतां : पडो नेदीत फेंर : ॥ २ ॥ ठेवीला ये वर्णी जीव : म्हणे **तुकया**चा बंधव : माझा गळा तुझा पाव : येके ठाईं बांधईन : ॥ ३ ॥ छ ॥ ११ :

१६५

मार्गें असतासी कळला : उमस घेऊं नसता दील्हा : तेन च काळें केला : असता अवघा नीवाड : ॥ १ ॥ धृ ॥ ईतका न लागतां उसीर : कोण धरीता भीडभार : सीधासी येव्हार : कासायासी लागला : ॥ छ ॥ असोनी माल षरा : कीती केल्या वेरझारा : धरंणें दीवस तेरा : माझ्या भावें घेतलें : ॥ २ ॥ अझुनी तह्री ईतक्यावरी : चुकवी जनाचार हरी : **तुकाया**बंधु म्हणे उरी : नांहीं तरी नुरे कांही : ॥ ३ छ ॥ ॥१२ ॥

१६६

आतां न ह्राये क्षीण येक : तुझा कळला लोकीक : नेदी हालो येक : काही केल्यावांचुनी : ॥ १ ॥ धृ ॥ संमध पडीला कोन्हासी : काये डोळे झाकीतोसी: नेईन पाचापासी : दे नाही तरी वोढुनी : ॥ छ ॥ सुर्षे नेदीस जाणवलें : नासी केल्यावीन उगलें : तरी तें ही वीचारीले : आहे आम्ही तुज आधी : ॥ २ ॥ यैसे च करुण कीती : नागवीली नाही नीती : **तुकया**-बंधु म्हणे अती: न सडी ते षोडी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १३ ॥

१६७

[ व. पृ. ४७ ] तुज तें सवे आहें ठावें : घ्यावें त्याचें बुडवावें : परी ते आम्हासवें : आतां न फावे कांही : ॥ १ ॥ धृ ॥ नव्हो सोडायाचें धनी : कस्टें मेळवीले करुनी : पाहा वीचारुणी : अढी धरुनी काम नाही : ॥ छ ॥ अघवे

राहीले प्रकार : जालो जीवासी उदार : अैसा हा नीर्धार : कळला आसावा आसैल : ॥ २ ॥ आतां नीदसुरे नसावें : गांठी पडीली कुनब्यासवें : तुकया : बंधु म्हणे राघावें : देवा महत्व आपलें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १४ ॥

१६८

बहु बोल न ये कामा : वाउगे ते पुरुशोतमा : येका वचनें आम्हां : काये सांगेणें ते साग : ॥ १ ॥ धृ ॥ देने अहे की भाडाई : करणें आहे सांग माई : आतां भीड कांही : कोन्ही न धरी सर्वथा : ॥ छ ॥ मागे गेले जे होउनी : असो ते धरीत नाही मनीं : पुढे आतां येथुनी : कैसा काये वीचार : ॥ २ ॥ सारीषी नाही अवघी वेळ : हें तरीं कळातें सकळ : तुकया-बंधु म्हणे घळघळ : करावी ते उरैईल : ॥ ३ ॥ छ ॥ १५ ॥

१६९

आतां हे न सुटे न चुके : बोलें का दवडीसी फीके : जन लोक पारीषे : अवघे केले म्यां यासाटी : ॥ १ ॥ धृ ॥ नये सरतां नव्हे भलें : तुझें लक्षन कळलें : बैसलासी काढीलें : दृयाहाचें मुळी दीवाळें: ॥ छ ॥ दीसोतांसी बरा बोल कोवळे : गुंणं मंईदाचे चाळे : दीसताती ये वेळे : काये करु वीसंभोनी : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे देषतां : आंध बहीर आईकतां : कैसें होवें आतां : ईतकीया उपरी : ॥ ३ ॥ छ ॥ १६ ॥

१७०

तीहीं ताळीं हे ची हाक : म्हणती पांढरा स्फटीक : अवघा बुडवीला लोक : सुषें च मीके लावीली : ॥ १ ॥ धृ ॥ थोंटा नावें सीरोमनी : नाहीं जोडा त्रीभुवनी: म्हणउनी स्याहाणे ते कोन्ही : तुझें दारी बैसतीना : ॥ छ ॥ नीर्गुन नीलाजीरा नीनावा : लंड झोंड कुडा देवा : नागवनां या नावा : वाचुण दुजे नावींकों ॥ २ ॥ [ व. पृ. ४८ ] सर्वगुणंसंपन : कळो आलासी पुर्ण : तुकयाबंधु म्हणें चरण : आतां जीवे नोसडी : ॥ ३ ॥ छ ॥ १७ ॥

१७१

आतां चुकले देसाउर : करणे आकरणे सर्वत्र घरासी आगर : आला सकळ सीधीचा : ॥ १ ॥ धृ ॥ जालो नीधावी नीधान : लागलें अनंत गुणरत्न : जन्माचे वीछीन : दुष जालें दरीद्र : ॥ छ ॥ तारुं सागरीचें अव-चीतें : हेदोवलें आलें येथें : वोढीलें संचीतें पुर्वदतें लाधलें : ॥ तुकयाबंधु म्हणे सीमा : नाही आमचीया दैवां : आतां पुरुशोतमा : अैसा सवदागर सापडला : ॥ ३ ॥ १८ ॥

१७२

सापडलें जुणें : आमच्या वडीलांचें ठेवनें : केली नारायेनें : कृपा पुन्यें पुर्वीची : या : ॥ १ ॥ धृ ॥ सुषें अनदे रुप आता : आम्ही आहो याकरीतां : नीवारली चीतां : देणें घेणे चुकलें : ॥ छ ॥ जालें भाडवल घरींचें : अमुप नामं वीठलाचें : सुकृत भावाचें हें तयानें दावींलें : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे फीटला : पांग नाही बोलायाला : चाड दुसरी वीठलावांचुनीयां आणीकां : ॥ ३ ॥ छ ॥ १९ :

१७३

जन्मातरी सुध नाही आचरण : यालागी चरण : अंतरलें : वोडवलें संचीत येने जन्मे पाहातां : आतां : पंढरीनाथा कृपा करी : ॥ १ ॥ धृ ॥ पतीतपावन ब्रीद साच करी देवा : यालागी कुढावा करी माझा : ॥ छ ॥ आपराधी पातकी दुस्ट दुराचारी : आहाळोलो भारी : सवसारे : कामक्रोधआदी कल्पनेच्या त्रासें : तुज न पवें यैसें जालें देवा : ॥ २ ॥ हा ना तो साठाव जाला पाडुरंगा : न ये ची उपेगा काये करुं : आपुलीया नावां धावनीयां धावें

( ह्यापुढील ह्या ४८ व्या पानाअखेरपर्यंतची जागा मोकळी–कोरी च सोडिली आहे; व हा अभंग हि पुढें पुरा न करितां ४९ व्या पानापासून निराळ्या च अभंगाला प्रारंभ केला आहे. )

१७४

[व. पृ. ४९] सुषाचे वेव्हारी सुषलाभ जाला : आनंद कोंदला : मागें पुढें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ संगती पंगती देवासी च घडें : नीत्य नीते पडे तें ची सांसां : ॥ छ ॥ समर्थाचे घरी सकळ संपदा : नाही तुटी कदा : कासयाची ॥ २ ॥ तुका म्हणे येथे लाभाचींया कोटी : बहु वाव पोटी समर्थाचें : ॥ ३ ॥ छ ॥

१७५

येकांती लोकांती करुं गदारुळ : लेंश तो ही मळ नाही येथें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ घ्यावें द्यावें आम्ही आपुलीया सता : नेदषों पुसतां : दुजा कोण्ही : ॥ छ ॥ भांडाराची कीली माझे हाती आहें : पाहीजे तो पाहें वान येथें : ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हा वीस्वासच्या बळे : ठेवीले मोकळे : देवें येथे : ॥ ३ ॥

१७६

गायें नाचें वाये टाळी : साधन कळी : उतम हें ॥ १ ॥ काये जाणो तरले कीती : नावेवरी या बैसा ॥ छ ॥ सायासांचें नाही काम : घेतां नाम वीठोबाचें : ॥ २ ॥ तुका म्हणे नीर्वानीचें : सस्त्र साचें हे येक : ॥ ३ ॥ छ ॥

१७७

वीठल वीठल मंत्र सोपा : करी पापा नीर्मुळ : ॥ १ ॥ धृ ॥ भाग्यवंता छद मनी : कोर्डे कानी आईकती : ॥ छ ॥ वीठल हे देवत भोळें : चाड काळे न धरावी : ॥ २ ॥ तुका म्हणे भलते याती : वीठल चीती तें शुध : ॥ ३ ॥

१७८

स्मरणांचें वेळें : होंवें सावध न कळें : ॥ १ ॥ धृ ॥ पडीलों वीशयांचे वोढी : कोण्ही न दीसेसे काढी : ॥ छ ॥ भांडवल माझें : वेच जालें भुमीं वोझें : ॥ ३ ॥ तुका म्हणे कळे : तुज धावं यैसे वेळे : ॥ ३ ॥ छ ॥

१७९

नेणें करु सेवा : पांडुरंगा कृपाळु वा : ॥ १ ॥ धृ ॥ धांवं बुडती यायें काढी : सता आपुलीया वोढी : ॥ छ ॥ क्रीयाकर्महीण : जालों इद्रीयां आधीन : ॥ २ ॥ तुका वीनती करी : वेळोवेळां पाये धरी : ॥ ३ ॥ छ ॥

साषी १८०

तुका मान्या पेटका : और न बुझे कोयें ॥ कछु येक जपतां रामनाम तो हरीभगतनके सोये ॥ १ ॥ [व. पृ. ५०] नजर करे सो ही जीकें बाबा दुरथी तमासा देष : लकडी फांसा लेकर बैठा आगलें ठकण भेष : ॥१॥ धृ ॥ काहे मुला येक देषत आंषों : मार तडांगो बाजारं : ॥ छ ॥ दमरी चमरी जो नर मुला : सो ही इतना पाये : कपरेची थडे सब ही छीनावत आषों ही लत षाये : नहीं बुलावत कीसे बाबा आप ही मत ज्याये : ॥ २ ॥ कहे तुका उस आसाके संग फीर फीर गोदे षाये : ॥ ३ ॥ छ ॥

दरवेस १८१

अला करे सो होये : बाबा करतारका सीरताज : गाउ बछरे तीस चलावे यारी बाघो न सात : ॥ १ ॥ ष्याल मेरे साहेबका बाबा अपें हुवा करतार : न्हांटें आर्घे चढे पीठ अपें हुवा आसुवार : ॥ जीकीर करो अलाकी बाबा सबल्यां आंदर भेस : कहे तुका जे नर बुझें सो ही भया दरवेस ॥ ३ ॥

## मुढा १८२

सब संबाल म्याने लौढे षडा केंउं गुंग : मदीरथी मता हुवा भुली पाडी भंगं : ॥ १ ॥ धृ ॥ आपसकुं सबाल आपसकुं सबाल : मुढें षुब राष ताल : मुथीवोही बोल : नही तो करुगा हाल : ॥ छ ॥ अवलका तो पीछें नंही : मुदल बीसर ज्याये : फीर ते नही लाज रंडी गधे गोते षाये : ॥ २॥ जीन्हों षातीर ईतना होसा सो नंही तुजे फाम : उच्या जोरो लीया तुंबा तुवा बुरा काम : ॥ ३ ॥ नीकल जावे चीकल जोरो मुंढें दीलदारी : जेबाणीकी छोड दे बत फीर येक तारी : ॥ ४ ॥ कहे तुक फीसल रुका : मेरेको दान देष : पकड धका गांडगुडघी मार चलाऊं अलेष : ॥ ५ ॥ छ ॥ १ ॥

## १८३

येकाचीये सोई कवीत्वाचे बांधें : बाधलीया साध्ये काये तेथें : ॥ १ ॥ धृ ॥ काये हाती लागे भुसाचे कांडणीं : सत्यास दाटणी : करुणी काये : ॥ छ ॥ कवीत्वाचे रुढी पांयां पाडी जग : सुषावोनी मग : नरका जाये ॥ २ ॥ तुका म्हणे देव केल्यावीन साहे : फजीती हे आहे लटीक्या आगीं : ॥ ३ ॥ छ ॥

## १८४

पाहा रे तमासा तुमचा येथे नव्हे लाग : देईन तो भाग : आलीयांचा बाहेरी : ॥ १ ॥ धृ ॥ जागारे गोपाळनो ठांई ठांई जागा : चाहुलीने भागा : दुर मजपासुनी : ॥ छ ॥ न रीघतां ठाव आम्हा ठावा पाळतीयां : भयाभीत वांयां तेथे काय चांचपा ॥ २ ॥ [ व. पृ. ५१ ] तुका म्हणे हाता चढे जीवाचीयें साटी : मीटक्या देतां गोड मग लागातें सेवटी ॥ ३ ॥ छ ॥

## १८५

न सरे भाडार : भरलें वेचीतां आपार : ॥ १ ॥ धृ ॥ मवीत्याचें पोट भरे : पुढीलासी पुढे उरे : ॥ छ ॥ कारणापुरता : लाहो आपलीया हीता : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : पुढें केला चाले हेवा : ॥ ३ ॥ छ ॥

## १८६

तरी हाव केली अमुपा व्यापारें : व्होवें येकसरें : धनवत : ॥ १ ॥ धृ ॥ जालो हरीदास शुरत्वाच्या नेमें : जाली ठावी वर्मे : पुढीलांची: ॥ छ ॥ जना वेगळें हे असे अभीनव : बळी दील्हा जीव : म्हणउनी : ॥ २ ॥ तुका म्हणे जमे लागलो वील्हेसी : चालतीया दीसी : स्वामी रुणी : ॥ ३ ॥

१८७

प्रेमभेटी आळींगण : मग चरण वंदावें :॥ १ ॥ धृ ॥ यैसा माझा भोळा बाप : हरी ताप कवळुनी : छ ॥ न संगतां सीन भाग : पांडुरंग जाणतसें : ॥ २ ॥ तुका म्हणे कृपावंतें : घावे भाते न मगतां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१८८

सर्वकाळ माझे चीती : हे चीं षंती राहीली ॥ १ ॥ बैसलें तें रुप डोळां : वेळोवेळा आठवें : ॥ छ ॥ वेव्हाराची सरली मात : आषंडीत अनुसंधान:॥२॥ तुका म्हणे वेघ जाला : आंगा आला श्रीरंग ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१८९

मायेबापाचीये भेटी : आवघ्या तुटी संकोचें: ॥ १ ॥ धृ ॥ भोगीलें तें आहे सुष : घातां मुष मोकळे : ।छ॥ उतम ते बाळासाटी : लावी वोटी माउली : ॥ २ ॥ तुका म्हणे जाली धनीं : आनद मनी न स्मायें: ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१९०

वचनांचा या अनुभव हाती : बोलवीती देव मज : ॥ १ ॥ धृ ॥ परी हे न कळे आभावीका : जड लोकां जीवासी : ॥ छ ॥ आस्तुत हे प्रसादीक : कृपा भीक स्वामीची : ॥ २ ॥ तुका म्हणे वरावरी : जातो जऱ्ही सांगत : ॥ ३ ॥

१९१

जैसा दावी तैसा राहे : तरी का देव दुरी आहें : ॥ १ ॥ धृ ॥ दुष पावायाचे मुळ : रीहीणी ठाव ना नीताळ : ॥ छ ॥ मांळा मुद्रवरी : कैचा संगे जोडे हरी ॥ २ ॥ तुका म्हणे देषें : यैसे परीची बहुतेके : ॥ ३ ॥

१९२

[ व. पृ. ५२ ] वदे साक्षत्वेसी वाणी : नारायेणी : मीश्रीत : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ न लगे काही चाचपावें : जातो भावे पेरीत : ॥ छ ॥ भांडार त्या दातीयाचे : मी कईचे ये ठाई : ॥ २ ॥ सादावीत गेला तुका : येथे येकायेकी तो : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१९३

मजुराचें पोट भरे : दाता उरे सचला : ॥ १ ॥ धृ ॥ या रे या रे हातोहाती : काम माती सार हे : ॥ छ ॥ रोज कीर्ती झाडा : होतो रोकडा : ची पर्वोत : ॥ २ ॥ तुका म्हणे पोल पाया : येवु कायाक्लेशासी : ॥ ३ ॥

१९४

भोग भोगावरी घ्यावा : संचीताचा देतां ठेवा : ॥ १ ॥ धृ ॥ शांती धरणे जीवासाटी : दसा उतम हे गोमंटी : ॥ छ ॥ देहे लेषावें असार : सत्य परउपकार : ॥ २ ॥ तुका म्हणे मीरासी : बुडी घ्यावी ब्रम्हंरसी : ॥ ३ ॥ छ ॥

१९५

अवघा तो सकुण : ह्रुदई देवाच चरण : ॥ १ ॥ धृ ॥ येथे नसतां वीयोग : लाभा काये उणे मग : ॥ छ ॥ संग हरीचिया नामाचा : सुचीर्भुत सदा वाचा : ॥ २ ॥ तुका म्हणे हरीच्या दासां : काळ अवघ्या सुध दीसा : ॥ ३ ॥

१९६

व्याल्यावीण करी सोबन तांतडी : चार ते गधडी करीतसे : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ कांसया पाल्हाळ आणीकांचें देषी : सागतां नव्हे सुषी : साषरसी : ॥ छ ॥ कुंथ्याच्या ढेंकरें नेंदवेल पुस्टी : रुप दावी कस्टी : मळीन वरी : ॥ २ ॥ तुका सांगे आरे वाचाळ आईका : अनुभवेंवीन णनका : वाव घेउं : ॥ ३ ॥

१९७

पाहा हो देवा कैसें जन : भीन भीन संचीतें : ॥ १ ॥ धृ ॥ येक नाही येका यैसें : दावी कैसे सध हीण : ॥ छ ॥ पुंच भुतें येकी रासी : शुत्रें कैसी षेळवी : ॥ २ ॥ तुका म्हणे जो जे जाती : तैसी स्थीती आतंसें ॥ ३ ॥

१९८

कोण्हाचीया न पोडो छंदा : गोवीदाची आवडे : ॥ १ ॥ धृ ॥ बहुतांची बहु मतें : अवघे रीतें पोकळ : ॥ छ ॥ घटापटा डव्हळी मन : होये सीन न करुं तें : ॥ २ ॥ तुका म्हणे पाडुरंग : भरुं भंग आला तो ॥ ३ ॥

गोळी १९९

आला देवे अला दीलावे : अला दारु अला षलावे : अला बगर नही कोये : अला कारे सो ही होये : ॥ १ ॥ मर्द होये वो षडा पीर : नामर्दकुं [व.पृ.५३] नही धर : अपणे दीलकुं करणां पुसी : तीन दामकी क्या षुमासी : ॥ २ ॥ सब रसोका कीया मार : भजनगोळी येक ही सार : ईमानो तो सव ही सषा : थोडी तो भी लेकर ज्या : ॥ ३ ॥ जीन्हो पास नीत सोये : वोही बसकर तीसेवें : सातों पांचों मार चलावे : उतार सो पीछें षाव : ॥ ४ ॥ स वो ज्योनी नीकल ज्यावे : पीछें गधडा माटी षावें : गावढाळ सो क्या ल्येवें : हगणी भरी नहीं धोवें ॥ ५ ॥ मेरी दारु जीन्हे पाया : दीदार दरगां

सो ही पाया : ॥ तल्हे मुढी घाल ज्यावे : बीगारी सोवे : क्या लेवें : ॥ ६ ॥ बाज्यारंका बुझे भव : वो ही पुसता आवे ठाव : फुकट बाटुं कहे तुका : लेवे सो ही लें ही सषा : ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥

२००

ब्रम्ह रुपाची कर्मे ब्रम्हरुप : वीरहीत संकल्प होती जाती : ॥ १ ॥ धृ ॥ ठेवीलीया दीसें रगा यैसी सीळा : उपाधी नीराळा अस्फटीक मणी : ॥ छ ॥ नाना भाशे माते आळवीतां बाळ : ॥ प्रबोधीतों मुळ : जननी ठावी : ॥ २ ॥ तुका म्हणे माझें नमन जाणतीयां : लागतुसें पाया वेळोवेळा : ॥ ३ ॥

२०१

नांही सुगधाची लागती लावणी : लावावीते मनी शुध होतां : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ वाऱ्याहाती माप चालें संजनाचें : कीर्तमुष त्याचें : नारायेन : ॥ छ ॥ प्रभा आणी रवी काये असें आन : उदई तवं जन : सकळ सक्षी : ॥ २ ॥ तुका म्हणे बरा सत्याचा सायास : नवनीता नास नाही पुंन्हां : ॥ ३ ॥

२०२

वासनेचे मुषी आदळुनी भीतें : नीर्वाहाया पुरतें : कारण तें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ या नावें अंतरा आला नारायेनें : षुण समाधान : चीत. त्याची : ॥ छ ॥ सर्वकाळ हा चीं करणे वीचार : वीवेकी सादर अत्मत्वाचे : ॥ २ ॥ तुका म्हणे जो जो भजनीसी वळे : आग तो तो कळे सनीधता : ॥ ३ ॥

२०३

तीर्थाटणे येक तपे हुबरती : नाथीलें धरीती अभीमान : ॥ १ ॥ धृ ॥ तैसे वीस्णुदास नव्हेती सावडे : येकाचीया पडे पांयां येक : ॥ छ ॥ अक्षरे आणीती आंगासी जाणीव : इछा ते गौरव पुज्ये व्होवे : ॥ २ ॥ तुका म्हणे वीधीनीसेधाचे डोही : [ व. पृ. ५४ ] पडीले त्या नाही : देव कधी : ॥ ३ ॥

२०४

पट ढाळुं आम्ही वीस्णुदास जगी : लागो नेंदुं आगी : पापपुन्ये : ॥ १ ॥ धृ ॥ नीर्भर अंतरी सदा सर्व काळ : घेतला सकळ : भार माथां : ॥ छ ॥ बळीवंत ज्याणें रचीलें सकळ : त्याचे आम्ह बळ : आकीतांसी : ॥२॥ तुका म्हणे आम्ही देपत ची नाही : देवावीण काही : दुसरे तें : ॥ ३ ॥ छ ॥

२०५

दीप घेउनीयां धुडीती आधार : भेट हा वीचार बोंलों नये : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ वीस्णुदास आम्ही भेउं कळीकाळा : भुलो मृगजळा : न घडे तें ॥ छ ॥ उधळीतां माती रवीकळा मळे : हे कैसे न कळे : भाग्याहीणा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे त्रुणे झाकें हुतासेण : हे तंव वचन : बोंलो नये : ॥ ३ ॥ छ ॥

२०६

आवडीने धरीली नावें : प्रीये भावे चीतन : ॥ १ ॥ धृ ॥ देव वेडा जाला वेडा जाला : लाचवला भक्तीसी : ॥ छ ॥ नीचाडीया चाड धरी : तुळसी करी दळ मागें : ॥ २ ॥ धरीला मग न करी बळ : **तुका** म्हणे बळ पांई ॥ ३ ॥ छ ॥

२०७

अंतरीची घेतो गोडी : पाहे जोडी भावाची : ॥ १ ॥ धृ ॥ देव सोवीरा देव सोईरा : देव सोईरा दीनाचा : ॥ छ ॥ आपलीया वैभवे : श्रीधारावे नीर्मळ : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जेवी सवें : प्रेम घ्यांवे प्रीतीचें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२०८

सदा तळमळे : चींतेचीये हळहळे : ॥१॥धृ॥ त्याचें दरुशन न व्हावावें : शव आसतां तो जीवें : ॥ छ ॥ कुशब्दाची घाणी : अमगळवीली वाणी : ॥ २ ॥ नर्णे शब्दे पर : **तुका** म्हणे परउपकार : ॥ ३ ॥ छ ॥

२०९

धन्य सवसारी : दयावत जे अंतरी : ॥१॥धृ॥ येथें उपकारासाटी : आलें घरा वैकुंठीं : ॥ छ ॥ लटीकें वचन : न ये देही उदासीन : ॥ २ ॥ मधुर वाणी व्होटी : **तुक** म्हणे वाव पोटी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२१०

पुन्यवंत व्होवे : घेतां सजनाची नावें : ॥१॥धृ॥ ने घे माझे वाचे तुटी : माहा लाभ फुकासाटी : ॥ छ ॥ वीश्रातीचा ठाव : पांई संतांचीयें भाव : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जपें : जाती संतांचीया पापें : ॥ ३ ॥ छ ॥

२११

[ व. पृ.५५ ] आळीगणे घडे : मोक्ष सायोजीतां जोडें : ॥१॥ धृ ॥ यैसा संतांचा मंहीमा : जाली बोलायाची सीमा :॥ छ॥ तीर्थे पर्वकाळ : अवघी पांयांपें सकळ : ॥ २ ॥ **तुका** म्हणे देवा : त्याची केली पावे सेवा : ॥ ३ ॥

२१२

डोळ्यामध्यें जैसे कनु : अनु तेही न समाये : ॥१॥धृ॥ तैसें सुध राषा हीत : नका चीत वाटउं : ॥ छ ॥ आपलीयाचा कळवळा : आणीकां बाळांवरी न ये : ॥ २ ॥ तुका म्हणे बीज मुडां : जैसें चाडा पीकाऱ्या : ॥ ३ ॥ छ ॥

२१३

पुढें जेणें लाभ जोडे : तेंच वेडे नासीती : ॥ १ ॥ धृ ॥ येवढी कोंठे नागवण : आंधारोनी वीश ध्यावें : ॥छ॥ होणीरास मीळे बुधी : नेदी सुधी धरुं तें : ॥ २ ॥ तुका म्हणे जणा सोग : दावी रंग आणीक : ॥ ३ ॥ छ ॥

२१४

आईका गाये अवघे जन : सुध मन तें हीत : ॥१॥धृ॥ अवघा वेळ नव्हे तरी : समयावरी जाणावे ॥ छ ॥ नाही कोण्हीं सवे येंतां : संचीतां या वेगळा : ॥ २ ॥ बरा अवकाश आहे : करा साहे ईंद्रीये : ॥ ३ ॥ कर्मभुमी येसा ठाव : वेवसाव जाणावा : ॥ ४ ॥ तुका म्हणे उतम जोडी : जाते घडी नरदेहें : ॥ ५ ॥

२१५

संतें गुरुराये कुपा मज केली : परी नांहीं घडली सेवा कांही : ॥ १ ॥ सांपडवीलें वाटे जातां गंगे स्नाना : मस्तकी तो जाणा ठेवीला करु : ॥ २ ॥ भोजना मागती तुप पाउसेर : पडीला वीसर : स्वप्नामाजी : ॥ ३ ॥ कांहीं कळे उपजला अतराये : म्हणउनी काये त्वरा जाली ॥ ४ ॥ राघो चैईतन्य केसो चैतन्ये : सांगीतली खुण माळीकेची : ॥ ५ ॥ बाबाजी आपुले सांगी-तलें नाम : मंत्र दील्हा रामकुस्ण हरी : ॥ ६ ॥ माहो शुध दसमी पाहोनी गुरवार : ॥ केला अंगीकार : तुका म्हणे ॥ ७ ॥

२१६

माझीये मनीचा जाणोनीयां भाव : तो करी उपाव गुरुराव : ॥ १ ॥ आवडीचा मंत्र सांगीतला सोपा : जेणे नव्हे गुंपा कांही कोठें : ॥ २ ॥ जाती पुढें येक उतरले पार : हा भवसागर सांधु संत : ॥ ३ ॥ [ व. पृ. ५६ ] जाणत्यां नेणत्यां ज्यां जैसी आवडी : उतार सांगडी : तापे पेटी : ॥ ४ ॥ तुका म्हणे मज दावीयेला तारु : कुपेचा सागर पांडुरंग : ॥ ५ ॥ छ ॥ २ ॥

पाठ

२१७

धृ ॥ राम हरे राम हरे राम हरे : रघुराज हरे : ॥ छ ॥ राम जपतां बीज मंत्र नळा : सींधु तरती ज्याच्या प्रतापें सीळा : ॥ १ ॥ कंठ सीतळ जपतां शुळपाणी : राम जपतां आवीनास भोवाणी : ॥ २ ॥ तारक मंत्र स्रवण कासी : राम जपतां वाल्मीक रुसी : ॥ ३ ॥ अहील्या जेणे तारीली रामे : वैस्या परलोका नेली नामे : ॥ ४ ॥ ध्यान जप जीवन मुंनी जना : तुकया स्वामी रघुनंदना : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

२१८

जेणे घडे नारायेणी अतराये : होतां बापमाये : तजावीं ती : ॥ १ ॥ धृ ॥ येर प्रीया पुत्र धन कोण लेषा : करीती तीं दुषा पात्र शुत्रु : ॥ छ ॥ प्रल्हादे जनक बीभीशणे बंधु : राज्य माता नींदु भरथें केली : ॥ २ ॥ तुका म्हणे सर्व धर्म हरी हरीपाये : सांगणें ते काये : लागे तेथें : ॥ ३ ॥ छ ॥

लळीत २१९

आली लळीताची वेळ : आसा सावध सकळ : ॥ १ ॥ धृ ॥ लाहो करा वेगी स्मरा : टाळी वाउन वीश्वभरा : ॥ छ ॥ ॥ जालीयां अवसान : न सपडती हे चरन : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे थोडे अवधी उरले या हेतस : ॥ ३ ॥

२२०

येक वेळ करी या दुषावेगळें : दुरीताचें जाळे उगउनी ॥ १ ॥ धृ ॥ आठवीन पाये हा माझा नवस : रात्री ही दीवस : पांडुरंगा : ॥ छ ॥ बहु दुरवरी भोगवीलें भोगे : आतां पांडुरंगे : सोडवावें : ॥ २ ॥ तुका म्हणे काया करीन कुरवंडी : वोंवाळुन सांडी : मस्तक हें : ॥ ३ ॥ छ ॥

२२१

आणीक म्यां कोणा यावें काकुळती : कोण कांमा येती अंतकाळी ॥ १ ॥ ॥ धृ ॥ तुवो माझी सषी वौसी पांडुरगें : लवकरी यगे वाट पाहें ॥ छ ॥ काया-वाचामनें हे ची काम करी : पाउले गोजीरी चीततसें : ॥ २ ॥ तुका म्हणे माझी पुरवी आस : घाली ब्रम्हरस : भोजन हें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२२२

[ व. पृ. ५७ ] हे आम्हां सकळ : तुझ्या नामाचें ची बळ : ॥ १ ॥ धृ ॥ करुं अमृताचें पान : दुंजे नेणों कांही अनं: ॥ छ ॥ जो जयाचा जो भोग : सुष दुष पीडी रोग : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : तुझे पांई माझ हेवा : ॥ ३ ॥

२२३

अर्त माझा बहु पोटी : होवी भेटी : पांयांसी : ॥ १ ॥ धृ ॥ यास तुम्ही कृपावंत : माझी चीतां : आसो द्या : ॥ छ ॥ तळमळ करी चीत : अंपडीत वीयोगें : ॥ २ ॥ तुका म्हणे पंढरीनाथा : जाणे वेथा अंतरीची : ॥ ३ ॥

२२४

बहु जन्मातरें फेरें : केलें येरें सोडवी : ॥ १ ॥ धृ ॥ आळवीतों करुणांकरें : वीस्वंभरें दयाळें : ॥ छ ॥ वाहावतों मायापुरी : येथें करी कुढावा : ॥ २ ॥ तुका म्हणे दुजे कोंणं : यैसा सीण नीवारी : ॥ ३ ॥ छ ॥

२२५

कपाळ तें काये नव्हे जी वीठला : चीत द्यावे बोला बोबडीयां : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ सोडउनी घ्यावें काळचक्रा हाती : बहुत वीपती भोगवील्या : ॥ छ ॥ ज्यालें जेउं णेदी मारीलें ची मरो : परारब्धा उरो : मागुताली : ॥ २ ॥ तुका म्हणे दुजा घुटला उपाये : म्हणउनी पाये आठवीलें : ॥ ३ ॥ छ ॥

२२६

डौरलों भक्तीसुखें : सेउं अमृत हे मुखें : ॥ १ ॥ धृ ॥ संतसंगें सारुं काळ : प्रेमसुखाचा सुकाळ : ॥ छ ॥ ब्रम्हांदींकासी सुराणी : तो हा आनंद मेदीनी : ॥ २ ॥ नांही वैकुठीचा पांग : धांवे कथें पांडुरंग : ॥ ३ ॥ मुत्क व्होवें कास्यासाटी : कैंची येणे रसे भेटी : ॥ ४ ॥ तुका म्हणे गोड : हें ची पुरे माझें कोड : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

नाट २२७

अवघ्या दसा येणे साधती : मुष्य उपासना सगुणंभत्की : प्रगटे व्हुदई मुर्ती : भाव चीती शुध जाणोनीयां : ॥ १ ॥ बीज आणी फळ हरीनाम : सकळ पुन्य सकळ धर्म : सकळा कळांचें हीं वर्म : नीवारी स्रम : सकळ ही : ॥ २ ॥ जेथें कीर्तन कथा नामघोश : करीती नीर्लज हरीदास : वोथंबरे सकळ ही रस : तुटती पास : भवबंधनें : ॥ ३ ॥ येती आंगा वसती लक्षेणे : अंतरी देवें धरीले ठाणे : आपण चीतीं तयाच्या गुणे : जालें पेणें : सुषवस्तीचें : ॥ ४ ॥ [व. पृ. ५८] न लगे सांडावासे आस्रम : उपजलीये कुळीचा धर्म : आणीक ही न करावा स्रम : येक पुरे नाम वीठोबाचें : ॥ ५ ॥ वेदपुरुश नारायेन : योगीयांचें ब्रम्ह सुन्य : मुक्त आत्मा परीपुर्ण : तुका म्हणे सगुण : आम्ही भोळीयां : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

२२८

फोडीलें भाडारें : माप घेउनीयां षरे : ॥ १ ॥ धृ ॥ केली हरीनामाची वरो : मागील तें आतां सरो : ॥ छ ॥ देसांत सुकाळ : जाला हारपला काळ : ॥ २ ॥ घ्यावें धनीवरी : तुका म्हणे लाहानथोरी : ॥ ३ ॥ छ ॥ १

२२९

आतां हे ची जेंउं हे ची जेंऊं : सवें घ्येउं सीदोरी : ॥ १ ॥ धृ ॥ हरीनामाचा षीचडा काला : प्रेम मोहीला साधने : ॥ छ ॥ चवी चवी घेउं घांसं : ब्रम्हंरस आवडी : ॥२॥ तुका म्हणे गोड लागे : तों तो मागे रसना ॥३॥

२३०

अवघें ची गोड जालें : मागील ये भरी आलें : ॥ १ ॥धृ॥ साहे जाला पांडुरंग : दील्हा अभ्यंतरी संग : ॥ छ ॥ थडीये पावतां तो वाव : मार्गे वाहावतां ठाव : ॥ २ ॥ तुका म्हणे गेलें : स्वप्नींचें जागा जालें : ॥ ३ ॥ छ ॥

२३१

देवाचे म्हणौन देवी आनादर : हे मोटे अस्वीर वाटतसे : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ आतां येरा जना सांगावें तें काई : जया भार डोइ सौसाराचा : ॥ छ ॥ तजुनी सौंसार : अभीमानसाटा : जुलुम हा मोट : दीसतसे : ॥ २ ॥ तुका म्हणे अळस करुणीयां साहे : बळे कैसे पाहे : वायां जाती : ॥ ३ ॥

२३२

कथेचा उलंघ तो अधमा अधम : नावडे ज्या नाम : वोळषा तो : ॥ १ ॥ धृ ॥ कासया जेन्मुनी जाला भुमीभार : अनउपकार : माते कुंसी : ॥ छ ॥ नीद्रेचा आदर जागरणी वीट : त्याचें पोटी कीट : कुपथ्याचें : ॥२॥ तुका म्हणे दोन्ही बुडवीली कुळे : ज्याचे तोड काळे : हरीकथें : ॥ ३ ॥

२३३

तीर्थी अपक्षा स्छळी वाढे धर्म : जाणावे तें वर्म बहु पुन्य : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ बहु वरी यैसी भावीकांची जोडी : काळ नाही घडी वांयां जात : ॥ छ ॥ करुनी चींतन करावे आणीका : तो या जाला लोकां नाव जगी : ॥ २ ॥ तुका म्हणे यैसें परउपकारी : त्याच्या पायांवरी माझी डोवी : ॥ ३ ॥

२३४

[व.पृ.५९] करी हें ची काम : मना जपे राम राम : ॥ १ ॥ लागो हा ची छंद : मना गोवीद गोवीद : ॥ २ ॥ तुका म्हणे मना : मज भीके देवी दीना : ॥ ३ ॥ छ ॥

२३५

साडूनी दो अक्षरा : काये करुं हा पसारा : वीधीनीशेधाचा भारा : तेणे दातारा : नातुडसी : ॥ १ ॥ म्हणउनी बोबडां उतरी : वाचे जप नीरंतरी : नाम तुझें हरी : भवसागरी तारुं तें : ॥ छ॥ सर्वमये यैसें वेदाचें वचन : भृती गर्जती पुराणें : नाही अणीक साधनें : ॥ रे मज मुक्तीची चाड : ॥ २ ॥ सेवटी ब्रम्हां आर्पण : हे ची मंत्राचें कारण : काना मात्र वायांवीण : तुका म्हणे वींदलें ॥ ३ ॥ छ ॥

२३६

हरीनामाचें करुणी तारु : भवसींधुपार उतरोलों : ॥ १ ॥ धृ ॥ फावलें फावलें आतां : पाई संतां वीनटलो : ॥ छ ॥ हरीनामाचा शस्त्र घोडा : सर्वसार गाढा : छेदीयेला : ॥ २ ॥ हरीनामाचीं धनुस्यकांडें : वीन्मुष तोडें : कळीकाळ : ॥ ३ ॥ येणें ची बळें सरतें आम्हीं : हरीचा नामी तीही लोकी : ॥ ४ ॥ तुका म्हणे जालों साचे : श्रीवीठलाचें डींगर : ॥ ५ ॥ छ ॥

२३७

नव्हे गुरुत्व मेघवृस्टीवाणी : आईकावी कानी : संतंजनी : ॥ १ ॥ धृ ॥ अरुश हा शब्द देवाचा प्रसाद : करवीला वाद तैसा केला : ॥ छ ॥ देहेपीड दान दील्हा येकसरें : मुळीचे तें षरें : टांकसाळी : ॥ २ ॥ तुका म्हणे झरा लागला नवनीत : सेवीलींयां हीत : पोट धाये : ॥ ३ ॥ छ ॥

२३८

पात्र शुध चीत गोही : न लगे कांही : सांगणें : ॥ १ ॥ धृ॥ सुर तरी सते ची व्होवें : साटी जीवे : करुनीयां : ॥ छ ॥ अमुष च सुष मान : स्वामीजन : मानावे : ॥ २ ॥ तुका म्हणे जैसी वाणी : तैस मणी : परीपाक : ॥ ३ ॥

२३९

प्रगटलें ज्ञान : नारायेन भुती तें : ॥ १ ॥ धृ ॥ अनुभव च घेउं व्होवा : वीनती देवा : करुनीयां : ॥ छ ॥ देषोवेषी वदे वाणी : पडील्या काणी : प्रमानें : ॥ २ ॥ तुका म्हणे योगक्षम : घडे ते वर्म : साधानें : ॥ ३ ॥ छ ॥

२४०

[ व. पृ. ६० ] मुष्य आधी वीशयेत्याग : वीधीभाग पाळणे : ॥ १ ॥ धृ ॥ मन पावे समाधान : हे ची दान देवाचे : ॥ छ ॥ उदासीन वृती देही : ॥ चाड नाही पाळनें : ॥ २ ॥ तुका म्हणे नाही भये : सम सोये : वीशमाची : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२४१

आतां हें ची सार हें सार : मुळ बीज आईका : ॥ १ ॥ धृ ॥ आवडीने आवडी उरें : जे ज्या झुरे तें त्यासी : ॥ छ ॥ प्रेमाची ते सुत्र दोरी : नाहीं उरी उरवी तुका म्हणे चींतन बरे : आहे षरे षऱ्यापे : ॥ ३ ॥ छ ॥

२४२

आनदाचे डोही आनदतरंग : अनंद ची आंग अनंदाचें : ॥ १ ॥ धृ ॥ काये सांगो जालें काहींचीया बांही : पुढें चाली नाही आवडीनें : ॥ छ ॥ गर्भाचें आवडी : मातेचा डोहळा : तेथीचा जीव्हाळा : तेथे बींबें : ॥ २ ॥ तुका म्हणे तैसा वोतलासे ठसा : अनुभव सरीसा : मुषा आला : ॥ ३ ॥ छ ॥

२४३

यैस या संपती आम्हा सवसारी : भोगाचीया परी काये सांगो : ॥ १ ॥ धृ ॥ काम तो कामना भोगीतसे देवा : आलींगणे हेवा चरण चुंबीं : ॥ छ ॥ शांतीच्या सयोगे नीरसला ताप : दुसरे तें पाप : भेदबुधी : ॥ २ ॥ तुका म्हणे पाहें तीकडे सारीषें : आपले पारीषे नीरसलें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२४४

म्हणौन धरीलें पाये : ॥ आवो माये वीठल : ॥ १ ॥ धृ ॥ आपुलें ची करुनी घ्यावें : आस्वासावें : ना भासें : ॥ छ ॥ वाढली ते तळमळ चींता : सम आतां करावी : ॥ २ ॥ तुका म्हणे जीवी वसे : मज नसे वेगळा : ॥ ३ ॥

२४५

वृक्षवली आम्हां सोईरीं वनचरें : पक्षी यें सुस्वरें : अळवींती ॥ १ ॥ धृ ॥ येणे सुषे रुचें येकातांचा वास : नाही गुणदोस : आगा येत : ॥ छ ॥ आकास मडप धरणी आसन : रमे तेथें मन : क्रीडा करुं : ॥ २ ॥ कंथा कुमडल देह उपचारा : जाणवीतो वारा : आवस्वरु : ॥ ३ ॥ हरीनामे भोजन प्रवडी वीस्तार : करुणी प्रकार : सेउं रुची : ॥ ४ ॥ तुका म्हणे होये मनासी संवांद : ॥ आपलाची वाद : आपण्यांसी : ॥ ५ ॥ छ ॥

२४६

[ व. पृ.६१ ] कल्याण या असीर्वादें : जाती द्वदे नासोनी :॥१॥ धृ ॥ अस्वासीलें नारायेण : प्रेमदाने : अंतरीच्या : ॥ छ ॥ गेली नीवारोनी आतां : सकळ चींतां यावरी : ॥२॥ तुका म्हणे गातां गीत : आलें हीत सामोरें : ॥३॥

२४७

सदगदीत कंठ दाटो : येणे फुटो : र्‍हुदये : ॥ १ ॥ धृ ॥ चींतनाचा या लाहो : तुमच्या आहों : वीठला : ॥छ॥ नेत्रीं जळ वाहो सदा : अनंदाचे रोमाच : ॥ २ ॥ तुका म्हणे कृपादान : ईछी मन : हे जोडी : ॥ ३ ॥ छ ॥

२४८

घटीं अलीप्त असे रवी : अग्नी कास्टामाजी तेवी नारायेणा जीवी : जीव साक्षी वर्तनें : ॥ १ ॥ धृ ॥ भोग ज्याचें तया आगी : भीनं परारब्धे जगी : वीचीत्र ये रंगी : रंगें रंगला गोसांवीं : ॥ छ ॥ देहे संकल्पासारीखें : येक येकासी पारीखें : सुखे अणी दुखें : कर्मे आंगी त्रीवीधें : ॥ २ ॥ तुका म्हणे कोडे : न कळे तयासी साकडें : त्याचीया नीवाडें : उवे केलें वीदान :॥३॥

२४९

डांई घालुनीयां पोरें : त्यांचीं गुरें चुकवीली : ॥ १ ॥ धृ ॥ षेळ षेळतां फोडील्या डोया : आपण होया नीराळा : ॥छ॥ मारीती माया घेती जीव : नाही कीव अन्यांये : ॥२॥ तुका होता कान्होबा मागें : तया आगें कळों आलें : ॥३॥

२५०

लाज नाहीं वीचार : बाजारी तुं भांडषोर : ॥ १ ॥ धृ ॥ यैसें ज्याणे ह्मोवें : त्यांची गाठी तुजसवें : ॥ छ ॥ फेडीसी लंगोटी : घेसी संकळांसी तुटी : ॥ २ ॥ तुका म्हणे चोरा : तुला आप ना दुसरा ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२५१

जे जे जेथे पावें : ते ते समर्पा तें सेवें : ॥ १ ॥ धृ ॥ अवघें भोगीतां गोसावी : आदी पश्चयातीका भावी : ॥ छ ॥ सहज पुजा याची नावें : गळीत अभीमाने व्होवें : ॥ २ ॥ तुका म्हणे सीण : न धरीतां नांहीं भीन : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२५२

मान अपमान गोवें : अवघे गुंडुन ठेवावे : ॥ १ ॥ धृ ॥ हें ची देवाचे दरुशेन : सदा राहे समाधान : ॥ छ ॥ शांतीची वसती : तेथे षुंटे काळगती : ॥ २ ॥ [ व. पृ. ६२ ] **तुका** म्हणे आहे : थोडें आली उर्मी साहें : ॥ ३ ॥ छ ॥

२५३

पोटापुरतें काम : परी अगत्य तो राम : ॥ १ ॥धृ॥ करणे ते हे ची करी : चीती पांडुरंग धरी : ॥ छ ॥ परारब्धी हेवा : जोडी देवाची ते सेवा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे बळ : बुधी वेचुनी सकळ : ॥ ३ ॥ छ ॥

२५४

नसे तरी मनी नसो : परी वाचे तह्नी वसो : ॥ १ ॥ धृ ॥ देहे पडो या चींतनें : वीठल नाम संकीर्तनें : ॥ छ ॥ डंभे स्फीती भलत्या भावें : मज हरीजन म्हणावें ॥ २ ॥ **तुका** म्हणे काळे तह्नी : मज सांभाळील हरी : ॥ ३ ॥

२५५

हरीनामवेली पावली वीस्तार : फळी पुश्पी भार : वोल्हावला : ॥ १ ॥ ॥ तेथे माझ्या मना होये पक्षीराज : साधावया काज त्रुप्तचि ये : ॥ छ ॥ मुळीची बीजें दाषवीली गोडी : लोकरी च जोडी : जाली याची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे क्षणक्षणा जातो काळ : गोडी ते रसाळ : अंतरैल : ॥ ३ ॥ छ ॥

२५६

बरवे येसें आलें मना : नारायेना या काळें : ॥ १ ॥ धृ ॥ देव आम्हां प्रणसषा : जालें दुषा षंडण : ॥ छ ॥ जन्मांतरीच्या पुन्यरासी : होत्या त्यासी : फळ आले : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नीज ठेवा : होईल होवा : लाधोलो ॥ ३ ॥ छ ॥

२५७

जरी हे आड येती लाज : कैसे काज साधतें : ॥ १ ॥ धृ ॥ करणे केले उठाउठीं : पाई मीठी : घातली : ॥ समर्पीला जीवेभाव : धरीला भाव : अषड : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आड कांही : काळ नाहीं : घातला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२५८

केला तैसा अंगीकार : माझा भार चालवी : ॥ १॥ धृ ॥ होउं अंतरायें बुधी : कृपानीधी : नेदावी : ॥ छ ॥ आम्हीं तरी जडजीव : कैंचा भाव : पुरता : ॥ २ ॥ अन्यन्यभावे द्यावी सेवा : आम्हा देवा : घडसी : ॥ ३ ॥ तुम्ही आम्ही शरणागतें : कृपावंतें रक्षीजें : ॥ ४ ॥ तुका म्हणे भाकुं कीव : असो जडजीव आम्ही : ॥ ५ ॥

२५९

नाम घेतां मन नीवे : जीह्वे अमृत ची स्रवे : ॥ होताती बरवे : यैसे सकुण लाभाचें : ॥ १ ॥ धृ ॥ मन चांगले रंगलें : ॥ तुझा चरणी स्थीरावलें : केलीयां वीठलें : कृपा यैसी जाणावीं : ॥ छ ॥ [ व. पृ. ६३ ] जाले भोजनसें दीसें : चीरा पडोन ठेला ईछे : धालीयाचे यैसे : आगा येती उद्गार : ॥ २ ॥ सुष मेटो अलें सुषा : नीध सांपडला मुषा : तुका म्हणे लेखा : आतां नाही आनंदा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२६०

रुची रुची घेउं गोडी : प्रेम सुषे जाली जोडी : ॥ १ ॥ धृ ॥ काळ जाउं नेदु वांया : चीतीतां वीठोबाच्या पांयां : ॥ छ ॥ करुं भजने भोजन : धणी घेउं नारायेण : ॥२॥ तुका म्हणे जीव धाला : होये तुझ्याने वीठला:॥ ३॥

२६१

बहु गर्भवासीं : सोसे मेलों उंपवासी : नाहीं सषी यैसी : तेथे कोण्ही भेटली : ॥ १ ॥ धृ ॥ करी करी रे स्वहीत : देहें तंव हे अनीत : नाही दीलहे चीत : सोडउं मोहापासुनी : ॥ छ ॥ पाळी तोंडीचीया घांसें : ते ची होये अनारीसें : ज्याच्या नव्हे यैसें : षेदी परी सोडवीना : ॥ २ ॥ तुका म्हणे धन माने : माझ्या बाटोलो मींपणें : नाही दील्हा जने : देषों लोभे हा लाभ ॥ ३ ॥

२६२

आतां उघडे डोळे : जरी अद्यापी न कळे : तरी मातचीये षोळे : दगड आलो पोटासी : ॥ १ ॥ धृ ॥ मनुस्यदेहा यैसा नीध : साधीली ते सीध : करुनी प्रबोध : संत पार उतरलें : ॥ छ ॥ नाव चद्रभागातीरी : उभा पुंडलीकाचें द्वारी : कट धरुनीयां करी : उभाउभी पाववी : ॥ २ ॥ तुका म्हणें फुकासाठी : पांई घातलीयां मीठी : होतो उठाउठी : लोकरी च उतार : ॥ ३ ॥

२६३

कर्म धर्मे न व्हती सांग : उण्यां आगें पतन : ॥ १ ॥ धृ ॥ भलत्या काळे नामावळी : सुलभ भोळी : भावीका : ॥ छ ॥ प्रायेस्चीतें पडती पायां : गाती तया वैस्णवाच्या : ॥२॥ तुका म्हणे नुपजे दोश : करा घोश : आनद : ॥३॥

२६४

पाहा रे हें देवत कैसें : भक्तीपीसें : भावीका १ ॥ धृ ॥ पाचारील्या सरीसे पावें : यैसें सेवे : बराडी : ॥ छ ॥ शुक्क कास्टीं गुरगुरी : लाज हरी : न धरीतां : ॥ २ ॥ तुका म्हणे अदनामी : यैसी धरी रुपडी : ॥ ३ ॥ छ ॥

२६५

ईछीती तयासी होवे जी अरुप : आम्हांसी स्वरुप : रुछीती चाड : ॥ १ ॥ धृ ॥ आतां नव्हे माझा भाव अनारीसा : पाउलाना ईछा : गोवीयेली : ॥ छ ॥ [ व. पृ. ६४ ] लेकरासी कोठे जाणत्याची परी : करुं येतें दुरी धरावया : ॥ २ ॥ लागली न सुटे नामाची अवडी : माझी भाव जो[१] जोडी : भंगुं नका : ॥ ३ ॥ घेसील वेढे मुक्तीच्या अभीळासे : चाळवी जा पीसें : ब्रम्हज्ञानी : ॥ ४ ॥ तुका म्हणे माझा कोठे भक्तीरस ॥ पाडावया वोस : चाळवीसी : ॥ ५ ॥

२६६

याचीसाटी वनातर : घेतो साडुनीयां घर : ॥ १ ॥ धृ ॥ माझें दीठा-वैल प्रेम : बुधी होईल नीह्काम : ॥ छ ॥ अद्वैताची काणी : नाही आईत वाणी : ॥ छ ॥ २ ॥ तुका म्हणे अंहं ब्रम्ह : अड येउं नेदी स्रम : ॥ ३ ॥ छ

२६७

डौरैलो भक्तीसुखे : सेउं अम्रत हें मुखें : ॥ १ ॥ धृ ॥ संतसगें सारु काळ : प्रेम सुखाचा सुकाळ : ॥ छ ॥ ब्रम्हांदीकांसी सुराणी : तो हा आनद मेदीनी ॥ २ ॥ नाही वैकुठाचा पांग : धावें कथेंसी श्रीरंग : ॥ ३ ॥ मुक्त व्होवे कशासाटी : कैची येणे रसें भेटी : ॥ ४ ॥ तुका म्हणे गोड : हें ची पुरलें माझें कोड : ॥ ५ ॥ छ ॥

---

१ ' जो ' अधिक पडला आहे. मूळ वहींत अशीं अधिक अक्षरें चुकून लिहिलीं जाऊन तीं वर तीन उभ्या रेघा काढून खोडिलीं आहेत. तसें येथें करण्याचें राहिलें.

२ हा अभंग दुबार आला आहे. मागे पृ. ४२ वर २२६ वा अभंग पहा.

२६८

आम्हा भावीकाची जाती : येकवीध जी श्रीपती : आळकारयुक्ती : सगे सके चीना : ॥ १ ॥ धृ ॥ जाणे माउली त्या घुणां ॥ : क्षोभ उपजों नेदी मना : सांतउनी स्छाना : लावी अवो कृपाळे : ॥ छ ॥ तुज अवघे होउं येते : मज बाटों न ये चीतें : उपासनेपरतें : न ये कांही आवडो : ॥ २ ॥ करुं रुपाची कल्पना : मुर्षी नाम उंचारणा : तुका म्हणे जना : जळस्छळ देषतां॥३॥

२६९

जेथे तेथें देवें उभा : अवघ्या गगनाचा गाभा : ॥ १ ॥ धृ ॥ डोळा बैसले बैसलें : ध्यान राहोनी संचले : ॥ छ ॥ सरसावीलें मन : केलें सोज्वळ लोचन : ॥ २ ॥ तुका म्हणे सर्वे : आतां आसीजै तें देवें : ॥ ३ ॥ छ ॥

२७०

तान्हे तान प्याली : भुक भुकेने षादली : ॥ १ ॥ धृ ॥ जेथे ते ची नाही जालें : झाडा घेतला वीठलें :॥ छ॥ वास वासनेसी नाही : मन पांगुळले पाई : ॥ २ ॥ शेशा उरला तुका : जीवा जीवी जाला चुका : ॥ ३ ॥ छ ॥

२७१

पाणीपात्र दीगांबरा : हस्त करा सारीषें : ॥ १ ॥ धृ ॥ अवसेक देव मनी : चींतनी सादर : ॥ छ ॥ [ व. पृ. ६५ ] भीक्षा कामधेनु यैसी : अवकासी सयेन : ॥ २ ॥ पांचरंगोनी तुका दीसा : केला वास अलक्षी : ॥३॥

२७२

तीही त्रीभुवनी : आम्ही वैभवाचे धनी : ॥ १ ॥ धृ ॥ हाता आले धावडाव : आमचा मायेबाप देव : ॥ छ ॥ काये त्रीभुवनी बळ : आंगी माझें तें सकळ : ॥ २ ॥ तुका म्हणे सता : आवघी आमची च अतां : ॥ ३॥

२७३

वीशई वीसर पडीला नीसेन : आंगी ब्रह्मरस ठसावला : ॥ १ ॥ धृ ॥ माझी मज जाली अनावर वाचा : छंद या नामाचा घेतलासे : ॥ छ ॥ लाभाचीया सोसें पुढें चाली मना : धनाचा कृपणा : लोभ तैसा : ॥२॥ तुका म्हणे गंगा सागरसंगमी : अवघ्या जाल्या उर्मी यकमये : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२७४

कृस्णरामनामे माडी पांवोळी : तेणें होईल होळी : पापा घुणी ॥ १ ॥ ॥ धृ ॥ यैसा मन छंद लावी रे अभ्यास : जया नाहीं नास : ब्रह्मरसा : ॥छ॥

जोडी तरी अैईसी करावी नसरे : पुढें आस नुरे : मागुताली ।। २ ।। **तुका** म्हणे यैसें धरा काहीं मनी : यातायाती षाणी : चुकतील : ।। ३ ।। छ ।।

२७५

न ये जह्नी कांहीं : तह्नी भलें ये ची वाही : ।। १ ।। धृ ।। म्हणवील्या वरी दास : कोण्ही न धरी वेठीस : ।। छ ।। समर्थाच्या नावें : भलतैसें ची वीकावें : ।। २ ।। **तुका** म्हणे सता : घरी असें ते बहुतां : ।। ३ ।। छ ।।

२७६

ज्यांचे हीणपणें : कासयाच्या प्रयोजनें : ।। १ ।। धृ ।। प्रारब्धीं सौसार : बरी हीमातीची थार : ।। होनार तें काहीं : येथे अवकळा नाही : ।। २ ।। **तुका** म्हणे देवें : क्रुपा केलीयां बरवें : ।। ३ ।। छ ।। छ ।।

२७७

कीती रांडवडें : घालुन व्होल रे बापुडें : सौसाराचे भीडें : कासावीस जालती ।। १ ।। धृ ।। माझा स्वामी शरण रीघा : क्रुपाळु वा पांडुरंगा : ठेवी अंगसगा वीस्वासीयां जवळी : ।। छ ।। कांही न मगतां भलें : होवील ते ची काम केलें : नसावें अथीलें : काही येका संकल्पें : ।। २ ।। **तुका** म्हणे भाव पाववील या ठाव : येकवीध जीव : ठेवीलीयां सेंवेसी : ।। ३ ।। छ ।।

२७८

[ व. पृ. ६६ ] यैसे साडुनीयां धुरे : कीवीलवाणी दीसा कां रें : कामे उर भारे : हांवीं नुरें मृतीका : ।। १ ।। धृ ।। उदार हा जगदाणी : पांडुरंग आभीमानी : तुळसीदळ पाणी : चींतनांचा भुकेला : ।। छ ।। न लगे पुसावी चाकरी : कोन्ही वैकुल ये घरी : त्याचा तो ची करी : प्राप्तत्ये सकळ : ।।२।। नाही अडकाठी : **तुका** म्हणे जातां भेटी : नोबलतां मीठी : उगी ची पांई घालावी ।। ३ ।। छ ।। छ ।।

२७९

यैसे कां जालें तें मज न कळे : कीर्तनाचें रळे पळे जगी ।। १ ।। ।। धृ ।। कैसे तुम्हां देवा वाटतसें बरे : संतांची उतरे : लाजवीलीं : ।। छ ।। भावीकां कंटक करीताती पीडा : हा तवां रोकडा : अनुभव : ।। २ ।। **तुका** म्हणे नाम नीर्वानीचा बाण : याचा आभीमान : नाही तुम्हा : ।। ३ ।।

२८०

जये ठांई आवडी ठेली : मज ते बोली : न संडें : ॥ १ ॥ धृ ॥ पुरवांवें जीवींचे कोड : भेटी गोड : तुज मज : ॥ छ ॥ अणीले ते येथेवरी : रुप दुरी : न कारांवे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नारायेना : सेवाहीणा : धीग्य वृती ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२८१

नाचांवेंसें वांटे मना : छंदगुणा : अधीन : ॥ १ ॥ धृ ॥ चेववीली माझी गात्रें : सतासुत्रें : हालती : ॥ छ ॥ नामे रुपे रंगा आली : ते ची चाली : स्वभावें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे पांडुरंगें : अंगसं : कवळीलों ॥ ३ ॥

२८२

वंदी कोण्ही मारी : नींदी कोण्ही पुजा करी : ॥ १ ॥ धृ ॥ मज हे ही नाही ते ही नाहीं : वेगळा दोंहीं : पासुनी : ॥ छ ॥ देहभोग भोगें घडें : जे जे जोडे : ते बरे : ॥ २ ॥ अवघें पावे नारायेणी : जनार्दनी **तुकयाचे**॥३॥

२८३

बाप करी जोडी : लेकराचें ओढी : आपली करवडी : वाळउनी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ येकायेकी केलों मीरासीचा धनी : कडीये वागउनी : भार षांदी ॥ छ ॥ करुनीयां पाहे डोळा आळंकार : ठेवा दावी थोर : करुनीयां ॥ २ ॥ **तुका** म्हणे नेदीं गांजुं आणीकासी : उदार जीवासी : आपलीया : ॥ ३ ॥

२८४

याल ठाव तरी राहेन संगती : संतांचें पगती : पांयांपांसी : ॥ १ ॥ धृ ॥ आवडीसाटी आलोसे टाकुन : [व. पृ. ६७] आतां उदासीन : न धरावें : ॥ छ ॥ सेवटील स्छळ नीच माझी वृती : आधारें वीश्रांती : पावैन : ॥ २ ॥ नामदेवापांई : ॥ **तुकया** स्वप्नी भेटी : प्रसाद हा पोटी : राहीलासे : ॥ ३ ॥

२८५

यारे हरीदासनो जीकों कळीकाळा : आमंचीया बळा : पुढें कीती बापुडें : ॥ १ ॥ धृ ॥ रंग सुरंग घमंडी नाना छंदें : हांश वीनोदें : मनाचीये अवडी : ॥ छ ॥ येने तेने प्रकारे बहुतां सुष जोडें : पुजन ते घडें : नारायेना अंतरीं : ॥ २ ॥ वांकडीया माना बोल बोलावे अरुश : यईल ते त्यास छद

पढीये गोवींदा : ॥ ३ ॥ आपल्या आनदे यकापुढे यंक नटा : नाही यथें मोटां : लाहान ये प्रसंगीं : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे येथें प्रेम भंगु न ये कोण्ही : देवभत्क दोन्ही : नीवडीतां पातक : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

२८६

नामाचीया बळे कैवल्य साधन : उगें ची णीधान : हाता चढे : ॥ जाणौनी हें वर्म भक्त भागवत : राहीलें नीवांत प्रेमबोधें : ॥ १ ॥ धृ ॥ कोण जप तप वाहे हें काबाड : म्हणती अवघड : या रे नाचों : ॥ छ ॥ उघडी समाधी हरीकथा सोहळा : नर नारी बाळा : लाहानथोरें : ॥ छ ॥ छंदें वाती टाळी : गावो नामावळी : जेजेकारे होळी : दहन दोश : ॥ २ ॥ येणे ब्रम्हांनंदे डुमडुमीले जग : सुलभ हा मार्ग: सापडला : ॥ **तुका** म्हणे हरीभक्तीचे उल्हस : आणीलासे त्रास : येमदुतां : ॥ ३ ॥ छ ॥

२८७

प्रेमं देवाचे देणें : देहेभाव जाये तेणे : न धरावी मने : शुधा दश-काळाची : ॥ १ ॥ धृ ॥ मुक्त लज्यावीरहीत : भाग्यवत हरीभक्त : जालें बोसंडत : ॥ नामकीर्ती पवाडे : ॥ छ ॥ जोडी जाली अवीनास : जाले हरीचे दास : त्याचा नव्हे गर्भवास : परब्रम्ही सौरसु : ॥ २॥ हे ची वाहाती सकल्प : पुन्यप्रसंगाचा जप : **तुका** म्हणे पाप : गांवी नाहीं हरीजना : ॥ ३ ॥ छ ॥

२८८

[ व. पृ. ६८ ] नाही यैसें गाठी पुन्ये : जेणे घडे दरुशेण : करुनी चीतंन : काळ सारु या रीती : ॥ १ ॥ धृ ॥ नाचैईन या संतांपुढे : लाज साडुनी उघडें : सेवीन तो कोडें : उचीस्टाचा प्रसाद : ॥ छ ॥ घालुनीयां कास : होईन मोकळा उदास : करुं ब्रम्हरस : सेवन हा आनदें : ॥ २ ॥ आला तो ची घ्यावा : होईल संचीताचा ठेवा : पुढीलाचा हेवा : **तुका** म्हणे अनुचीत : ॥ ३ ॥ छ ॥

२८९

जे या घाले ब्रम्हांनंदे : आम्हां सोये त्याची पदें : संतांच्या सवादे : मथैल तें नवनीत : ॥ १ ॥ धृ ॥ याचकासी कस्ट नाही : वेळ राषोनीयां राही : भोजनसमई : होईल येकी पंगंती : ॥ छ ॥ वीस्वस हे उपासन : भांडवल आम्हां दीना : आणीका त्या हीणा : सर्व शक्ती षुंटीत : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वर्म : हा ची येक सर्व धर्म : ॥ मागणे ते प्रेम : आम्हां भीक्षा उद्देश : ॥३ ॥

२९०

बैसों चालो जेउं : तेथे ताम तुझें घेउं : ॥ १ ॥ धृ ॥ रामकुस्णनाम-माळा : घालु वोउनीयां गळा : ॥ छ ॥ वीस्वास हा धरुं : नांव बळकट कारु ॥ २ ॥ **तुका** म्हणे आतां : ॥ आम्हां जीवन हें अशक्तां : ॥ ३ ॥

२९१

देह तुझा पांई : ठेउनी जालो उतराई : ॥ १ ॥ धृ ॥ काये करणे तें देवा : आतां करा माझ्या जीवा : बहु आपराधी : मतीमंद हीणबुधी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नेणे : ॥ भाव भक्तीची लक्षेणे : ॥ ३ ॥ छ ॥

२९२

कंठी राहे नाम : आगी भरोनीयां प्रेम : ॥ १ ॥ धृ ॥ यैसें द्यावें कांही दान : ॥ आलो पतीत शरण : ॥ छ ॥ संतांचीये पाई । ठेवी वेंळोंवेळां डोई : ॥ २ ॥ **तुका** म्हणे तरें : भवसीधु येकसरे : ॥ ३ ॥ छ ॥ २

२९३

नं संडवे अनं : मज न सेववे वनं : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणौनी नारायेन् : कीव भाकीतो करुणा : ॥छ॥ नाहीं आधीकार : कांहीं घोकाया अक्षरं : ॥ २॥ **तुका** म्हणे थोढे आयुस्य अवघें ची कोडें : ॥ ३ ॥

२९४

कर्मभुमी उतम ठाव : साहे भाव : जालीयां : ॥ १ ॥ पावीजैल उर्ध्व गती : ब्रम्हस्थीती जीवासी : ॥ छ॥ धीराचीये आंगी फळ : जालें बळ : कारण : ॥ २ ॥ **तुका** म्हणे देव भाग्ये : अवघी मागे : पाहाती : ॥ ६ ॥ छ

२९५

[ व. पु. ६९ ] वीटाळ तो परद्रव्य परनारी : येथुनी जो दुरी : तो सोवळा : ॥ १ ॥ धृ ॥ साभाळा रे कोण्ही करी ते स्वहीत : पापपुन्य चीत : भांडवल : ॥ छ ॥ गर्दे पर्ये कार्हीं न करा उपाधी : स्वाधीन ची बुधी : करुनी ठेवा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जावे न लगे वनांतरा : वीस्व वीस्वंभरा : सारीष ची : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

२९६

ज्यांचा यैसा अनुभव : वीस्वदेव सत्यत्वें : ॥ १ ॥ धृ ॥ देव तया जवळी असें : पाप नासें दरुसेणे : ॥ छ ॥ कामक्रोधा नाही चाली : भुती जाली समता : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भेदाभेद : गेले वाद : वारोनी : ॥ ३ ॥

२९७

बीजा पोटी पाहे फळ : वीध न करीतां सकळ : ॥ १ ॥ धृ ॥ तया म्हणे मुर्ष वेडे : कैसें तुटैल सांकडे : ॥ छ ॥ दावीतीया वाट : वेठी धरूं पाहें चाट : ॥ २ ॥ पुढीला उपाया : **तुका** म्हणे क्लेश काया : ॥ ३ ॥

२९८

माझा दंड पांयां पडणे : हे वचने वारांवी : ॥ १ ॥ धृ ॥ तो वरी तो नों बोलावें : षोटें जीव गेलीयां ॥ छ ॥ अवघे पाप या चीं नावें : सत्य ठावे असो द्या : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वीज्ञापना : अवघ्या जणा : परीसा हे ॥ ३ ॥

२९९

आपले तों नाही : येथे सांगीजेसें कहीं : ॥ १ ॥ धृ ॥ परी हे वाणी वाईचळ : छंद करवी बरळ : ॥ छ ॥ पंच भुतांचा हा मेळ : देहे सत्यत्वे नीराळा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भुली : ईच्छा उफराटी चाली : ॥ ३ ॥

३००

आतां हेवा करा सोस : भक्तीरस बहु गोड : ॥ १ ॥ धृ ॥ गोड जालें गोड जाले : घरा आलें बदरीचें : ॥ छ ॥ पावलीयाची चींतां नाही : आड कांही मागण्या : ॥ २ ॥ **तुका** म्हणे संचीताचे : नेणे काचें राहोतें : ॥ ३ ॥

३०१

सोंवळा तो जाला : ज्याचा देवें आंगीकार केला : ॥ १ ॥ धृ ॥ चुकला हा भार : तयाची च येरझार : न लगे काहीं चींतां : काहीं करावी ते आतां : ॥ २ ॥ **तुका** म्हणे दास : तया झाल्यां नाही नास : ॥ ३ ॥

३०२

[ व. प्र. ७० ] सेवा ते आवडी उच्चारावे नाम : ॥ भेदाभेदी काम नीवारावें : ॥ १ ॥ धृ ॥ न लगें हालावें चालावे बाहेरी : अवघें ची घरी बैसलीयां : ॥ छ ॥ देवाची नावें देवाचीये सीरीं : सर्व आळंकारी : समर्पावी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे होये भावें ची संतोसी : वसे मनापासी : अपलीया : ॥ ३ ॥

३०३

लेववीला तैसा शोभे अळंकार : केला तैसा थोर : लाहान ही : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ गोवी पडो नेदी आधीकारा यैसी : गुणाची हे रासी : पांडुरंग : ॥ छ ॥ जाणत्यां जाणतां : नेणत्यां सारीषा : नीदसे प्रारीषा : जीवाहुनी : ॥ २ : **तुका** म्हणे पाहे चींतंनाची वाट : ॥ मग द्यावी नीट : धावं नेटे : ॥ ३ ॥

३०४

आम्हां घरीं गाये : येकी दुभता हे : पान्हां न समाये : तींही लोकी : ॥ १ ॥ वान तें सावळी : नाम हे श्रीहरा : चरे वसधरा : चौदा भुवनें : ॥२॥ वछ नाही माये : भलत्यासवें जाये : कृवाळी तो लाहे : भाव भरणा : ॥ ३ ॥ चहुं धारी क्षीर वोळली अमुप : ॥ धालें सनकादीक : सीध मुनी : ॥४॥ तुका म्हणे माझी भुक ते काये : ॥ जोगावीले तीये तीन्हीं लोक : ॥ ५ ॥

३०५

ज्ञानीयाच्या घरीं : चोजवीतां देव : तेथें अहंभाव : पाठी लागें : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणौनी ऐसें साडीलें उपाये : धरीयेलें पाय दृढ तुझें : ॥ छ ॥ वेदपरायेन पंडीत वाचक : ॥ नीमळती येक येकांमधे : ॥ २ ॥ आपलीया नाहीं नीवालें अगें : योगी करीती रागें गुरुगुरु : ॥ ३ ॥ पाहों गेलो भाव कैसी अत्मनीस्टां : तेथे देषें चेस्टा : वीपरीत : ॥ ४ ॥ तुका म्हणे मज कोण्हांचा पांगीला : नको गा वीठला : करु आतां : ॥ ५ ॥

३०६

न करी संग न व्हाये नीश्चळ : लागों नेदी मळ ममतेचा : ॥ १॥ धृ ॥ या नावें अद्वैत घरें ब्रम्हज्ञान : ॥ आनुभवावांचुन बडबड ते : ॥ छ ॥ ईंद्रीयांचा जय वासनेचा क्षेये : संकल्पा हे न ये : वरी चीत : ॥ २ ॥ तुका म्हणे न ये जाणीव अंतरा : अंतरीया थारा : आंनदाचा : ॥ ३ ॥ छ ॥

३०७

[व. पृ. ७१] आमची जोडी ते देवाचे चरण : करावें चींतन : वीठोबाचें : ॥ १ ॥ धृ ॥ लागें तरी कोण्ही घ्यावे धणीवरी : आमुप ची परी : अवडीच्या : ॥ छ ॥ उभारीला कर प्रसीध जग : करुं केला त्याग : मागें पुढें : ॥२॥ तुका म्हणे हांये दरीद्र वींछीन : येसें देऊं दान : येका वेळे : ॥३॥

अधला ३०८

आंधळ्यापागळाचा : येक वीठोबा दाता : प्रसवला वीस्व तो ची सर्व होये जाणता : घडी मोडी हेळामात्रें : पापपुन्येसंचीता : भवदुष कोण वारी : तुजवांचुनी चींतां : ॥ १ ॥ धृ ॥ धरम जागो तुझा तु त्रा कृपाळु राजा : जाणसी जीवींचें हें न संतां सहजा : ॥ छ ॥ घातली लोळणी गा पुडलीके वाळुवंटी : पंढरी पुन्ये ठाव : नीरे भीमे रे तटी : नेदेषें दुसरे गा :

जाली अद्रुस्ये द्रुस्टी : वोळली प्रेमधारी : केली अब्रुतवृस्टी : ॥ २ ॥ आणीक उपमणी : येक बाळ धाकुटे : नेद्षे न चलेवें : जना चालते वाटें : घातली रोळणी गा : हरीनाम बोभाटें : पावली त्याकारणे : धांवं घातली नेटे : ॥३॥ बैसोनी षोडी सुक : राहे गर्भ आंधळा : सीणला येरझारी : दुष आठवे वेळा : मागील सोसीले ते : ना भी म्हणे गोपाळा : पावली त्याकारणें : लाज राषीली कळा : ॥ ४ ॥ नेद्षे जो या जना : तया दावी आपणा : वेगळा सुषदुष : मोहो सांडवी धना : आपपर ते हीं नाहीं : बंधुवर्ग सजणा : **तुकया** ते ची परी : जाली पावें नारायेना : ॥ ५ ॥ छ ॥

३०९

वासुगीचा बनी सीता सोष करी : कां वो अंतरले रघुनाथ दुरी : येउनीं गुफेमाजी दुस्टे केली चोरी : का वो मज आणीले अवघड लांकापुरी : ॥ १ ॥ धृ ॥ सागे वो त्रीजटे सषी ये यैसी मात : देवील का वो नेदी भेटी रघुनाथा : मन उतावीळ दुरी जाला पंथ : राहों न सकें प्रान माझा कुडी-आंत : ॥ छ ॥ काये दुस्ट आचरण होते केलें : तीर्थव्रतें होतें कवणा भंग-वीलें : गाईवछा पत्नीपुरुशा वीघडीलें : न कळे वो संचीत चरणी अंतरलें : ॥ २ ॥ नाडीलें ये आशा मृगकांतीसोनें : धाडीलें रघुनथा पाठी लागे तेणे : उंलंघीली आज्ञा माव काये जाणे देषोनी सुनाट घेउंनी आलें सुनें : ॥ ३ ॥ नाही मुळ मारग लाग आणीक सोये : उपटी पक्षीया येक देउनीयां पाये : उदकवेढामाजी येथे चाले काये : ॥ ४ ॥ जनकाची नंदनी दुषक्रांत थोरी :॥ [व. पृ. ७२] चुकली कुरंगीणी येळा तैसी परी : समोषी त्रीजटा स्थीर स्थीर करी : घेईल **तुकया**स्वामी राम लंकापुरी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १

३१०

फरावीली दोन्हीं : कन्यां आणी चक्रपाणी : ॥ १ ॥ धृ ॥ जाला आनदें आनद : अवतरलें गोवींद : ॥ छ ॥ तुटली बंधनें : नंदयेशोदे दरु-शणें ॥ २ ॥ गोकुळासी आलें : ब्रह्म अवेगत चांगलें : ॥ ३ ॥ नंद दसवती : धने देषीले श्रीपती : ॥ ४ ॥ नीसी जनकाळ : आले अस्टमी गोपाळ :॥ ५॥ आनंदली मही : भार गेले सकळ हीं : ॥ ६ ॥ **तुका** म्हणे कौंसा : आट भोवींला बळसा ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥

३११

करुनी आरती : आतां वोवाळा श्रीपती : ॥ १ ॥ धृ ॥ आजी पुरलें नवस : धने जाला आजी दीस : पाहा वो सकळा : पुनेंवंतां तुम्ही बाळा : ॥ २ ॥ तुका वाये टाळी : होता सनीध जवळी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३१२

सोडीयेल्या गांठी : दरुसेनें क्रुस्ण भेटी : ॥ १ ॥ धृ ॥ करीती नारी अक्षेवानें : जीवभाव देती दानें : ॥ छ ॥ उपजल्या काळें : रुपे मोहीली सकळें : ॥ २ ॥ तुका तेथें वारी : ऐका आडुन दुसरी ॥ ३ ॥

३१३

मुष डोळां पाहे : तैसी च ते उभी राहे : ॥ १ ॥ धृ ॥ केल्यावीण नव्हे हाती : धरुण आरती परती : ॥ छ ॥ नं मनीती मीनी : कांहीं संकोच दाटणी : तुका म्हणे देवें : वोस केल्या देहेभावें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३१४

गोकुळींच्या सुषा : अंतपार नाहीं लेषा : ॥ १ ॥ धृ ॥ बाळक्रुस्ण नंदा घरी : आनंदलीं नरनारी : ॥ छ ॥ गुढीया तोरणें : करीती कथा गाणी गाणें : ॥ २ ॥ तुका म्हणे छंदें : येणें वेधीली गोवींदें : ॥ ३ ॥ छ ॥

३१५

वीटंबीलें भट : देल्हे पाठीवरी पाट : ॥ १ ॥ धृ ॥ षोटें जाणोनी अंतर : न साहे ची वीस्वंभर : ॥ छ॥ तें च करी दान : जैसे आईके वचन : ॥ २ ॥ तुका म्हणे देवे : पुतना सोषीयेली जीवे : ॥ ३ ॥ छ ॥ ३ ॥

३१६

अवघा च अनायाई : तेथे येकेड्याचें ची काई : ॥ १ ॥ धृ ॥ आतां अवघे येका वेळें : जालोंन सर [ व. पृ. ७३ ] तें नीराळें : ॥ छ ॥ काये माझें षरें : येव्हेडे ची राषों बरें : ॥ २ ॥ तुका म्हणे आतां : परीहार न लगे वीतां : ॥ ३ ॥

३१७

गोड नामें क्षीर : परी ते साकरेचा धीर : ॥ १ ॥ धृ ॥ तैसें ब्रम्हंज्ञान : वापुडें तें भक्तीवीण : ॥ छ ॥ आंधळ्याचा श्रम : सीकवील्याचा च नाम : ॥ २ ॥ तुका म्हणे तारा : नावां तबुऱ्याच्या सारा : ॥ ३ ॥ छ ॥

३१८

अक्षेरांचा श्रम केला : फळा आला त्याणे तो : ॥ १ ॥ धृ ॥ अवघी यांचा तळ धर : परी ते नुरे काही तें : ॥ छ ॥ भरलें तें लवे भारे : पीका आले षेरे तें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे हा गे देव : पुढें भेव सारावा : ॥ ३ ॥ छ ॥

३१९

काये ईद्रावण मोहीले गुळें : काये जीरी काळें : उपचारीलें : ॥ १ ॥ धृ ॥ तैसी अधमाची जाती च अधम : उपदेशे श्रम करावा तो : ॥ छ ॥ न कळे वींचासी कुवाळीले आंग: आपले ते रंग : दावीतसें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे न ये पाकासी दगड : सुकरासी गोड : जैसी वीस्टा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३२०

स्तउनीयां नरां : केला आयुस्याचा मातेरा : ॥ १ ॥ नांरायेणाचीया लोपें : घडली अवघी च पापे : ॥ छ ॥ जीव ज्याचे दान : त्याचा षंडुनीया मान : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वाणी : आईक त्या दोश कानी : ॥ ३ ॥

३२१

संतां नाही मान : देव माणी मुस(ल)मान : ॥ १ ॥ धृ ॥ यैसे पोटाचे मारीलें : देवा आसा वीटंबीलें : ॥ छ ॥ घाली लोटांगण : वंदी नीचाचें चरण : ॥ २ ॥ **तुका** म्हणे धर्म : न कळे माजल्याचा श्रम : ॥ ३ ॥ छ ॥ २

३२२

अहो कृपावंतां : होवी बुधीचा ये दातां : ॥ १ ॥ धृ ॥ जेणे पावीजे उत्धार : होये तुझे पाई थार : ॥ छ ॥ वदवी हे वाचा : भावें पांडुरंग साचा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे देवा : माझे आतर वसवा : ॥ ३ ॥ छ ॥

३२३

नेणें फुंकु कान : नाही येकातींचें ग्नान : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्ही आईका हो संत : माझा सादर वृतांत : ॥ छ ॥ नाही देषीला तो डोळा : देव दाषउं सकळां : ॥ २ ॥ चींतनाच्या सुषें : **तुका** म्हणे नेणे दुषें : ॥ ३ ॥ छ ॥

३२४

[ व. पृ. ७४ ] नाही म्या वंचीला मंत्र कोण्हापासीं : राहीलो जीवासी : धरुनी तो : ॥ १ ॥ धृ ॥ ईटेवरी भाव ठेवीयेले मनं : पाउले समान चीतीतसें: ॥ छ ॥ पाववील पार घरीला वीस्वास : घालुनीयां कास : बळकट : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मागें पाउलें उधार : तीही हा आधा(र) ठेवीलासे : ॥ ३ ॥ छ ॥

३२५

चंचळें चंचळ : नीस्चळें नीस्चळ : वाजवी षळाळ उदकासी : ॥ १ ॥ धृ ॥ सोपे वर्म परी मन नाही हाती हा हा भुत चीतीं : भ्रम गाढा: ॥ छ ॥ रवीबींब नाही तुटत उदका : छ्यायेची ते नका सरी धरूं : ॥२॥ तुका म्हणे भये धरे रजुसाटी : नाही साच पोटीं : कळलें तों : ॥ ३ ॥ छ ॥

३२६

देवाचीये माथां घालुनीयां भार : साडी कळीवर : वोवाळुनी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ नाथीला हा छंद अभीमान आंगी : नीमीत्याचे वेगीं : सारी वोझें : ॥ छ ॥ करुणां वचनी लाहो येकसरें : नेंदावें दुसरें : अड येउं : ॥ २ ॥ तुका म्हणे सांडी लटीक्याचा संग : अनंद तो मग : प्रकटैल : ॥ ३ ॥ छ ॥

३२७

देहे नव्हे मी हें सरें : उरला उरे वीठल : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउणी लाहो करा : काळ सारा चीतनें : ॥ छ ॥ पाळनाची नाही चीतां : ठाव रीता देवाचा :॥ २ ॥ तुका म्हणे जीवासाटी : देवा पोटी: पडैल : ॥३॥ छ ॥

३२८

प्रुथक मी सागो कीती : धर्मनीती सकळा : ॥ १ ॥ धृ ॥ अवघीयांचा येक ठाव : शुध भाव : वीठली : ॥ छ ॥ क्षरअक्षेराचा भाग : करा लाग पंढरीयें :॥ २ ॥ तुका म्हणे आगमीचें : मथीलें साचें: नवनीत: ॥ ३ ॥ छ ॥

३२९

नको आतां पुसों कांही : लवलाहीं उसंती : ॥ १ ॥ धृ ॥ जाये वगी पंढरपुरा : तो सोवीरा दीनांचा : ॥ छ ॥ वचनासी न करी गोंवा : रीघें देवा शरण : ॥ २ ॥ तुका म्हणे क्रुपावंतां : बुहुं चीतां दीनाची : ॥ ३ ॥ छ ॥

३३०

बुधीहीना जडां जीवां : नको देवा उपेक्षु : ॥ १ ॥ धृ ॥ परीसावी हे वीज्ञापणा : आम्ह दासां दीनाची ॥ छ ॥ चींतुनीयां आलो पाये : त्यासी काये वंचने : ॥ २ ॥ तुका म्हणे पुरुशतमा : करी क्षेमा : अपराध : ॥ ३ ॥

३३१

[ व. पृ. ७५ ] आवडी येते कळो : गुणें चीहीने ती उमटती : ॥ ३ ॥ ॥ धृ ॥ पोटींचें वोठी उभे राहे : चीत साहे : मनासी : ॥ छ ॥ डोहळीयाची

भुक गर्भा : ताटी प्रभा प्रतीबींबे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मागोन घ्यांवें : वाटे षावें : वाटांतें : ॥ ३ ॥ छ ॥ १

३३२

काये यैसी वेळ : वोडवली अमंगळ : ॥ १ ॥ धृ ॥ आजी दुषवलें मंन : कथा काळी जा(ला) सीण : ॥ छ ॥ पापाचीया गुणें : त्यांची ये वेळे दरुशणे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे कानी : घालुं आले दुस्ट वानी : ॥ ३ ॥

३३३

भल्यांचें दरुशण : तेथें शुभ ची वचन : ॥ १ ॥ धृ ॥ बोलावे हे धर्म- नीत : क्षोभे होत नाही हीत : ॥ छ ॥ मरयादा तों बरी : वेळ जाणावी चतुरीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे बहु : लागे यैसे बरे मउ : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३३४

आणीकाच्या घातें : ज्यांची नीवतील चीतें : ॥१॥ धृ ॥ ते च वोळ- षावे पापी : नरयेवासी सीध्रकोपी : ॥ छ ॥ कान पसरुनी : आईके वदे दुस्ट वाणी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भाडा : धीर नांही ज्याच्या तोंडा : ॥ ३ ॥

३३५

कीती वेळा जन्मा यावें : नीत व्होवे फजीत : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी जीव भ्याला : शरण गेला : वीठोबासी : ॥ छ ॥ परारब्धा पाठी गाढें : न सरे पुढें चालत : ॥ २ ॥ **तुका** म्हणे रोकडीं हे : होती पीहें : काढीत : ॥३॥

३३६

होतों सापडलो वेठी : जातां भेटी : सवसारा : ॥ १ ॥ धृ ॥ तो या वाटे कृपा केली : भेटी जाली वीठोंबासी : ॥ छ ॥ होता भार माथा माझें : बहु वोझें अमुप : ॥२॥ **तुका** म्हणे केली चींतां : कोणं दाता भेटैल : ॥३॥

३३७

वीठल टाळ वीठल दंडी : वीठल तोंडी उचार : ॥ १ ॥ धृ ॥ वीठल अवघ्या भांडवला : वीठल बोला वीठल : ॥ छ ॥ वीठल नाद वीठल भेद : वीठल छंद : वीठल ॥ २ ॥ वीठल सुषा वीठल दुषा : **तुकया** मषा वीठल ॥३॥

३३८

वीठल वीठल येणे छंदे : ब्रह्मानंदें गर्जावें : ॥ १ ॥ धृ ॥ वाये टाळ टाल्या टाळी : होये होळी वींघ्नाची : ॥ छ ॥ वीठल आद्य अवसानी : वीठल मनी : भराम : ॥२॥ **तुका** म्हणे वीठल वाणीं : वदा : आईका : ॥३॥

३३९

[ व. पृ. ७६ ] वीठल हा चीतीं : गोड लागे गातां गीती : ॥ १ ॥ धृ ॥ आम्हा वीठल जीवण : टाळं चीपळीयां धन : ॥ छ ॥ वीठल वीठल हे वाणी : अमृत हे संजीवणी : ॥२॥ रंगला या रंगें : तुका वीठल सर्वांगें : ॥३॥

३४०

आहे तें सकळ कुस्णाची आर्पण : न कळतां मंन : दुजे भावी ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउणी पाठी लागली ही भुतें : येती गवंसीते : पाच जणें : ॥ छ ॥ ज्याचें त्या वचलें अठव नव्हतां : दंडा या नीमीत्या : कारणें हा : ॥ २ ॥ तुका म्हणे काळें चेपीलां गळा मी मे : वेळोवेळा : करीतां हें : ॥ ३ ॥ छ ॥

३४१

चींतनें सरें तो धनें रुप काळ : सकळ मंगळ : मंगळांचे ॥ १ ॥ धृ ॥ सवंसारसीधु नाही हरीदासां : गर्भवास कैसा : नेणंती तें ॥ छ ॥ जन वना अैसें कृपेच्या सागरे : दाटला अभारे : पाडुरंग : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा भावाचे बंधन : दाषवीलें भीन : परी येक : ॥ ३ ॥

३४२

वीस्णुमये जग वैस्णंवाचा धर्म : भेदाभेद भ्रम : अमंगळ : ॥ १ ॥ धृ ॥ आईका जी तुम्ही भगत भागवत : कराल ते हीत : सते करा : ॥ छ ॥ कोण्हां ही जीवाचा न घडे मछर : वर्म सर्वेस्वर : पुजनाचें ॥ २ ॥ तुका म्हणे येका देहाचे अवयेव : सुषदुषें जीव : भोग पावे : ॥ ३ ॥ छ ॥

३४३

थोडें आहे थोडे आहें : चीत साहे जालीयां ॥ १ ॥ धृ ॥ हरं-शामरश नाही आंगी : पांडुरंगी सरते तें : ॥ छ ॥ अवघ्या साधनाचें सार : न लगे फार : सोधावें : ॥२॥ तुका म्हणे : लटीका पाहे : सांडी देहेआभीमा (न): ॥३॥

३४४

अवघ्यां कोल्हांचें वर्म आंडी : धरीतां तोडी : षीळ पडें : ॥ १ ॥ धृ ॥ भुंकों नका भुको नका : आला तुका वीस्णुदास : ॥ छ ॥ कोण्यें ठाई सादर व्होंवें : नाहीं ठावे गाढवा : ॥ २ ॥ दुर्जनासी पंचानंन : रजरण संतांचा :

३४५

उजळाया आलो वाटा : षराषोटा नीवाड : ॥ १ ॥ धृ ॥ बोलवीलें बोले बोले : धनी वीठल सनीध : छ ॥ तेरें मंनी नाहीं संका : बळें येका : स्वामीच्या : ॥ २ ॥ [ व. पृ. ७७ ] **तुका** म्हणे नये आम्हा : पुढें कामा : गबाळ : ॥ ३ ॥

३४६

जन्मातरीचा परीट व्हावी : जाती ठावी याणें तें ॥ १॥ धृ ॥ वाषोर जैसा चरचरी : तोड करी : सवंदणी : ॥ छ ॥ पुर्वपुन्ये सीकासुत्र : मळमुत्र आतरी : ॥ २ **तुका** म्हणे करी नींदा : धोवट धंदा : पुढीलांचा : ॥ ३ ॥

३४७

बोलांवें तें धर्मा मीळें : बरें डोळे उघडुनी : ॥ १ ॥ धृ ॥ कास्यासाटीं षावें सेण : जेणे जण थुंकीतें : ॥ छ ॥ दुजे यैसें काये बळी : जे ये जाळी : आगीसी : २ ॥ **तुका** म्हणे शुर रनी : गांड मरणी : बुरबुरी : ॥ ३ ॥

३४८

आतां माझ्या मायेबांपां : तु था पापा प्रयस्चीत :॥ १ ॥ धृ ॥ फजीत हे केले षळ : तो वीटाळ नीवारी : ॥ छ ॥ प्रेम आतां पाजीं रस : करी वास अंतरी : ॥ २ ॥ **तुका म्हणे** पांडुरगा : जीवलगा माझीया :॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३४९

नव्हे आरानुक परी मनी वाहे : होवील त्या साहे : पांडुरंग : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ पंढरीस जावे उद्वेग मानसी : धरील्यां पावसी : संदेह नाही : ॥ छ ॥ नसो बळ देह आसो पराधीन : परी हें चीतण : टाकु नको : ॥ २ ॥ **तुका** म्हणे देहे पडो या चीतने : पुढे लागें येंणे : याची साटी : ॥ ३ ॥ छ ॥

३५०

जाती पंढरीस : म्हणती जाईन तयास : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणे आहे संवसार : यैसें बोलतो माहार : ॥ छ ॥ आसो नसो भाव : जो हा देषे पंढरीराव : ॥ २ ॥ चंद्रभागे न्हाती : **तुका** म्हणे भलते याती : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३५१

उठाउठी अभीमान : जाये यैसें स्थळ कोण : ॥ १ ॥ धृ ॥ तें ये पंढरीस घडें : षळा पाझर रोकडें : ॥ छ ॥ अस्रुचीया धारा : कोठे रोमाच शरीरा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे काला : कोठे अभेद देषीला : ॥ ३ ॥ छ ॥

३५२

पंढरीचा महीमा : देतां आणीक उपमा : ॥ १ धृ ॥ येसा ठावो नाही कोठे : देव उभाउभी भेटे : ॥ छ ॥ आहेती सकळ : तीर्थे काळें देती फळ : ॥ २ ॥ तुका म्हणे पेठ : भुभीवरी हे वैकुंठ : ॥ ३ ॥ छ ॥ ४

३५३

[ व. पृ. ७८ ] धाई अंतरीच्या सुषें : काये बडबड वाचाळी मुषें : ॥ १ ॥ धृ ॥ वीधीनीशेध उर फोडी : जंवं नाही अनुभवगोडी : ॥छ ॥ वाढे तळमळ उभयेतां : नाही देषीळें अनुवाता : ॥ २ ॥ आपलल्या मतें पीसें : परी आहे तें जैस्याचें तैसे : ॥ ३ ॥ साधनाची सीधी : मौने करावी स्थीरबुधी : ॥ ४ ॥ तुका म्हणे वादे : वायां गेली ब्रम्हंवृंदें ॥ ५ ॥ छ ॥

३५४

कुशळ गुंपलें नीशधा : वादी प्रवर्तले वादा : ॥ १ ॥ धृ ॥ कैसी ठकली बापुडी : डंबबीशयाचें सांकडी : ॥ छ ॥ भुश उपनुन केलें काये : हारवीले दोन्ही ठायें : ॥ २ ॥ तुका म्हणे लागें हाता : काये मथीलें घुसळीता : ॥ ३ ॥ ॥ छ ॥

३५५

भुंकोनीयां सुने लागें हस्ती पाठी : होउनी हीपुस्टी दुष पावें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ काये त्या मशकें तयाचें करावें : आपल्या स्वभावें : पीडतसे : ॥ छ ॥ मातले बोकड वीटे पंचानना : घेतले मरणां : धरने तेणे : ॥ २ ॥ तुका म्हणे संतां छळीतल षलें : घेती ताड काळें : करुणीयां : ॥ ३ ॥ छ ॥

३५६

माझीया मीपणांवरी पडो पाशाणं : जळो हे भुशणं : नाम माझें : ॥ पापा नाही पार दुषाचे डोगर : जालों ये भुमीस वोझें : ॥ १ ॥ धृ ॥ काये वीटंबना सांगों कीती : पाशाण फुटती : यैसें दुष : नरनारी सकळ : उतम चाडाळ : न पाहाती माझें मुष : ॥ छ ॥ कायावाचामनें : अघटीत करनें : चर्मचक्षु हातपायें : नींदा द्वेश घात : वीस्वासी वीभचार : आंणीक सांगों कीती काये : ॥ २ ॥ लक्षीमी मद मात घडले मांहां दोश : पत्नी दोन भेदाभेद : पीत्रुवचनी घडली अवस्था : आवीचार : कुटळ कुचर वादी नींदा : ॥ ३ ॥ आणीक कीती सांगों तें अवगुण : न वळे जीव्हा कांपें मन : भुतदया उपकार : नाही शब्दा धी : र: वीशवी लपंट हीणा : ॥ ४ ॥ संत मानभाव आईका ही उतरे : अवगुण आईचार : वृधी पापा : तुका म्हणे सरतें करा पाडुरंगी शरन आलों : माये बापा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

३५७

[ व. पृ.७९ ] तीर्थी धोंडा पाणीं :देव रोकडा साजणी : ॥ १ ॥ धृ ॥ मीळालीयां संतसंग : समर्पीतां भलें आंग : तीर्थी भाव फळे : येथें आन्हाडे ते वळें ॥ ३ ॥ तुका म्हणे पाप : गेले गेल्यां कळे ताप : ॥ ३ ॥ छ ॥

३५८

जा रे तुम्ही पंढरपुरा : तो सोवीरा दीनाचा : ॥ १ ॥ धृ ॥ गुणदोश नाणी मना : करी आपणा सारीषें : ॥ छ ॥ उभारुणी उभा कर : भवपार : उतराया : ॥ २ ॥ तुका म्हणे तांतडी मोटी : जाली भेटी उदंड ॥ ३ ॥ छ॥

३५९

गर्जत जावें नामावळी : प्रेमें टाळी : वावोनी : ॥ १ ॥ धृ ॥ येणें सुषें पुडती धांवें : भेटी सवें : गोपाळा : ॥ छ ॥ लोटागण घाला तळीं : वंदा धुळी : संताची : ॥ २ ॥ तुका म्हणे वीठल लाहो : अैसा बाहो : उभारा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३६०

नाहीं कोठे अधीकार : गेलें नर वायां तें : ॥ १ ॥ धृ ॥ आईका हें सोपे वर्म : न लगे श्रम चींतना : ॥ छ ॥ मृत्याचीये आंग छाये : उपाये ची षुंटतां : ॥ छ ॥ तुका म्हणे अवघे जन : येयें मन : आसों द्या : ॥३॥ छ॥

३६१

घेउनीयां चक्र गदा : हा ची धांदा हाची धांदा करी तो ॥ १ ॥ धृ ॥ भक्तां राषे पांयांपासी : दुर्जनासी सव्हारी : ॥ छ ॥ अवेत्क तें आकारलें : रुपा आलें गुणंवंतं ॥ २ ॥ तुका म्हणे पुरवी ईछा : जयां तैसा वीठल :॥३॥

३६२

अनुसरे तो आमंर जाला : अंतरला सौंसारा : ॥ १ ॥ धृ ॥ नेदषती गर्भवास : कधीं दास वीस्णुचें : ॥ छ ॥ वीसंभें ना माता बाळा : तैसा ळळा पाळवा : ॥ ३ ॥ त्रीभुवनी ज्याची सता : तो रक्षीत जालीयां : ॥ ३ ॥

३६३

ज्याणे ज्याणे जैसें ध्यावें : तैसें होवें कृपाळें : ॥ १ धृ ॥ सगुण निर्गुणाचा ठाव : ईटे पाव धरीलें तें : ॥ छ ॥ अवघें साषरेचें आंग : न ये व्यग नीवडीतां : ॥ २ ॥ तुका म्हणे जे जे करीं : तें तें हरी भोगीतां :॥३॥

३६४

नीवडुनी दील्हें नवनीत : संचीत ते भोगीतें : ॥ १ ॥ धृ ॥ आतां पुढें भावसार : जीवना थार : राहावया :॥ छ ॥ पारीषीयांचें पडीला हातीं : चाचपती आंधळीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सेवा न घडें : त्यासी जोडें : लाभ हा : ॥ ३ ॥ छ ॥

३६५

[ व. पृ. ८० ] आतां केशी राजा हे ची वीनवणी : मस्तक चरणी : ठेवीतसें : ॥ १ ॥ धृ ॥ देहे आसो माझा भलतीये ठांवी : चीत तुझा पांई : असो द्यांवे : ॥ छ ॥ काळाचें षंडण घडावें चीतनें : धनमानजने : वीन्मुषतां : ॥ २ ॥ कफवातपीतें देह अवसाणी : ठेवावीं वारुणी : दुरीतें हीं : ॥ ३ ॥ सावध तों माझी ईंद्रीयें सकळे : दील्ही येका वेळें : हाक आधीं: ॥४॥ **तुका** म्हणें तुं यां सकळाचा जीनीता : येथे अहीकता : सकाळ हीं:॥५॥

३६६

देषोनी पुराणीकाची दाढीं : रडे फुंदे नाक वोढीं : ॥ १ ॥ धृ ॥ प्रेम घरें : दीसे जना : भींन अंतरीं भावना : ॥ छ ॥ आवरीतां नावरे : षुर आठवी नेवरें : ॥ २ ॥ बोल न ये मुषा वाठा : म्हणे होतां ब्यांचा तोटा : ॥ ३ ॥ दोन्ही सींगें च्यान्ही पाये : षुणां दावी म्हणे हाये : ॥ ४ ॥ मना आणीतां बोकड : मेला त्याची चरफड : ॥ ५ ॥ होता भाव पोटीं : मुषा आला तो सेवटीं : ॥ ६ ॥ **तुका** म्हणे कुडें : कळों येतें तें रोकडें : ॥ ७ ॥

३६७

दुर्जनांची गधी वीस्टचीये परी : देषोनीयां दुरी : होवे तया : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ आईका हो तुम्ही मात हे सजन : करुं सघटन : नये बोलों : ॥ छ ॥ दुर्जनांचे आंगी अषंड वीटाळ : वाणी रजस्वळ : श्रवतैसी : ॥ २ ॥ दुर्जनाचें भये धरावें त्यापरी : पीसाळलें वरी : धांवे स्वान : ॥ ३ ॥ दुर्जनांचा भला नव्हे आंगसंग : बोलीलासे त्याग : देशाचा त्या : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे कीती सागावें पृथक : आंग कुभपाक : दुर्जनाचें : ॥ ५ ॥

३६८

करावी ते पुजा मंनची उतम : लोकीकाचें काम : काये आसे : ॥१ ॥ ॥ धृ ॥ कळावे तयास कळे अंतरीचें : कारण तें साचें साचें आंगी : ॥ छ ॥ अतीशयें अती लाभ कीवा घात : फळ देतें चीत : बीजा यैसें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जेणे राहे समाधान : यैसें तें भजन : पार पावी ॥ ३ ॥ छ॥ छ ॥

३६९

द्रव्याचा तों आम्हीं धरीतों वीटाळ : तया पाठीं काळ लाग करी : ॥ १ ॥ धृ ॥ करुनीयां हेच राहीलो जतन : [ व. पृ. ८१ ] येक नारायेन : यैसें नाम : ॥ २ ॥ तुका म्हणे आसे करुणी जीवन : आलीया ही दांन : याचकासी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३७०

वंदीलें वंदावे जीवाचीये साटी : कींवां बरी तुटी : आरंभी च : ॥१॥ धृ ॥ देवाची चाड ते आवीका हे बोल : आवघे ची मोल : धीरा आंगी : सीपांवें ते रोप वरावरी बरें : वाळलीयां पुरें कोम न य ॥ ९ ॥ तुका म्हणे टांकीघाये देवपण : फुटलीयां जन : कुला पुसी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ २ ॥

३७१

आतीवादी नव्हे सुधी या बीजाचा : वोळषावा जातीचा : अंतेंज तो : ॥ १ ॥ वेद श्रुती नाही ग्रंथ ज्या प्रमान : सीस्टाचे वचन न मणीती : ॥२॥ तुका म्हणे मदेपानाचें मीस्टान : तैसा तो दुर्जन : सीवों नये : ॥३॥

३७२

चीत तें चींतन कल्पनची धांव : जे जे वाढे हांवं : ईद्रीयांची : ॥१॥ धृ ॥ हातपाव दीसे शरीर चालतां : नांवें भेद सता : जीवाची ते : ॥ छ ॥ रवीचीये आंगीं प्रकाशक कळा : वचनें नीराळा : भेद दील्हा : ॥ २ ॥ तुका म्हणे माप वचनांचे आंगी : मौन्यें काये रंगी : नीवडावें : ॥ ३ ॥

३७३

पंढरीचे वारकरी : आधिकारी मोक्षासी : ॥ १ ॥ धृ ॥ पुंडलीकां दील्हा वर : करुनांकर वीठलें : ॥ छ ॥ मुढ पापी जैसे तैसे : लावी कासे सकळा : ॥ २ ॥ तुका म्हणे षरे जालें : येका बोलें : संतांच्या : ॥ ३ ॥ छ ॥

३७४

आभीमानी पांडुरंग : गोवा मग कास्याचा : ॥ १ ॥ धृ ॥ आनुसरा रे लवलाहीं : नका कांहीं वीचारुं ॥ छ ॥ कोठे वास करीती पापें : आनुतापें : जालीयां : ॥ २ तुका म्हणे न लेगे घडी : उभा थडी पावील : ॥ ३ ॥ छ ॥

३७५

उचीत न कळे ईद्रीयांचें वोढी : मुषें बडबडी सीकलें तें : ॥ १ ॥ धृ ॥ आपण जाउनी न्यांवी नरकासी : षळे बेताळीस : कुळें जग : ॥ छ ॥ नेणे आबोलनें बोल झाकुनीयां : बडबडी वांयां डंबासाटी : ॥ २ ॥ [ व. पृ.८२ ]तुका म्हणे आम्ही तेथीचे पारषी : नाचो देषो वेषी : जाणो षरे : ॥३॥

३७६

शब्दा नाही धीर : ज्याची बुधी नाही स्थीर : ॥ १ ॥ धृ ॥ त्याचे न ह्वांवे दरुशण : षळा पंगती भोजण : ॥ छ ॥ संतास जो नींदी : आधमा लोभासाटी वंदी ॥२॥तुका म्हणे पोटीं : भाव आणीक जया होटी : ॥३॥छ॥

३७७

चोरे चोरा तो करावा उपदेश : आपला अभ्यास असैल तो : ॥ १ ॥ सीद्ळीच्या मागे वेचीतां पाउले : होवील आपुलें : तीच्या यैसें : ॥ २ ॥ तुका म्हणे भीतों पुढीलीया दता : म्हणउंनी चीतां : उपजली : ॥ ३ ॥

३७८

माडवाच्या दारा : पुढे आणावा म्हातारा : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणे नवरी आणा राड : जाळा नवऱ्याचे तोंड : ॥ छ ॥ समयो न कळें : काये उपेगी ये वेळें : ॥ २ ॥ तुका म्हणे षरा : येथुनीयां दुरी करा : ॥ ३ ॥ छ ॥

३७९

येकांची उतरें : गोड अमृत मधुरें : ॥ १ ॥ धृ ॥ यैस्या देवाच्या वीभुती : भीन परारब्ध गती : ॥ छ ॥ येकांचीं वचनें : कडु अत्यत तीक्षणें : ॥ २ ॥ प्रकाराचें तीन : तुका म्हणे केलें जन : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३८०

वचन हीं नाड : नो बोलें ते मुंकें षोड : ॥ १ ॥ धृ ॥ दोही वेगळे तें हीत : बोलीं आबोलणें नीत : ॥ छ ॥ आंधार प्रकासी : जाये दीवस पाते नीसी : ॥ २ ॥ बीज प्रुथीवीचा पोटीं : तुका म्हणे दावी वृस्टी : ॥ ३ ॥

३८१

बोलोंनीयां काये दाउ : तुम्ही जीउ जगाचें : ॥ १ ॥ धृ ॥ हे ची आतां माझी सेवा : चींतन देवा करीतों : ॥ छ ॥ वीरत्कांसी देहे तुसे : नाहीं आस देहाची : ॥ २ ॥ तुका म्हणे पांयांपासी : येईन यैसी : वासना : ॥ ३ ॥ छ ॥

३८२

होये वारकरी : पांहे पांहे पंढरी : ॥ १ ॥ धृ ॥ काये करावी साधनें : फळ अवघें ची तेणे : ॥ छ ॥ आभीमानु नुरे : कोड अवघे ची पुरे : ॥ २ ॥ तुका म्हणे डोळां : वीठों बैसला : सांवळा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३८३

पंढरीस जाये : तो वीसरे बापुमाये : ॥ १ ॥ धृ ॥ अवघा होये पांडुरंग : राहे धरुणीयां आंग : ॥ छ ॥ न लगे धनमान : देहेभावें उदासीनं ॥ २ ॥ तुका म्ह [ व. पृ. ८३ ] णे मळ : ॥ नासी तात्काळ तें स्थळ : ॥ ३ ॥ छ ॥

३८४

नीजों नल्हें सकाळी वेळी : राती काळीं चीनचीनी : ॥ १ ॥धृ॥ वोंगळाने घेतली पाठी : केली साटी : जीवासी : ॥ छ ॥ मेळउनीया रबनें : चींतां नेणें देवळी च : ॥ २ ॥ तुका म्हणे आलों घरा : तो डागोरा : बाईलचा : ॥ ३ ॥

३८५

दुषाचे डोगर लागती सोसावे : यैसे तंव ठावे सकळासी : ॥ १ ॥ धृ ॥ कांही न करीती वीचार हीताचा : न करीती वाचा नामघोश : ॥ छ ॥ भोगें कळो येते मागील हे जन्म : उतम अधम कनीस्ट तें : ॥ २ ॥ तुका म्हणे येथे झाकीतील डोळे : भोग देती येळें : येईल कळो : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३८६

मायेबाप सर्वे न ये धनवीत : करावे संचीत भोगावें ते : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणंउनी लाभ काये तो वीचारी : नको चालीवरी चीत ठेउं : ॥ छ ॥ आयुस्य सेवटी साडुनी जाण्हार : नव्हे हे साचार शरीर हे : ॥ २ ॥ तुका म्हणे काळें लावीयेलें माप : जमें धरी पाप : पुन्याची ही : ॥ ३ ॥ २ ॥

३८७

वीचारावांचुन : न पवीजे समाधान : ॥ १ ॥ धृ ॥ देहे त्रीगुणाचा बाधा : माजी नाही गुण सुधा : ॥ छ ॥ देवाचीये चाडे : देवा द्यावे जे जें घडे : ॥ २ ॥ तुका म्हणे होते : बहु गोमटे उचीतें : ॥ ३ ॥ छ ॥ १

३८८

हातीं हो न बेना : ।। करीती लेकीच्या धारणा :

( ८३ व्या पानांतील ह्या चरणापुढील जागा कोरी च सोडिली आहे व पान ८४ वर हि ह्यापुढील चरण न लिहितां दुसरा अभंग लिहिला आहे. )

३८९

[ व. पृ. ८४ ] याचा कोन्ही कईपक्षी : तो ही त्यासी समतुल्ये : ॥ १ ॥ धृ ॥ फुकासाटी पावे दुषाचा वीभाग : पुर्वजांसी लाग नर्ये दंडी : ॥ छ ॥ आईके राजा न करी दंड : जरी या लंड दुस्टासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे त्याचें आन : मद्यपान भक्षीतां : ॥ ३ ॥ छ ॥

३९० मोटळे

मोटळे हाटीं सोडील्या गांठी वीकऱ्या घातले कण : ज्याचे भाग त्यांसी देउनी वारीले सारुनी लीगाड दाण : षरें माप हाती घेउनी बैसोलों मानीती तें चौघें जण : षरें वीत तेथें आलें चोजवीतं गीऱ्हाईक संत जन : ॥ १ ॥ धृ ॥ झाडीला पालव केला हाट वेच जाली सकाळी च आरुनुक : याल तरी तुम्ही करा लगबग आमच ते कोण्ही लोक : येक ते उतम मध्यम कणीस्ट वीताचे प्रकार तीन : बहुतां जणाचे बहुत प्रकार वेगवेगळाले वान : लाभ हानी कोण्हा मुदल जाले कोण्हसी पडीले षान : अर्दमर्ध कोन्ही गुंतोनी राहीले थोडे तैसे बहुजण : ॥ २ ॥ येके सांते आलो येके गावीहुन ये कामे नव्हे ची जाणें : येतां जातां रुजु नाही दीवाणा काळतोडी येके तेणे : लाग भाग येकी येकाणी गोवीलें मागील पुढीला रीण : **तुका** म्हणे आतां पाहो णये वास : साधावें आपले पेणें : ॥ ३ ॥ छ ॥

३९१

॥ धृ ॥ करा करा लगपाट : धरा पंढरीची वाट : जंवं नाही चपेट घात पडीला काळचा : ॥ छ ॥ दुजा यैसा नाही कोन्ही : जो या कांढी भयातुनी : करा म्हणउणी : हा वीचार ठावीचा : ॥ १ ॥ होती गात्रें बेबळी : दीवस आस्तमाना काळी : हातपाये टाळी : जो मोकळी आहे ती : ॥ २ ॥ का रे घेतलासी सोसे : तुज वाटताहे कैसे : **तुका** म्हणे यैसें : पुढे के लाहासी : ॥ ३ ॥

३९२

जेथे जावे तेथे कपाळ सरीसे : लाभ तो वीशेसें : संतसंग : ॥ १ ॥ धृ ॥ पुर्व पुन्य जरी होती सानकुळ : अंतराये मुळ नुपजे येथे : ॥ छ ॥ लाभ तरी नव्हे धन पुत्र दारा : नीकट वास बरा : संतापाई : ॥ २ ॥ **तुका** म्हणे हे ची कराई मीरासी : बळी संतांपासी देवा जीव : ॥ ३ ॥

३९३

आतां काही सोस न करी आनीक : धरीन ते येक हे ची दृढ :॥ १॥ धृ ॥ जेणे भवसीधु उतरींजे पार : तुटे हा दुस्तर गर्भवास : ॥ छ ॥ [ व. पृ. ८५ ] जोडीन ते आतां देवाचे चरण : आवीनास धन परमार्थ : ॥ २ ॥ **तुका** म्हणे बरा जोडीला हा देहे : मनुस्यपणे येहेलोका अलोः ॥ ३ ॥

३९४

जतन हें करीन जीवे : सुध भावे करुनी : ॥ १ ॥ धृ ॥ वीठल वीठल यैसे धन : जीवन अतकाळींचे : छ ॥ वरदळ हे संचीत सारु : बरवा करु उदीम हा : ॥ २ ॥ **तुक** म्हणे ऱ्हुदयेपेटी : ये संपुस्टी : सादवण : ॥ ३ ॥

३९५

भाग्ये यैसी जाली जोडी : आतां घडी वीसंभेणा : ॥ १ ॥ धृ ॥ ईटेवरी समचरण : संती षुण : सागीतली : ॥ छ॥ आवघें आतां काम सारु : हा ची करुं कैवाड : ॥२॥ **तुका** म्हणे षड्डु षेपा : पुढें पापापुन्याच्या :॥ ३॥

३९६

येत्न आतां तुम्ही करा : मज दातारा सतेने : ॥ धृ ॥ वीस्वास तो पायावरी : ठेउनी हरी राहीलो : ॥ छ ॥ जाणत ची दुजे नाही : आणीक काही प्रकार : ॥ २ ॥ **तुका** म्हणे शरण आलों : नेणे बोलो वीनवीतां :॥३॥

३९७

अनाथां जीवण आम्हा तुमचे चरण : करुनी सांटवणं : धरीयेले ऱ्हुदंई : ॥ १ ॥ धृ ॥ पुस्ट जाली आंगकांती : अनद न समाये चीती : कवतुके प्रीती : गाउं नाचों उल्हासें : ॥ छ ॥ करुना उतरी : करुं आळवण हरी : जांउं नेंदु दुरी : प्रेमप्रीती पडी भेरें : ॥ २ ॥ मोहो माते करी गोवा : यैसें आहे जी केशवा : **तुका** म्हणे सेवा : आणीक नाही जाणत : ॥ ३ ॥

३९८

सुषाची वसती जाली माझा जीवी : तुमच्या गोसांवी कृपादानें : ॥१॥ ॥ धृ ॥ रुप वेळोवेळा आठवी अतरी : बैसोनी जीव्हारी राहीले तें : ॥ छ ॥ वीसांवलें मन वीठल प्रपंचा : गोडावली वाचा येणे रसें :॥ २ ॥ **तुका** म्हणे कांही नाठवेसे केलें : दुसरे वीठले मज आतां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

३९९

झेडुग्याचे आळां अवघी चीपाडे : तेथे काये गोडे नीवडांवी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ सवंसारसश्रमे परमार्थ जोडे : [ व. पृ. ८६ ] यैसें काये घडे जाणत हो : ॥ छ ॥ ढेकनाचें बाजें सुषाची कल्पना : मुर्षत्व वचना येईल त्या : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मद्दे साडवी लगोटी : सीकवीला सेवटी वीचारु त्या :॥३॥

४००

घाळुनीयां भार बैसोलों नीस्चींती : नीरवीलें संती वीठोबासी ॥ १ ॥ ॥ धृ ॥ दाउनीयां हातें कुवाळीला माथा : सांगीतलें: चींतां न करावी ॥२ ॥ कटी कर सम चरन साजीरे : राहीला भीमरे : तीरी उभा : ॥ ३ ॥ षुंटला सायास आणीक या जीवा : धरीले केशवा पाये तुझे : ॥ ४ ॥ तुज टाके अतां ते करी आनंतां : **तुका** म्हणे संता लाज माझी : ॥ ५ ॥

४०१

माझीया मनाचा जान हा नीर्धार : जीवासी उदार जालो आतां : ॥ १ ॥ तुजवीन दुजे न धरी अणीका : भये लज्या संका : टाकीयली ॥ २ ॥ ठांवीचा समध तुज मज होता : वीशेश अनंतां केले संती : ॥ ३ ॥ जीव-भाव तुझा ठेवीयेला पांवी : हे ची आतां नाही लाज तुम्हां : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे संती घातला हावाला : न सोडी वीठला पाये आतां : ॥ ५ ॥ छ ॥

४०२

देव घ्या कोण्ही देव घ्या कोण्ही : अैता आला घर पुसोनी : ॥ १ ॥ देव न लगे देव न लगे । सांटवनेचे रुधले जागे : ॥ २ ॥ देव मदला देव मदला : भाव बुडाला काये करुं : ॥ ॥ ३ देव घ्या फुका देव घ्या फुका : न लगे रुका मोल काहीं ॥ ४ ॥ दुबळा **तुका** भावेवीण : उधारा देव घ्यातला रीण : ॥ ५ ॥ छ ॥

४०३

आम्हां कांही आम्हां कांही : आतां नाही या बोलें : ॥ १ ॥ मोल सांगा मोल सांगा : घेने तीं गा पुसावे : ॥ २ ॥ कैसें घडे कैसें घडे : बडबडे तुज मज : ॥ ३ ॥ मुद्लेंसाटी मुद्लेसाटी : लाभ पोटी त्या च मधी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे साटउ घरी : आंडल्या काळे पुसती तऱ्ही : ॥ ५ ॥ छ ॥

४०४

घ्या रे भाई घ्या रे भाई : कोण्ही काही थोडें बहु ॥ १ ॥ ये च हाटी य च हाटीं : बाधा गांठी पारखुन : ॥ २ ॥ वेच आहे वेच अहे : सरले पाहे मग षोटे : ॥ ३ ॥ उघडे दुकान उघडे दुकान : राती जाली कोण (सो)डी मग : ॥ ४ ॥ [ व. पृ. ८७ ] **तुका** म्हणे अंतकाळीं : जाती टाळी बैसोनी : ॥ ५ ॥

४०५

पेनावले ढोर मार षाये पाठी : बैसले तें नुठी तेथुनीयां : ॥ १ ॥ ध्रु ॥ तैसी माझ्या मना परी जाली देवा : धावे अहंभावा सांडवलों : ॥ छ ॥ कडां घाली उडी मागीलाच्या भेणें : मरण मरणे न कळ ची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जालों त्यापरी दुस्चीत : असे बोलावीत पांडुरंग : ॥ ३ ॥

४०६

तोंडें षाये फार पादे बोच्या करी मार : ॥ १ ॥ ध्रु ॥ यैसे येक ते स्याहाणे आपल्या अधीन ते नेणे : छ ॥ कुले घालुनी उघडे : रागें पाहे लोकाकडें ॥ २ ॥ षेळे जुत कर्म : मग बोंबली जुलुम : ॥ ३ ॥ नीजता आलां मोहो : वीतां म्हणे मेला गोहो : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे त्याणी : मनुस्यपणा केली हाणी : ॥ ५ ॥ छ ॥

४०७

मार्ग चुकले वींदेसी येकले : तयावरी जाले दीसाभुली : हाती धरुनीयां पाववीले घरा : त्याच्या उपकारा काये द्यावें : ॥ १ ॥ ध्रु ॥ तैसा मी कुडकुडा : होतो केशी राजा : सेवा न घडे लाजा म्हणउनी : ॥ छ ॥ साडीयेला गर्भ उबगोनी माउली : नाही साभाळीली : भुमी शुध : उस्ण तान भुक येह्वेडीये आकांती : वोसंगा लावीती : काये म्हणीजे : ॥ २ ॥ षाद्यावरी सुळ मरनाचे वाटे : आन्याये ही मोटे : साच केले : हातीचे हीरोनी घातला पाठीसीं : **तुका** म्हणे यैसी परी जालीं : ॥ ३ ॥ छ ॥

४०८

जालीयां दर्शन करीन सेवा : आणीक कांही देवा : न लगे दुजे : ॥ परारब्धा आंगी अनं आछ्यादन : स्थीर करुनी मन : ठेवीन पांवी : ॥ १ ॥ धृ ॥ ये गा ये गा कृपाळुवा हरी : नीवीवीं आभ्यांतरी : देउनी भेटी : ॥ छ ॥ आसावलें मनं जीवनाचे वोढी : नामे रुपी गोडी लावीयेली : ॥ काये तुम्हां-पासीं नाही भांडवल : माझे मीथ्या बोल : जाती येसें : ॥ २ ॥ [1]**तुका** म्हणे माझे अवघे आसो द्यावें : आपले करावे ब्रीद साच : काये लोषडाचें पांहो गुंन दोश : सीवोणी परीस सोने करी : ॥ ३ ॥ छ ॥ छ

४०९

[ व. पृ. ८८ ] जैसीं तैसी तऱ्ही वाणीं : मना आणी माउली : ॥१॥ ॥ धृ ॥ लेंकरुं वाचा स्नहे गोड : करी कोड : त्या गुणे : ॥ छ ॥ मागे पुढें रीघे लोटीं : साहे षेटी करीते : ॥ २ ॥ **तुका** वनिवी पांडुरंगा : **यैसे पै** गा आहे हे : ॥ ३ ॥

४१०

गुणाचे आवडी वाचेचा पसरु : पडीला वीसरु : ईतरां रसा : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ आदी मध्यें अंती नाही आवसान : जीवनी जीवन : मीळोनी गेलें : ॥ छ ॥ रामकृस्णनामें माळा हे साजीरी : वोवीली गोजीरी : कठांजोगी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे तनु जालीसे सीतळ : आवघी सकळ : ब्रम्हांनंदे : ॥ ३ ॥

४११

येथे आड कांहीं न साहे अणीक : प्रमान तें येक हे चीजालें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ गांउं नाचों टाळी गांउं गीत छदें : डोलउं वीनोदें : आंग तेणें : ॥ छ ॥ मथुनीयां सार काढीलें बाहेरी : उपाधी ते येरी नीवडीली : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जगा लावीली सीराणी : सेवीतां हे धणी : होती नाही : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४१२

सवंसाराचे आंगी अवघी च वेसनें : आम्ही या कीर्तने शुध जालो : ॥ १ ॥ धृ ॥ आतां हें सोवळें जालें त्रीभुवन : वीशम धोउन सांडीयेलें : ॥ छ ॥ ब्रंह्मपुरी वास करणे अषंड : नदषीजे तोंड वीटाळाचें : ॥ २ ॥ **तुका** म्हणें आम्हां येकांताचा वास : ब्रम्ही ब्रम्हरस सेउं सदा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ ह्या अभंगांतील ' **तुका** म्हणे ' हा अंत्य चरण उपांत्य झाला आहे.

## ४१३

देवाची भांडारी : आदा वीनयोग करी : ॥ १ ॥ धृ ॥ आतां न माषें हातपाये : नेणो होते अैसे काये : ॥ छ ॥ देवे नेली चींतां : जाला सकळ करीता : ॥ २ ॥ **तुका** म्हणे धनी : त्यासी अवघी पुरवणी : ॥ ३ ॥ छ ॥

## ४१४

शरनागत जालों : त्याणे मीपना मुकलों : ॥ १ ॥ धृ ॥ आतां दील्ह्याची च वाट : पांहो नाही षटपट : ॥छ॥ न लगे उचीत : कांही पाहावे सचीत : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सेवा : माने तैसी करुं देवा : ॥ ३ ॥ छ ॥

## ४१५

वाचेचीये आळा कवळीले ब्रम्ह : चुकवीला श्रम : प्रुथक तो : ॥ १ ॥ धृ ॥ सुलभ जाले सुलभ जाले : जवळी आले पंढरीये : ॥ छ ॥ [व. पृ.८९] नामारुपाचें बांधले मोटळे : येक येका वेळे सारीयेलें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वाटे चुकली वसती : उधार तो हाती आणीयेला : ३ ॥ छ ॥ छ ॥ ३

## ४१६

सवग जालें सवग जालें : घरा आलें बदरीचें : ॥ १ ॥ धृ ॥ आतां हेवा करावा सोस : भक्तीरस बहु गोड : ॥ छ ॥ पाउल वेचे चींतां नाही : आड काही मग न ये : ॥२॥ **तुका** म्हणे संचीताचे : नेणे काचें राहों तें:॥३॥

## ४१७

आंब्रुताची फळें अंब्रुताची वली : ते ची पुढे चाली बीजाची ही : ॥ १ ॥ धृ ॥ अैसीयांचा संग देई नारायेणा : वोल्हावा वचना जयाचीया : ॥ छ ॥ उतम सेवने सीतळ कंठासी : पुस्टी कांती तैसी दीसे वरी : ॥ २ ॥ **तुका म्हणे** तैसे होईजे सगें : वास लागे अगें : चंदनांच्या : ॥ ३ ॥ छ ॥

## ४१८

करावी ते पुजा मने ची उतम : लोंकीकाचें काम काये आसे[1] : ॥ १ ॥ कळावे तयासी कळें अतरीचे :

---

१ हा च अभंग मागें ६६ व्या पानावर–३६८ वा–आला आहे आहे. सबब पुढील तीन चरण येथें दिले नाहींत.

४१९

माया तें ची ब्रंम्ह ब्रंम्ह ते ची माया : आंग आणी छाया तैसी परी : ॥ १ ॥ धृ ॥ तोडीतां न तुटे सारीतां नीराळी लोटागणा तळी हारपते : ॥ छ ॥ दुजे नाही तेथे बळ कोण्हीसाटी : आणीक ते आटी वीचाराची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे उंच वाढे उचपणें : ठेगणी लवणें : जैसी तैसी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४२०

तुम्ही संत मायेबाप कृपावंत : काये मी पतीत : कीर्त वानु : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ अवतार तुम्हां धराया कारणे : उधरा वो जन : जड जीव : ॥ छ ॥ वाढवीले सुष भग्तीभाव धर्म : कुळाचार नाम : वीठोबाचें :॥ २ ॥ **तुका** म्हणे गुण चंदनाचे आंगी : तैसे तुम्ही जगी : संत जन ॥ ३ ॥

४२१

पाठी लागें तया द्वडी दुरी : घाली या बाहेरी सवसारा : ॥ १ ॥ धृ ॥ येउनी दडें तुमंचा पाई : धावें तई च्यो म्हणा : ॥ छ ॥ पारषीयाचा वास पडे : षडबंड उठीतें : ॥२॥ **तुका** म्हणे लावीला धाक : नेदी ताक षांउं कोन्ही :॥३॥

४२२

सांषळीलों प्रीती गळां : भुके वेळा : जानोणीयां : ॥ १ ॥ धृ ॥ तुमचे मी केशीराजा : सुनें या काजा पाळीलों : ॥ छ ॥ आले गेलें कळें वाटा : कोण नी(ट) वांकडीया : ॥ २ ॥ [ व. पृ. ९० ] **तुका** म्हणे आलें वांरी : दुरी तें दुरी नातळतां : ॥ ३ ॥ छ ॥

४२३

सुनीयांचा हा ची भाव : त्यासी बोलें वोळषी : ॥ १ ॥ जवळुनी न वजें दुरी : लाडे करी कवतुक : ॥ छ ॥ षुण उभा ईटेवरी : कट करीं धरीयेले : ॥ २ ॥ **तुका** म्हणे घातली वरी : झुली थोरी मोलाची : ॥ ३ ॥ छ ॥

४२४

सुनीयांची आवडी देवा : घेत सेवा नाही काहीं : ॥ १ ॥ धृ ॥ सीकवीलें जवळी बैसों जेथें असों तेथें ची : ॥ छ ॥ नेदी दुजें बोलों करु : गुरुगरु न साहे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे कुवाळीतां आंगें सता संगाची : ॥ ३ ॥ छ ॥

४२५

सीळें षातां आला वीट : सुने धीट पांवी धरी : ॥ १ ॥ धृ ॥ कान्होबा ते जाणे षुण : उन्ह उन्ह घांस घौंली ॥ छ ॥ आपलीये ठाईंचें द्यावे : लाड भावें पाळावा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मी जुनाट जुने : मोहो तेणे परतला : ॥ ३ ॥ छ ॥ ६

४२६

लागले भरतें : ब्रम्हनंदाचें वरतें : ॥ १ ॥ धृ ॥ जाला हरीनामाचा तारा : सीड लागलें फरारा : ॥ बैसोनी सकळ : बाळ चालीले गोपाळ : ॥२॥ **तुका** म्हणे नीट : बरवी सांपडली : वाट : ॥ ३ ॥ छ ॥

४२७

लाउनी काहाळा : बरवा करीत सोहळा : ॥ १ ॥ धृ ॥ सादावीत जावें जना : भये नाही सते जाणा : ॥ छ ॥ गात नाचत वीनोदें : टाळ घागरीया छंदें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भेव : नाही पुढें येतो देव : ॥ ३ ॥ छ ॥

४२८

धन्य वीत कुळें : आवघीयाने ते आगळे : ॥ १ ॥ धृ ॥ ज्याच ना (रा) येण गांठी : भरला ऱ्हुदयेसपुस्टी : ॥ छ ॥ अवघे ची गोड : त्याचें पुरले सर्व कोड : ॥ २ ॥ **तुका** म्हणे अस्त : उदये त्याच्या तेजा नास्त : ॥३॥

४२९

आजी दीवस जाला : धन्ये सोनीयांचा भला : ॥ १ ॥ धृ ॥ जाले सतांचेय पगती : बरवें भोजन नीगुती : ॥ छ ॥ रामक्रुस्णनामें : बरवी मोहीयेली प्रीमें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आला : चवी रसाळ हा काला : ॥ ३ ॥

४३०

ते ही नव्हे जे जांनीव जना : वाटे मना ते ही नव्हे ॥ १ ॥ ते ही नव्हे जे भोवते भोवते : नागीचे धावे ते ही नव्हे : ॥ २ ॥ त्रास नाही जे काटाळा : अशुभ वचाळा : ते ही नव्हे : ॥ ३ ॥ [ व. पृ. ९१ ] ते ही नव्हे जे करीतां कांही : ध्यातां ध्याइ त हा त ही नव्ह ॥ ४ ॥ **तुका** म्हणे येक ची आहे : सहज पाहे सहजेंसी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १७

४३१

काये कासी करीती गगा : भीतरी चांगा : नाही तों : ॥ १ ॥ धृ ॥ आधनी कुचर बाहेरी तैसा : न ये रसा पाकासी : ॥ छ ॥ काये टीळे करींती माळा : भाव षळा नांही त्या : ॥ २ ॥ **तुका** म्हणे प्रेमावीण : बोले भुंके अवघा सीण : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४३२

बोलवें तें आतां आम्हीं आबोलने : ॥ येका च वचणे सकळासी : ॥१॥ मेघवृस्टीं कांही न वींचारी ठाव : जैसा ज्याचा भाव : त्यासी फळोः ॥ २ ॥ **तुका** म्हणे नाही समाधानें चाड : आपना ही नाड पुढीलासी : ॥ ३ ॥

४३३

आधीकार तैसा करु उपदेश : साहे वोझें त्यास ते ची द्यावें : ॥ १ ॥ मुगीवरी भार गजाचा पालाण : घालीतां ते कोण कार्यसीधी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे फासें वाघुरा कुऱ्हाडी : प्रसगी तो काढी : पारधी तो : ॥ ३ ॥

४३४

नंव्हो वैद आम्ही अर्थाचे भुकेलें : भलते द्यावे पाले भलतयासी : ॥ १ ॥ कुपथे करुनी वीठबावे रोगी : काये हे सलगी : भीड त्याची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे लास फास देउ डाव : सुषाचा उपाव : पुढें आहे : ॥ ३ ॥

४३५

नव्हे परी म्हणंवी दास : काही नीमीत्यास मुळ केले ॥ १ ॥ धृ ॥ तुमचा तो धर्म कोण : हा आपण वींचारा : ॥ छ ॥ नाही सुध आचरण : परि चरण चींतीतो : ॥२॥ **तुका** म्हणे पाडुरंगा : अैसें कां गा नेनां हें : ॥३॥छ॥

४३६

मागें चीतां होती आस : केला नास या काळें : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्ही आम्हां उदासीन : भीने भीनं वारीलें : ॥ छ ॥ मोहोजाळें दुष वाढे : अ्ढे अ्ढे त्यास ते : ॥२॥ **तुका** म्हणे कोण देवा : आतां हेवा वाढवी : ॥ ३ ॥

४३७

अहो उभ या ईटेवरी : भरोवरी चुकवीली : ॥ १ ॥ धृ ॥ नीवरले जांणयेण : कोणा कोणे रुसावें : ॥ छ ॥ संकल्यासी वेचे बळ : भारें फळ नीर्मान : ॥ २ ॥ **तुका** म्हणे उभयेतां : भेटी सता लोभाची : ॥ ३ ॥ छ ॥

४३८

आसो षटपट : आंतां वाउगें बोभाट :॥१॥ धृ ॥ परीसा हे वीणवणी : आसो मस्तक चरणी : ॥ छ ॥ आपरध करा : क्षमा घडले दातारा : ॥ २ ॥ [ व. पृ. ९२ ] **तुका** म्हणे वेथा : तुम्हा कळे पंढरीनाथा : ॥ ३ ॥ छ ॥

४३९

वारकरी पांयांपांसी : आले त्यांसी वीनवीले : ॥ १ धृ ॥ काये काये ते आईका : वीसरो नका रकासी : ॥ छ ॥ चींतांवोनी चीतां केली : हे राहीली आवस्छा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सवंसारा : रुसोलों षरा यासाटी: ॥३॥

४४०

जीवीचें कां नेंणा : परी हे अवडी नारायेण : ॥ १ ॥ ध ॥ वाढवांवे हें उतर : कांही लाड करकर : ॥१॥ छ ॥ कोठें वांयां गेलें : ᵋशब्ध उतम चांगलें : **तुका** म्हणे बाळा : असेतात प्रीये षेळा : ॥ ३ ॥ छ ॥ छ॥

४४१

वोडवीलें अंग : आतां करुनी घ्यावे सांग : ॥ १ ॥ धृ ॥ काये पुजा ते मी नेणें : जाणावें जी सर्व जाणें : पोटा आलें बाळ : त्याचे जाणावें सकळ : ॥ २ ॥ **तुका** म्हणे हरी : वाहावे जी कडीयेवरी : ॥ ३ ॥

४४२

सेवटीची हे वीनंती : पांये चीती राहावे : ॥ १ ॥ धृ ॥ अैसे करा कृपादान : तुम्हां मंन सनीध : ॥ छ ॥ भाग्यावीण कैंची भेटी : नव्हे तुटी चीतनें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे कळसा आलें : हे वीठलें परीसावें : ॥ ३ ॥

४४३

काषें कडसन आड पडे : षडबडे हुसकलें : ॥ १ ॥ धृ ॥ दादी करा दादी करा : फजीतषोरा : लाज नाहीं : ॥ छ ॥ आवघा जाला रामराम : कोण्ही कर्म अचरेना : ॥ २ ॥ हरीदासांच्या पडती पायां : म्हणे तयां नागवावें : ॥ ३ ॥ दोही ठाई फजी जालें : पारणे केंलें अवकळाः ॥ ४ ॥ **तुका** म्हणे नास केला : वीटबीला वेश ज्याणे : ॥ ५ ॥ छ ॥

४४४

कुटुबाचा केला त्याग : नाही राग जवं गेला : ॥ १ ॥ धृ ॥ भजन तें वोगळवाणे : नरका जाणे चुक ची ना : ॥ छ ॥ अक्षेरांची केली आटी : जरी पोटी संतनीदा : ॥२॥ **तुका** म्हणे मागें पाये : तया जाये स्थळासी : ॥३॥

४४५

दुर्जनासी करी साहे : तो ही लाहे हे दंड : ॥ १ ॥ सीनंळीचा कुंटणी वांटा : संग षोटा षोट्याचा : ॥ छ ॥ येर येरा काचणी भेट : आगी उठें तेथुनी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे कापु नाकें : पुढे आणीकें : सीकवती : ॥३॥

४४६

करुनीयां सुध मन : नारायेण स्मरावा : ॥ १ ॥ धृ ॥ तरी च हा तरीजे सीधु : [व. पृ. ९३] भवबंधु तोडुनीयां : ॥ छ ॥ तेथे सरे सुध साचे : अतरींचे बीज तें : ॥२॥ **तुका**म्हणे लवणकळी : पडतां जळी : ते होये :॥३॥

४४७

अैसे कां हो न करा कांही : पुढे नाही नास ज्या : ॥ १ ॥ धृ ॥ वीस्वंभरा शरणागत : भुतजात वंदुनीयां : ॥ छ ॥ स्तुतीचें का नेघ फळ : सार मुळ जाणोनीयां : ॥३॥ **तुका** म्हणे पुढें काही : वाट नाही यावरी :॥३॥

४४८

जीकडे पाहे तीकडे देव : अैसा भाव दे काही : ॥ धृ ॥ काय केलो येकदेसी : गुणदोसी संपण : पड तेथे तुझ्या पायां : करी वांयां न वज तें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वीशमें सारी : ठाणें धरी जीवांसी : ॥ ३ ॥ छ ॥

४४९

जीकडे जाये तीकडे सवे : आतां यावे यावरी : ॥ १ ॥ धृ ॥ माझ्या अवघ्या भाडवला : तु येकला जालासी ॥ छ ॥ आतां दुजे धरा झनी : पायांहुनी वेगळें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आतां देवा : नका गोवा यावरी : ॥३॥

४५०

स्मरतां का घडे नस : वीस्णुदास यावरी : ॥ १ ॥ धृ ॥ अैसी सीमा जाली जगी : तर मी येगीं अनुसरोलो : ॥ छ ॥ धरीले तें : नीवडे आतां : न घडें चीतावेगळे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नास नाही: पुराणे ही गर्जती : ॥३॥

४५१

आधी नाही कळो आला हा उपाये : नाही तरी काये चुकी होती : ॥ १ ॥ धृ ॥ घालीतों पांयांसी मीठी येकसरे : नेदी तों दुसरे : आड येउं : ॥ छ ॥ कासया पडोतो लटीक्याचे भरी : नव्हतां का सीरी भर घेतों : ॥ २ ॥ **तुका** म्हणे का हें घेतो गर्भवास : कां या होतों दास कुंटुंबांचा : ॥ ३ ॥छ॥

४५२

आतां बरे जालें : माझें मज कोळो आलें : ॥ १ ॥ धृ ॥ षोटा अैसा सवसार : मज पाई धावी थार : ॥ छ ॥ उघडले डोळे : भोग देतां कांळीं : कळे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जीवा : होतां तडतोडी देवा : ॥ ३ ॥ छ

४५३

आळवीतां बाळें : माते ते सुष आगळें : ॥ १ ॥ धृ ॥ धावे आवडी भातुकें : पाहे नीवे कवतुकें : ॥ छ ॥ लेवउनी अळंकार : द्रुस्टी करावी सादर : ॥ २ ॥ आपलीया पदीं : बैसउनी कोडें वंदीं : ॥ ३ ॥ नेंदी लागो दीठी : उचलुनी लावी कंठी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे लाभा : वारीं या हे पद्मनाभा : ॥ ५ ॥ छ ॥ ७ ॥ छ ॥

४५४

[व. पृ. ९४] बोलीलों ते धर्म अनुभव आगें: काये पांडुरंगें उनें केलें : ॥ १ ॥ धृ ॥ सर्व सीधी पांई वोळगती दास : ईछा नाही यैसी होवे काहीं : ॥ छ ॥ संतसमागमें आळंकार वाणी : करु हे पेरणी सुध बीजा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे रामक्रुस्ण नामें गोड : आवडीची कोड माळ वोउं : ॥ ३ ॥ छ ॥

४५५

पंढरीस जा रे आले हो सवसारा : दीनाचा सोईरा : पांडुरंग : ॥ १ ॥ धृ ॥ वाट पाहे उभा भेटीचे अवडी : क्रुपाळ तांतंडी : उतावीळ : ॥ छ ॥ मागील परीहार पुढें नाही सीण : जालीयां दरुशण येक वेळा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नेदी आणीकाचे हाती : बैसला तो चीती णीवडेना : ॥ ३ ॥

४५६

सुषरुप अैसे कोण दुजें सांगा : माझ्या पांडुरंगा सारीषें तें : ॥ १ ॥ धृ ॥ न लगे हीडणे मुंडणें तें काहीं : साधनांची नाही आटाआटी : ॥ छ ॥ चद्रभाग्ये स्नान वीध तो हरीकथा: समाधान चीता सर्वकाळ : ॥ २ ॥ **तुका** म्हणे काला वैकुंठी दुर्लभ : वीशश तो लाभ संतसंगे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ २ ॥

४५७

माझे मज कळों येताती अवगुण : काये करुं मनं आनावर : ॥ १ ॥धृ॥ आतां आड उभा राहें : नारायेना : द्यासींधुपण साच करी : ॥ छ ॥ वाचा वदें परी करणें कठीनं : ईद्रीयां आधीन : अवघा जालो : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जैसा तैसा तन्ही दास : म्हणउनी उदास न पाहीजे : ॥ ३ ॥छ॥

४५८

माया मोकलीलें कोठें जावें बाळें : आपल्या तों बळें : न वच त :
॥ १ ॥ धृ ॥ भांडवल आम्हां आळी करावी हे : आपण ची मोहें धावं घेंसी :
॥ छ ॥ रुसोनीयां पळे साडुनीयां ताट : मागें पाहे वाट यावी यैसी : ॥ २ ॥
**तुका** म्हणे आळी साहोनीयां नीकें : देसी भातुकें बुझाउनी : ॥ ३ ॥ छ ॥

४५९

करुणी चीत( न ) षेळें भोवंतालें : चीत येथे आले पांयांपासीं :
॥ १ ॥ धृ ॥ येथें नाही षोटा चालत परीहार : जाणसी अंतर पांडुरंगा :
॥ छ ॥ सुषदुष तुज देउनी सकळ : नाही अैसा काळ केला आम्ही ॥ २ ॥
**तुका** म्हणे जाला देहाचा वीसर: नाही आतां आपपर दोन्हीं : ॥ ३ ॥ छ ॥

४६०

[ व. पृ. ९५ ] परीसाच्यो आंगें सोनें जाला ईळा : वांकणें या कळा
हीन नव्हे : ॥ १ ॥ धृ॥ अंतरीचा पालट घडला कांरण : मग समाधान तें ची
गोड : ॥ छ ॥ पीकली सेंद पुर्व कर्मा न ये : अव्हेरु तो काये घडे मग :
॥ २ ॥ **तुका** म्हणे अंनां पंगती सुरोण : प्रुथक ते गुण केले पाकें : ॥३॥ छ॥

४६१

ज्याचे माथां जो जो भार : तें ची फार तयासी : ॥ १ ॥ धृ ॥ मागें
पुढे अवघें रीतें : कळो येते अनुभवें : ॥ छ ॥ परीसा आंगी अमुप सोनें :
पोटीं हीणे धातु ची : ॥ २ ॥ आपला तो करी धर्म : जाणे वर्म **तुका**
ते : ॥ ३ ॥ छं ॥

४६२

पाहे तींकडे दीसं वोसं : अवघी आंस पांयांपें : ॥ १ ॥ धृ ॥ मनींचें
साच होईल कई : प्रम देवी भेटोनी : ॥ छ ॥ सर्वांपरी पांगुळ असें : न कळे
कैसें तें तुम्हां : ॥ २ ॥ **तुका** म्हणे क्रुपावंता : तुं तों दाता दीनाचा : ॥ ३ ॥

४६३

उसीर कां केला : क्रुपाळु वां गा वीठला : ॥ १ ॥ धृ ॥ मज दील्हें
कोण हाती : काये मानीली नीस्चीती : ॥ छ ॥ कोठवरी धीर : धरुं मन
करुं स्थीर : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जीव : अैसा भाकीतसे कीव : ॥ ३ ॥ छ ॥

४६४

चाळवंणें काये : अैसें अगें माझे मांये : ॥ १ ॥ धृ ॥ धांवं धांवं लव-
लाहें : कंठी प्रांण वाट पाहे : ॥ छ ॥ पसरुनी कर : तुंज चालीलों समोर :
॥ २ ॥ देसील वीसांवां : तुका म्हणे अैस्यां हांवां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४६५

आवडीच्या अैसे जालें : मुषा आलें हरीनाम : ॥ १ ॥ धृ आतां घेउं
धनीवरी : मार्गे उरी नुरे तों : ॥ छ ॥ सांटवंण ममा अैसी : पुढे रासी अमुप :
॥ २ ॥ तुका म्हणे कारण जालें : वीठल ती अक्षरा ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४६६

त्याचीया चरण माझें दंडवत : ज्याचें धनवीत पांडुरंग : ॥ १ ॥ धृ ॥
येथें माझा जीव पावला वीसांवा : म्हणउनी हांवा भरलासें : छ ॥ चरणीचे
रज लावीन कपाळा : जी पदे राउळा सोंई जाती : ॥ छ ॥ आणीक ती
भाग्ये येथे कुरवंडी : करुनीयां सांडी : ईंद्रा यैसी : ॥ ३ ॥ वैस्णवाचे घरी
देवाची वसती : वीस्वास हा चीतीं सतें भावें : ॥ ४ ॥ तुका म्हणे सषे हरीचे
ते दासं : आतां पुढें आस नाही दुजी : ॥ छ ॥ छ ॥

४६७

उपजोनीयां मरें : परी हें ची वाटे बरें : ॥धृ॥ नाही अवडीस पार : न
म्हणावे जालें फार : अम्रुताची (खाणी) : [व. पृ. ९६] उघडली नव्हे धनी :
॥ २ ॥ तुका म्हणे पचे : वीठल हे मुषा रुंचें : ॥ ३ ॥ छ ॥

४६८

मुग्त कासया म्हणावें : बधन तें नाही ठावें : ॥ १ ॥ धृ ॥ सुषें
करीतों कीर्तन : भये वीसरलें मन : ॥ छ ॥ नेदषी जे नास : घालुं कोप्पा-
वरी कास : ॥ २ ॥ तुका म्हणे साहें : देव आहे तैसा आहे : ॥ ३ ॥ छ ॥

४६९

वोनाम्याच्या काळें : षडे माडीले बाळें : ॥ १ ॥ धृ ॥ तें च पुढे पुढे
काई : माग लागलीयां सोंई : ॥ छ ॥ रजु सर्प होता : तोवरी च न कळतां :
॥ २ ॥ तुका म्हणे साचें : कांही माही बाळकाचें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४७०

सते तुं सते तु सते तुं वीठला : का गा हा दावीला जगदाकार : ॥ १ ॥ धृ ॥ सांभाळी आपुली हाक देतो माया : आम्हांसी कां भयाभीत केलें : ॥ छ ॥ रुप नाही त्यासी ठेवीयेले नाम : लटीकाची स्रम वाढवीला : ॥२॥ **तुका** म्हणे कां गा जालासी चतुर : होतासी नीसुर : नीर्वीकार : ॥३॥

४७१

आमच्या कपाळे तुज यैसी बुधी : धरावी तेशुधी यौगा न यें : ॥ १ ॥ काये या राहीलें वीनोदावाचुन : आपलीयां भीन : केले आम्हां ॥ छ ॥ कोठे मुर्तीवंत दावी पुन्येपाप : कास्यची संकल्प वाहावींसी : ॥२॥ **तुका** म्हणे आतां आवरावा चेडा : लटीकी च पीडा पांडुरंगा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४७२

नो बोलावे यैसे जनासी उतर : करी तो वीचार दु(बु)द्दु वेळा : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ कोण पाप आड ठाकाते येउन : पालटीतें गुण अतरीचा : ॥ छ ॥ सवसारा हाती सोडउनी गळा : हे कां अवकळा येती पुढें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सेवे घडे अतराये : यास करुं काये पांडुरंगा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

४७३

आतां हे उर्चीत माझे जना हाती : पाहीजे फजीती केली कांही : ॥ १ ॥ धृ ॥ मग हे तुमंच नोसडी चरण : त्रासोनीयां मन येईल ठाया : ॥ छ ॥ वाउगे वाणीचा न धरी कांटाळा : अैसी कां चांडाळा बुधी मज : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जरी मांथा बैसे घाव : तरी मग वाव ने घे पुढें : ॥ ३ ॥

४७४

ढेकणासी बाज गड : उतरचढ तेव्हढी च : ॥ १ ॥ धृ ॥ होती तैसा कळों भाव : आला वाव अंतरीचा : ॥ छ ॥ बोरामधे बसे आळी : आठोळी तें भोवंती : ॥ २ ॥ [ व. पृ. ९७ ] पोटासाटी वेची चणे : राजा म्हणें तोंडे मी : ॥ ३ ॥ बेडकाणें चीषल षावा : काये ठावा सागर : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे अैसे आहे : काये पाहें यांते ते : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

४७५

सेंवा[1] ते आवडी उचारावे नाम : भेदाभेदकाम : नीवारावे ॥ १ ॥ धृ॥ न लगें हालावे चालावें बाहेरी : अवघ ची घ(री) बैसलीयां : ॥ छ ॥ देवाची

१ हा च अभंग मागें पृ. ५५ वर ३०२ हा आला आहे.

नामे देवाचीये सीरी : सर्व अळंकारी समर्पावी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आहे भावे ची सतोसी : वसे नामापासी : आपुलीया : ॥ ३ ॥ छ ॥

४७६

लेववीला तैसा शोभे अळंकार : केला तैसा थोर : लाहान हीं : ॥ १ ॥ धृ ॥ गोवी पडों नेदी अधीकारा अैसी : गुणाची हे रासी : पांडुरंग : ॥ छ ॥ जाणत्या जाणतां नेणत्या सारीषा : न दीसे पारीषा : जीवाहुनी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे पाहे चीतनाची वाट : मग घ्यावी नीट : धांवं नेटे:॥३॥

४७७

आर्त भुतांप्रती : उतम यौजाव्या त्या शग्ती : ॥ १ ॥ धृ ॥ फळ आणी समाधान : तेथे उतम कारण : ॥ छ ॥ अल्प तो संतोसी : स्थळी सापडे उद्वेसी : ॥ २ ॥ सहज संगम : **तुका** म्हणे तो उतम : ॥ ३ ॥ छ ॥

४७८

मुळाचीया मुळे : दुषें वाढती सकळें : ॥ १ ॥ धृ ॥ यैसा यौगीयांचा धर्म : नव्हे वाढवावा स्रम : ॥ छ ॥ न कळे आवडी : कोण वाहे कैसी घडी : **तुका** म्हणे थीत : दुष पाववावें चीत : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

४७९

मायेवरी सता आवडीची बाळा : संकोचोनी ळळा प्रतीपाळी : ॥ १ ॥ धृ ॥ आपराध माझे न धरावे मनी : तुम्हां संतजनी मायेबापीं : ॥ छ ॥ अरुश वचन लेकुराची आळी : साहोनी कवळी : मागुताळी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आंगी काये नाही सता : परी नीस्टुरता : उपजेना : ॥ ३ ॥ छ ॥

४८०

कैसा होतो कृपावंत : बहु संत सागती : ॥ पुसने नाही याती कुळ : लागों वेळ नेदावा : ॥ १ ॥ धृ ॥ अैसीं काये जाणो कीती : उतरती उतरलीं : ॥ छ ॥ दावी वैकुंठीच्या वाटा : पाहातां मोटा : संपनं : ॥ अभीमान तो नांही आगी : क्षेमेलागी न बैसे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे अळस नीद्रा : नाही थारा त्या आगी : आले द्यावे भलत्या काळें : वीठल बळें अगळा : ॥ ६ ॥

४८१

सदेब हे वारकरी : जे पंढरी देषती: पदोपदी वीठल वाचें : [व.पृ.९८] त्या कंईचा सवसारु : ॥ १ ॥ धृ ॥ दोश पळाले दोश पळालें : पैल आलें

हरीदास : ॥ छ ॥ प्रेम भातें भरले आंगी : नीर्लज रगी नाचती : ॥ गोपी-चंदनाच्या उटी : तुळसी कंठी मीरवती : ॥२॥ तुका म्हणे देव चीती : मोक्ष हाती रोकडा : दुबळा या शग्तींहीणा : त्या ही जना पुरता : ॥ ३ ॥

४८२

ऐसी ठावी वर्मे : तरी सांडवलों भ्रमें : ॥ १ ॥ धृ ॥ सुषें नाचोतो कीर्तनी : नाही अशंका ते मनी : ॥ छ ॥ ऐसे आलें हाता : बळ तरी गेली चींता : ॥ २ सुष येथे जालें तरी : नाही आणीकाची उरी : ॥ ३॥ ऐसें केलें देवें : पुढें काही च न व्हावें : ॥ ४ ॥ तुका म्हणे मन : आतां जालें समाधान : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ कान्होबाचा अभंग

४८३

चीतीं बसलें चींतन : नारायन नारायेन : ॥ १ ॥ धृ ॥ न लगें गोड कांहीं आतां : आणीक दुसरे सर्वथा : ॥ छ ॥ हारपला द्वैतभाव : तेणे देहे जाला वाव : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे आम्ही : जालो नीह्काम ये कामी :॥३

४८४

व्यापीले सर्वत्र : बाहेरी भीतरी अंतर : ॥ १ ॥ धृ॥ ऐसे गोवीदे गोवीलें : बोलें नव जाये बोलीले : ॥ छ ॥ संचीताची होळी : करुनी जीव घेतला बळी : ॥ २ ॥ तुकयाबंधु म्हणे नाही : आंतां सवसारा उरी काही : ॥ ३ ॥

४८५

तुम्हा आम्हांसी दरुशण : जाले दुर्लभ यथुन : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी करीतों आतां : दंडवत घ्या समस्ता : ॥ छ ॥ भवीस्याचे माथां देहे : कोण जाणे होईल काये : ॥ २ ॥ म्हणे तुकयाचा बंधव : आमंचा तो जाला भाव : ॥ ३ ॥ छ ॥

४८६

अनंत जन्मे जऱ्ही केल्या तपरासी : तऱ्ही हा न पवेण म्हणे देह : ॥ १ ॥ धृ ॥ ऐसें जें नीधान लागलें हाती : त्याची केली माती : भाग्येहीना : ॥ ७ ॥ उतमाचे सार वेदांचें भांडार : ज्याच्यानें पवीत्र तीर्थे होती : ॥ २ ॥ म्हणे तुकयाबंधु आणीक उपमा : नाही या तो जन्मा द्यावयासी : ॥ ३ ॥

४८७

आम्हांपासी येकसरे सुध भाव : चतुराई जाणीव न लगें कळा : ॥१॥ सर्व जाणे माझा स्वामी पांडुरंग : तया अगेसग गोपाळांसी : ॥ २ ॥ तुका म्हणे कर्म धर्म न ये हाता : तयावरी सता : भावीकाची : ॥ ३ ॥ छ ॥

## ४८८

[ व. पृ. ९९ ] गौळणी बांधती धारनासी गळा : षेळे तें गोपाळां माजी ब्रम्ह : ॥ १ ॥ येस्वदेसी मागें थी कोणी भोजन : धांवे रानोरान गावी पाठीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सर्व कळा त्याचें आंगी : भोळेपनालागी भीक मागे : ॥ ३ ॥ छ ॥

## ४८९

प्रींती करी सता : बाळा भीती मातापीता : ॥ १ ॥ धृ ॥ काये चाले त्यासीं बळ : आळी करीतां कोल्हाळ: ॥ छ ॥ पदरीं घाली मीठीं : षेदी मागें पुढे पुढें लोटी : ॥ २ ॥ बोलें मन आलें : **तुका** साहीला वीठलें : ॥ ३ ॥ छ ॥

## ४९०

वैद वांचवीते जीवा : तरी कोणं ध्यातें देवा : ॥ १ ॥ धृ ॥ काये जाणो कैसी परी : परारब्ध ठेवी उरी : ॥ छ ॥ नवसें कन्यापुत्र होती : काये करणे लागे पती : ॥ २ ॥ आंगी देवत संचरें : आणीक काये तया उरे : ॥ ३ ॥ जाणे हा वीचार : केशव **तुकयाचा** दातार : ॥ ४ ॥

## ४९१

धृ ॥ न सोडी न सोडी न सोडी रे वीठोबा चरण न सोडी न सोडी : ॥छ॥ भलतें जड पडो भारी : भलतें जड पडो भारी : जीवावरी ही आगोज ॥ १ ॥ शतषंड देहे शस्त्रधारी : शतषंड देहे शस्त्रधांरी : करीतां परी न भीये : ॥ २ ॥ **तुका** म्हणे केली आधी [1] **तुका** म्हणे केली आधी : केली आधी द्रुढ बुधी सावध : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

## ४९२

॥ धृ ॥ बरवे बरवे केलें रे वीठोबा बरवे बरवे केले रे : ॥छ॥ पाहोनी अंत क्षेमा आंगी : काठीवरी मारईले रे : ॥ १ ॥ सीव्यागाळी गणीत नाही : बहुत फजीत वीटबीले : ॥२॥ **तुका** म्हणे क्रोधा हाती : सोडउनी घेतले रें : ॥३॥

## ४९३

॥ धृ ॥ पावोलो पावलों रे देवा पावलों पावलों : ॥ हातें संचीत केलें : आतां काये बोलों : ॥ १ ॥ सोज्वळ करुं वाटा : भावे करुं गेलों : ॥२॥ **तुका** म्हणे करणें : न करणीयां वेगळा केलो : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हा चरणार्ध मुळांत दुबार लिहिला गेला.

४९४

॥ धृ ॥ का होतीका होती रे देवा येव्हढी फजीती : ॥ छ ॥ मुळी वर्म चुकलो नसतो : तो मी येसें चीतीं : ॥ १ ॥ होनार ते होउन गेलें : मीथ्या आतां षंती ॥ २ ॥ **तुका** म्हणे पुरे आतां : दुर्जनसंगती : ॥ ३ ॥ छ ॥

४९५

॥ धृ ॥ सोडवा सोडवा हो आतां : सोडवा अनता : ॥ छ ॥ तुजवीन कोण येसा : दुजा जीवदाता : ॥ १ ॥ [ व. पृ. १०० ] कोणा लाज येसे नेना : आणीका शरन जातां : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सषया माझ्या : रघुमाईच्या कांतां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ५ ॥

४९६

आवडीचे भेटी नीवे : चीत पावे वीस्राती : ॥ १ ॥ धृ ॥ बरवीयांचा छंद मन ॥ नारायेना आईट : ॥ छ ॥ तुळने कांहीं साम्या पुरे : हे तो नुरे ये रुची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे बरवे जाले : फवले हे कळल्या : ॥ ३ ॥

४९७

केलीयाचें दान : करा आपुले जतन : ॥ १ ॥ धृ ॥ माझी बुधी स्थीर देवा : नाही वीशयांचा हेवा : ॥ छ ॥ भावा अंतराये : येती अतरती पाये : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जोडी : आदी अंती राहो गोडी : ॥ ३ ॥ छ

४९८

माझे हाती आहे करावे चींतन : तुम्ही कृपादान : प्रेम द्यावे : ॥ १ ॥ धृ ॥ मागतीयां भांडवल आळवण : नामाची जतन दातीयासी : ॥ छ ॥ बाळक धावोनी अड नीघे स्तनी : घालावा जननी : कृपे पान्हा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे करी कासवीचे परी : आहे शुत्रदोरी : तुझे हाती : ॥ ३ ॥ छ ॥

४९९

× × × × ×

॥ १ ॥ धृ ॥ आहे तें आधीन आठपले हाती : आणीका ठेवीती काये बोला : ॥ छ ॥ जानतीयां पाठी लागली उपाधी : नेणतां तो सीध भोजनासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भय बांधले गाठी : चोर लागे पाठी दुमतया : ॥ ३ ॥

जातो न यती ये वाटा : काये नीरवीतो करटा : ॥ १ ॥ धृ ॥ कैसा जाला बेसरम : लाज नाही न म्हणे राम : ॥ छ ॥ पाहे वैऱ्यांकड : डोळे वासुनी ऱ्हहे रडे : ॥ २ ॥ बांधोनी येमाहाती : दील्हा त्याची नाही षंती : ॥ ३ ॥ नांही यापें काम : अैसे जाणोतो अधम : ॥ ४ ॥ आझणु तऱ्ही मुका : काये होसील म्हणे तुका : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५०१

वाट दावी त्याचे गेलें काये : नागवला जो वारीतां जाये : ॥१॥ धृ ॥ अैसी मागें ठकली कीर्ती : सांगतां षाती वीशगोळा : ॥ छ ॥ वीचारुनी पाहे त्यास : न वजे जीवे नव्हे नास : ॥ २ ॥ तुका म्हणे जो रुसला जीवा : तयासी केशवा काये चाले : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

५०२

अनुभवावांचुन : सोंग संपादन : नव्हे हे कारण ( स्वहीताचें ) :॥१॥ [ व. पृ. १०१ ] तैसा नको भुलों बाहेरील्या रंगें : हि(त) ते ची वेगें करुनी घेवी : ॥ छ ॥ बहुरुपीरुपे नटला नारायेन : सांग संपादुन : जैसा तैसा : ॥ २ ॥ पाशाणाचे नाव ठेवीलें देव : आणीका तारी भाव परी तो तैसा : ॥ ३ ॥ कंनक झाड म्हुण वंदीलें माथा : परी तें अर्ता नी मळे माजी : ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याचा भाव तारी त्यास : अहंभावी नास तो ची पावे : ॥ ५ ॥ छ ॥

५०३

मज नस्टा माया मोहो नाही लोभ : अदीक क्षोभ आदराचा : ॥ १ ॥ धीग हे शरीर अनउपकार : न मनी आभार : उपकाराचा : ॥ २ ॥ मजहुन नस्ट आहे अैसे कोण : नावडे मीस्टांन : बहु बोल : ॥ ३ ॥ न दीसती मज अपले सगुण : सचीत ते कोण जाणे मागे : तुका म्हणे माझे देषोनीया काई : पांडुरंगा पाई : राषीयेलें : ॥ ५ ॥ छ ॥

५०४

मतीवीन काये वर्णु तुझे ध्यान : जेथे पडीले मौन्ये वेदस्रुती : ॥ १ ॥ करुनी गोजीरा अपुलीये मती : धरीयले चीती चरनकमळ : ॥ २ ॥

( येथें वहींतील १०१ व्या पानावरील एक बाजू म्ह० वरलें अर्धे पान झालें. ह्यापुढील १५ पानें सुटीं आहेत; व त्या सुट्या पानांवर १०५ पासून क्रमानें ११९ पर्यंत पृष्ठांक आहेत. पुढें १२० व्या पानापासून वही मजबूत आहे. मधल्या १०१ पानाची खालची बाजू म्ह. १०२ पृष्ठाची मागील बाजूपासून ते १०४ अखेर पर्यंतचीं पानें गहाळ झालीं आहेत; आणि १०५ ते ११९ पर्यंतचीं पानें फाटून सुटीं झाल्यामुळें तेथील अभंग लागत नाहींत. )

+ सुषरुप : ॥ १ ॥ उसावीती वहु लागती प्रयास : चुकल्यां घड नास : अल्प धर्मा : ॥ छ ॥ पाकसीधी लागे संचीत अईतं : घडतां सोये ते तव्हां गोड : ॥ २ ॥ तुका म्हणे वरे सागतां ची गोठी : रणभुमी द्रुस्टी न पडतां : ॥ ३ ॥

५०५

न ये वीठ्ठ सेवा स्वेईछा जगाची : अवज्ञा देवाची घडे तेणें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ देहाचा नीग्रही त्याचे तो सांभाळी : मग न ये कळी आंगावरी : ॥ छ ॥ आपलीया वीछा माता सेवा करी : न बाधीते थोरी : वेने क्षोभे : ॥ २ ॥ तुका म्हणे सांडा देषीचे दीमाष : मोडसीचे दुष गाडी फाडी : ॥ ३ ॥ छ ॥

५०६

सते सते देते फळ : नाही लागत ची बळ : ॥ १ ॥ ध्यावे देवाच ते पाय : धीर सकळ उपायें : ॥ छ ॥ करावी च चीतां : नाही लागती तत्वत : ॥ २ ॥ तुका म्हणे भावें : होतें सकळ बरवें : ॥ ३ ॥ छ ॥

५०७

[ व. पृ. १०५ ] नभोमये जालें जळ : येकी सकळ : हारपलें : ॥ १ ॥ धृ ॥ आतां काये सारासारी : त्याच्या लहरी तयांत : ॥ छ ॥ कैचा येथे येवा सांडी : आप कोडी आपण : ॥ २ ॥ तुका म्हणे कल्प जाला : आस्त गेला उदई : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५०८

साधक जालें कळी : तवांपुर्ची लांव नळी : ॥ १ ॥ धृ ॥ पची पडीले मद्यपान : भाग्यभुरका हे साधन : ॥ छ ॥ अभेदाचा पाठांतर : अती विशई पडी भर : ॥२॥ चेल्यांचा सुकाळ : पडि दंड भगपाळ : ॥३॥ सेवा मानधन : बरे ईछेन संपन : ॥ ४ ॥ सोंगाच्या नरकाडी : तुका बोडुनीयां सोडी : ॥ ५ ॥

५०९

अवघे जग देव : मुष्ये उपदेशाची टेव : ॥ १ ॥ धृ ॥ आधी आपणी-यांसी : तरी उतरे येकसी : ॥ छ ॥ ब्रम्हज्ञानाचे कोठर : ते हे नीस्चये उतर : ॥ २ ॥ **तुका** म्हणे उन्मनी : नास कार्यकारणी : ॥ ३ ॥ ६ ॥

५१०

मज पाहातां हे लटीके सकळ : कोठे मायाजाळ दावी देव : कोण्हाचा कोण्हासी न धरे समंध : आहे × शुध बुध : ठाईचां ठाई : ॥ १ ॥ धृ : ॥ काढा × × × आपुल मोहो बुंथी जाळे : नका लाउं बळे वेड आम्हां : ॥ छ ॥ जीव सीव कां ठेवीली नावें : सत्या तुम्हा ठावे आसोनीयां : सेवेच्या आभीळाशे न धरा ची वीचार : आम्हा दारोदार हींडवीलें : ॥ २ ॥ अहे तैसे आतां कळलीया वरी : परते सांडा दुरी : दुजेपण : **तुका** म्हणे काये छायचा आभीळास : हौस पावे नास : तारागणी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५११

पंच भुताचा गोंधळ : यके ठाई केला मेळ : लावीला सबळ : अहकार त्यापाठी : ॥ १ ॥ धृ ॥ तेथे काये मी त माझे : कोण वागवी हे वोझें : दव्याहा केवी रीझें : हे काळाचे भातुकें : ॥ छ ॥ जीव नेदष मरन : धरी नवी सांडी जीर्ण : संचीत प्रमाण : भोग शुभा अशुभा : ॥ २ ॥ वीछा वाढवी ते वेल : षुटावा तो बरा बोल : **तुका** म्हणे मोल : झाकल ते पावेल : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५१२

मायां ते ची ब्रह्म ब्रम्ह ते ची माया : । आंग आणी छाया : तैसी परी :॥१॥ धृ ॥

५१३

[व. पृ. १०६] पुसावेंसें हे ची वाटे : जे जे भेटे तयांसी : ॥१॥ धृ ॥......

५१४

येकी केली हा तो फळी : ठाया बळी : पावलें : ॥ १॥ धृ ॥ आम्ही देवा शत्कीहीने : भाकुं तेणे कारुणा : ॥ छ ॥ पावटणी केला काळ : जया बळ होते ती : ॥ २॥ **तुका** म्हणे वीर्यावीर : संत धीरसमुद्र : ॥ ३ ॥ छ ॥

---

१ हा अभंग पृ. ७६ वर ४१९ वा आला आहे. म्हणून बाकीचे तीन चरण येथें दिले नाहींत.

२ पृ. ४ वर २१ वा अभंग पहा.

५१५

पुढीलाचें ईछी फळ : नाही बळ तें आगी : ॥ १ ॥ ध्रु ॥ संत गेलें तया ठाया : देवराया पाववी : जेस्टांची कां आम्ही जोडी : परथडी न लभो : ॥ २ ॥ तुका म्हणे करी कोड : पुरवी लाड अमुचा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५१६

ॐ व्या तीस ३०

वीचार करीती बैसोनी गौळनी : ज्या क्रुस्णकामीणी कामातुरा : ॥ १ ॥ येकात येकल्या येका च सुषाच्या : ॥ आवडतीं त्यांच्या गोस्टी त्यांला : ॥ २ ॥ तर्कवीतर्कीनी दुरावील्या दुरी मौन त्यापरी : चोरी अरंभीले : ॥ ३ ॥ कुशळा कवीत्या : कथी त्या लोभीका : त्या ही येथे नका आम्हापासी : ॥४॥ बोलीक्या वचाळा : क्रुस्णरता नाही : या चोरुनी तीही षेट केली : ॥ ५ ॥ भेउनीयां जना येकी सवा जाल्या : वाती वीझवील्या : दाटो बळें : ॥ ६ ॥ क्रुस्णसुष नाही कळले मानसी : नीदीती त्या त्यासी : क्रुस्णरता : ॥ ७ ॥ तो न य जवळी देषोनी कोल्हाळ : ॥ म्हणउनी म्हणउनी समेळ : मेळवीला : ॥ ८ ॥ अतरी कोमळा बाहेरी नीर्मळा : तलीन त्या बाळा : क्रुस्णध्यानी : ॥ ९॥ हरी-रुपीं द्रुस्टी कांनी त्याची गोस्टी : आळगीती कंठी : येकी येकी : ॥ १० ॥ न साहे वीयोग करीती रोदनां : अमीस्ट भावना देहाचीया : ॥ ११ ॥ [व. पृ. १०७] वीसरल्या मागें ग्रहसुतपती : आवस्था याची गोवीदाची : ॥ १२ ॥ अवस्था लागोनी नीच्हळ चीं ठेल्या : येकी येकी जल्या क्रुस्णरुपा : ॥ १३ ॥ क्रुस्ण म्हणउनी देती आळीगणं : व्रीहेताप तेणें नीवारेना : ॥ १४ ॥ ताप कोण वारी : गोवींदावांचुनी : साच तो नयेनी नेदषतां : ॥ १५ ॥ नेदेषतां त्याचा प्रान रीघो पाहे : आजी कामास ये उसीर केला : ॥ १६ ॥ रीत्या ग्रांने-गोस्टी तयां नावडती : आळींगणें प्रीती क्रुस्णाचीया : ॥ १७ ॥ मागें कांहीं आम्ही चुकलो त्याची सेवा : आसैल या देवा राग आला : ॥ १८ ॥ आठ-वीती मागें पापपुन्ये दोश : परीहार येकीसी येकी देती : ॥ १९ ॥ आनुतापे जाल्या संतप्त त्या बाळा : ठकुनी वीव्हळा धरणी आंग : ॥ २० ॥ जाणोनी चरीत्र जवळी च होता : आली त्या अनतां क्रुपा मग ॥ २१ ॥ होउनी प्रकट दाषवीले रुप : तापत्रये ताप नीवीलें : ॥ २२ ॥ नीवालेंया देषोनी क्रुस्णाचे श्रीमुष : सोष मोहो दुष दुरुवला : ॥ २३ ॥ साच भाव त्याचा आनु-नीयां मना : आळगीतो राणा वैकुठींचा : ॥ २४ ॥ हरीअगसंग हरीरुप

जाल्या : बोलो वीसरल्या तया सुषा : ॥ २५ ॥ वीभचारभावे भोगीले अनतां : व्रतोनी असतां घराचारी : ॥ २६ ॥ सकळा चोरुणी हरी जया चीतीं : धन्ये त्या नादती : तयांमध्यें : ॥ २७ ॥ उने पुरे त्याचें पडो नेदी काहीं : राषे सर्वा ठांई देव तयां : ॥ २८ ॥ न कळे लावव : ब्रंम्हांदीक माव : भत्कीभाव देव केला तैसा : ॥ २९ ॥ **तुका** म्हणे धन्ये त्यांचा वीभचार : साधीलें आपार : नीज सुष : ॥ ३० ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

५१७ नीरोपन

आईका संत जन उतरे माझे बोवडे बोल : ॥ करी लाड तुम्हांपुढें हो कोण्ही झनी कोपाल : ॥ १ ॥ उपाये साधने आईका कोण गती अवगती : द्रुढ बैसोनीयां सादरे तुम्ही धरावे चीती : ॥ २ ॥ धर्म तयांसी च घडे रे ज्याची आधीन भाज : कर्म तयासी जोडे रे भीड नाही ते लाज : ॥ ३ ॥ पुन्ये ते जाणा रे भाई हो परउपकाराचे : परपीडा परनीदा षरे पाप हे त्याचे : ॥ ४ ॥ लाभ तयासी च जाला रे मुषी देव उच्चारी : प्रपचापाठी गुतला हाणी तयाची थोरी : ॥ ५ ॥ सुष तें ची ते जाणा रें संतसमागम : दुष तें ची जाणा रे सम तेथे वीशेम : ॥ ६ ॥ [ व. पृ. १०८ ] साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुधी : प्राधीनासी आहे घात रे थोर जाण संमधी : ॥ ७ ॥ मान पावे तो आगळा मुषे ईद्रीये राषे : ॥ आपमानी तो आधररसस्वाद चाषे : ॥ ८ ॥ जाणता तयासी बोलीजे जाणे समाधान : नेणता तयासी बोलीजे वाद करी भशेण : ॥ ९ ॥ भला तो ची येक जानां रे : गयावर्जन करी : बुरा नस्ट धन मेळवी परद्वार जो करी : ॥ १० ॥ आचार तो अन्नं काढी रे गाईअतीतभाग : आनाचारी करी भोजण गोही नसतां संग : ॥ ११ ॥ स्वहीत तेणें ची केले रे : भुती देषीला देव : अन्हीत तयाचे जाले रे आणी हंभाव : ॥ १२ ॥ धन्ये जन्मा ते ची आले रे येक हरीचे दास : धींग ते वीशंई गुतलें केला आयुस्या नास : ॥ १३ ॥ जोहोरी तो ची जाणा रे जाणे सीधलक्षेण : वेडसरु तो भुले रे वरदळ भुशेणे : ॥ १४ ॥ बळीयाढा तो जाणा रे : भत्की द्रुढ स्यरीरी : गांढ्या तयासी बोलीजे येकभाव न धरी : ॥ ॥ १५ ॥ षोल तो वचन गुरुचे : जो गीळुन बैसे : उथळ नाही धीर म्हणे होईल कैसें : ॥ १६ ॥ उदार तो जीवभाव रे ठेवी देवाचे पावी : कृपणं तयासी बोली × × × × ॥ १७ ॥ चागलेंपण ते ते च रे ज्याचे अंतर सुध : वोगळु मळीन अतरी वाणी वाहे दुर्गंध : ॥ १८ ॥ गोड ते चीं येक आहे रे सार

वीठलनाम : कडु तो सवसार रे लक्ष्य चौऱ्यासी जन्म : ॥ १९ ॥ तुका म्हणे मना धरी रे संतसगती सोई : न लगे काही करवे राहे वीठलपांई : ॥ २० ॥छ॥

५१८ नाट

मागुता हा ची जन्म पावसी : भोगीलें सुषदुष जाणसी : हें तवां न घडे सायासी : कां रे अंध होसी : जाणोनीयां : ॥ १ ॥ लक्ष चौच्यासी न चुके फेरा गर्भवासी यातना थोरा : येउनी पडे संदहपुरा : वळसा थोरा : मायाजाळी : ॥ २ ॥ पसु काये पापपुन्यें जाणती : उतम मध्येम भोग भोगीती : काये येक उपजतां करीती : बहीर अंध होती पागुळ मुके : ॥३॥ नरदेह नीधान लागले हातीं : उतमा सार उतम गती : देव ची होईन म्हणती ते होती : तरी कां चीती न धरावें : ॥ ४ ॥ क्षीण येक मन स्थीर करुनी : सावध होई डोळे उघडुनी : पाहे वेद बोलीले पुराणी : तुका वीनवनी : करीतुसे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

५१९

[ व. पृ. १०९ ] ईतुके राषे भलतया परी : परनींदा परद्रव्ये परनारी : सांडुनी अभीळास अतरी : व्रत वेव्हारी : सुषरुप : ॥ १ ॥ न करी दंभाचा सायास : शांत राहे बहुवस : जीव्हे सेवी सुगंधरस : न करी अळस : रामनामीं : ॥ २ ॥ जनमेंत्र होई सकळांचा : अशुभ नोबलावी वाचा : संग न ध(रा)वा दुर्जनाचा : करी संतांचां सायास : ॥ ३ ॥ करीसी देवावीन आस : अवघी होवील नीरास : त्रुस्णा वाढवीसी बहुवस : कधी सुषास न पवसी : ॥ ४ ॥ धरुनी वीस्वास करी धीर : करीतां देव हा ची नीर्धार : तयाचा वाहेल योगक्षेम भार : नाही अंतर तुका म्हणे : ॥ ५ ॥

५२० नाट

नो बोलसी ते ही कळलें देवा : लाजसी आपुलीया नांवां : तुज मी नाही घालीत गोवा भीड केशेवा : कासयाची : ॥ १ ॥ उतरी आपुला हा भार : मजसी बोलोनी उतर : तुझा मज नव्हे अंगीकार : मग विचार करीन मी : ॥ २ ॥ दातया आणी माग + + + + + बोलीली यैसी : येथानशग्ती टाकैल तैसी : बाधी दोघांसी : वीन्मुषता : ॥ ३ ॥ म्हणउनी पाहातो मी आस : तुझीया वचणाची वास : धीर हा करुनी सांयास : न टळे नेमास : आपुलीया : ॥ ४ ॥ तुझें मी घेतल्या वाचुन : नवजे येथुनी वचन : ॥ हा ची माझा नेम सत्य जाण : आहे नाही म्हण तुका म्हणे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५२१ नाट

आंतां मी न पडे ये सायासीं : सवंसारदुषाचीये फांसी : ॥ शरन रीघन संतांसी : ठाव पांयांपासी मागैन त्यां : ॥ १ ॥ न कळे संचीत होतें काये : कोन्या पुन्यं लाधले तुझे पाये : आतां मज नवीसभे माये : मोकलुनी धाये : वीनवीतसें ॥ २ ॥ बहुत जाचोलो सवंसारे : मोहमायाजाळाच्या वीषारे : त्रीगुण येतील लेहरे : तेणे दुषे थोरे आक्रंदलो : ॥ ३ ॥ आणीक दुषे सागो मी कीती : ॥ सकळ सवसारस्थीती : न साहे पाशाण फुटती : भये चीती काप भरलासे : ॥ ४ ॥ [ व. पृ. ११० ] आतां मज न साहे सर्वथा : सवंसारगंदी हे वारता : जालो वेडा आसोनी जाणता : पावे अनंता **तुका** म्हणे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५२२ नाट

आतां तुज कळल तें करी : तारीसी तरी तारी मारी : जवळी अथवा दुरी धरी : घाली सवसारी : आथावा नको : ॥ १ ॥ शरण आलो नेणतपणे : भाव अणी भक्ती काही नेणे : मतीमद सर्वभावग्नाने : बहु रंक उणे रकाहुनी : ॥ २ ॥ मन स्थीर नाही माझीये हातीं : ईद्रीये धावंतां नावरती : सकळ षुंटलीया युक्ती : शांती नीवृती जवळी नांहीं : ॥ ३ ॥ सकळ नीवेदीला भाव : तुझीये पाई ठेवीयला जीव : ॥ आतां करी कळे तो उपावो : तु ची सर्व ठावो माझा देवा : ॥ ४ ॥ राहीलो धरुनी वीस्वास : आधर नेटी तुझी कास : आणीक नेणे मी सायास : **तुका** म्हणे यास : तुझें उचीत : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

५२३ नाट

काये मी उधार पावैन : काये कृपा करील नारायन : अैसें तुम्ही सागा संत जन : करा समाधान : चीत माझे : ॥ १ ॥ काये हे षडईल कर्म : पारुशती धर्माधर्म : कासयाने ते न कळे वर्म : म्हणउनी स्रम वाटतसे : ॥ २ ॥ काये हे स्थीर राहेल बुधी : काही आरीस्ट न येल मधी : धरीली जावील ते शुधी : सेवट कधी : मज न कळे : ॥ ३ ॥ काये यैसे पुन्ये होईल गांठी : घालीन पाई देवाचीय मीठी : मज तो कुवाळील जगजेठी : दाटवीन कंठी शद्गदीत : ॥ ४ ॥ काये हे नीवतील डोळें : सुष ते देषोनी सोहोळे : संचीत कैसे ते न कळे : होती डोहोळे : वासनेसी : ॥ ५ ॥ यैसी चीतां करी सर्वकाळ : रात्रदीवस तळमळ । **तुका** म्हणे नाही आपुलें बळ : जेणें फळ पावें नीस्चेयेसी : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

५२४ नाट

देवा तु कृपाकरुनांसीधु : होसी मायेबाप आमचा बंधु : जीवणसीधी साधनसीधु : तोडी भवबंधु : काळफांसे : ॥ १ ॥ [ व. पृ. १११ ] शरणगतां वरपंजर : आभयेदाना तुं उदार : सकळां देवां आगोचर : होसी आकार अवीनास : ॥ २ ॥ भागली स्तुती करुणाकार : तेथ मी काये ते गव्हार : जाणावया तुझा वीचार : नको अतर देउं आतां : ॥ ३ ॥ नेणे भाव परी म्हणवी तुझा : नेणे भग्ती परी करीतों पुजा : अपल्या नामाचीया काजा : तुज केशीराजा : लागें धावणें : ॥ ४ ॥ तुझीया बळे पंढरीनाथा : जालो नीर्भर तुटली वेथा : घातला भार तुझीये माथा : न भे सर्वथा : तुका म्हणे : ॥५॥

५२५ नाट

सुष या संतसमागमें : नीत डुनावे तुझीया नावे : दहन होती सकळ कर्मे : प्रेमें सर्वकाळ डुलतसो : ॥ १ ॥ म्हणउन नाही कांहीं चींतां : तु च आमुचा मातापीता : बहीणबंधु आणी चुलता : आणीक गोता : सर्व ठांई : ॥ २ ॥ यैसा कळला नीर्धार : माझा तुज न पडे वीसर : अससी देउनीयां × बाहे अभ्यतर : मज जवळ : ॥ ३ ॥ दुष तें कैसे न ये स्वप्नासी : भुक्ती मुक्ती जाल्या कामारी दासी : त्याचे वर्म तु ची आम्हांपासी : सुषे राहीलासी प्रेमाचीया : ॥ ४ ॥ जेथे तुझ्या कीर्तनाचा घोश : जळती पापे पळती दोश : काये उने आम्हा अनंदास : सेंउं ब्रम्हरस तुका म्हणे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५२६ नाट

देवा तु अमंचा कृपाळ : भत्की प्रीतीपाळ दीनवछळ माये तु माउली स्नह्याळ : भार सकळ : चालवीसी : ॥ तुज लागली सकळ चींतां : राषणें लागें वावडे जातां : पुडती नीरवीसी संतां : ॥ नव्हे वीसंभतां : धीर तुज ॥ २ ॥ आम्हां भये चींतां नाही धाक : जन्ममरणं कांहीयेक : जाला येहेलोकी परलोक : आले सकळीक वैकुंठं : ॥३॥ न कळे दीवस कीवा राती : अषंड लागलीसे जोती : अनंदलहरीची गती : वरंनु कीती : तया सुषा : । ।४ ॥ तुझीया नामाची भुशेणे : तो ये मज लेववीले लेणे : तुका म्हणे तुझींयान पुने : काये ते उने येक आम्हां : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

५२७ नाट

कोण सुष धरुणी संवंसारी : राहो सांग मज बा हरी : अवघ्या नासीवंत परी : [ व. पृ. ११२ ] थीता डुरी तु हीं अंतरसी : ॥ १ ॥ प्रथम केला गर्भी [illegible] : काय ते सांगावे सायास : दुष भोगीले नव ई मास : आलो जन्मास

यथेवरी : ॥ २ ॥ बाळत्वपण गेलें नेणता : तारुनदशे वीशयेवेथा : व्रुधपणी प्रवर्तली चींता : मरे मागुता जन्म : धरी ॥३॥ क्षीन येक तो ही नांही वीसांवां : लक्ष चौऱ्यासी घातल्या धांवां : भोंवंडीती पांठी लागल्या हांवा : लागो आगी नांवां माझ्या मीपणा : ॥ ४ ॥ आतां पुरे यैसी भरोवरी : रंक होउनी रोहेन द्वारी : तुझा दास मी दीन कामारी : तुका म्हणे करी क्रुपा आतां : ॥ ५ ॥

नाट ५२८

जंवं हे सीध सकळ अहे : हात चालावया पाये : आपुले स्वहीत तु पाहे : तीर्थयात्रे जाये चुकों नको : ॥ १ ॥ जंवं काळ असे दुरी ठेला : हरी-गुण गायें आईके वहीला : मनी भाव धरुणी आपुला : नवेच त्याला चुको नको : ॥ २ ॥ जोडुनी धन न घली माती : ब्रह्मंवर्दें पुजन येती : सत्य आचरन देवां भुतीः : करी सांगाती चुकों नको : ॥ ३ ॥ दसा यौवन बानली आंगी : नव्हे पागीला वीशयासंगी : कामक्रुधलोभमोहो त्यागी : राहे संतसंगी चुको नकों : ॥ ४ ॥ मग न चले तेथे काहीं : सता संपदा राहीली ठावीं : संचीतं जाईल पुढे गोही : तुका म्हणे ते ही ये माअझ्या : ॥ ५ ॥ छ ॥

नाट ५२९

काये आम्ही भत्की करणे कैसी : काये येक वाहावे तुम्हांसी : अवघे भरोणी उरलासी : वाणी षाणी रंसी : रुप गधी : ॥ १ ॥ ॥ कैसे करु ईद्रीयां बंधन : पुनेपापाचें षंडन : काये व्रत करुं आचरण : काये तुजवीन : उरलें तें : ॥ २ ॥ काये डोळे झाकुनीयां पांहो : मंत्र जप काये ध्यांवो : कवणे ठांई धरु यां भाव : काये ते वाव तुजवीण : ॥ ३ ॥ काये हींडो कवणी दीसा : कवणे ठांई पाव ठेउं कैसा : काये तु नव्हेसी न कळे तैसा : काये मी यैसा पाहो आंतां : ॥ ४ ॥ तुझीया नामांचे सकळ : [ व. पृ. ११३ ] पुजा आर्चन मंत्र माळ : धुप दीप नवेद फळ : तांबोळ घेउं पस्पांजुळ : तुका म्हणे : ॥ ५ ॥ छ ॥

नाट ५३०

आतां येणे बळे पंढरीनाथु : जवळी राहीला तीस्टतु : पाहातां न कळे जयाचा अंतु : तो ची ऱ्हुदयांत घालु आतां : ॥ १ ॥ वीसरोणी आपुला देहपणभावो नावें भुलवीला पंढरीरावो : न वीचारी याती कुळ कांहीं ठांव : लागावया पाव संतांचें : ॥ २ ॥ बरे वर्म अलें आमचीया हाता : हींडावें

धुडांवें न लगतां : होये आवीनास साहाकार दातां : चत्रभुज संतां : परी धके : ॥ ४ ॥ तें वर्म आलें आमुचीया हाता : म्हणउनी शरण आलों संतां : **तुका** म्हणे पंढरीनाथा : न सोडी आंतां जीवेंसी : ॥ ५ ॥ छ ॥

नाट ५३१

सरीर दुषचें कोठार : सरीर रोगाचें भांडार : शरीर दुर्गंधीची थार : नाही अपवीत्र : शरीरा यैसे : ॥ १ ॥ शरीर उतम चांगलें : शरीर सुषाचे घोसुलें : शरीर सघे होये केले : शरीरे साधीले परब्रम्ह : ॥ २ ॥ शरीर वीटाळाचें आळें : शरीर मायामोहोपाशजाळें : पतन शरीराच्या मुळें : शरीर काळे व्यापीयेले : ॥ ३ ॥ शरीर सफळ हें सीध : शरीर नीधीचा हीं नीध : शरीरे तुटे भवबंद : वसे मध्यभागी देव शरीरा : ॥ ४ ॥ शरीर अवघ्याचा बांधा : शरीर आवगुणांचा राधा : शरीरी वसे बहुत बाधा : नाही सुधा गुण येक शरीरी : ॥ ५ ॥ शरीरा सुष नेदावा भोगा : नेदांवे दुष न करी त्याग : नव्हे वोषटे ना चांग : **तुका** म्हणे वेग हरीभजनी : ॥ ६ ॥ छ ॥ छ

नाट ५३२

सौसारसींधु हा दुस्तर : नुलंघे उलंघीतां पार : बहुतं वाहावीले दुर : न लगें तीरं पैल थडी : ॥ १ ॥ कीती काये जन्म जाला फेर : गणीत नाही जी दातारा : पडोलों आवर्ती भोंवरा : बहुतां थोरां : वळसीयांत : ॥ २ ॥ [ व. पृ. ११४ ] वाढलो परी नेणती बुधी : नाहीं परतली धरीली सुधी : मग म्या वीचारांवें कधी : यैसी हे संधी : सांडुनीयां : ॥ ३ ॥ आणीका षाणी आहार नीद्रा : भये मैथुनाचा ची थारा : बाळत्व तारुण्य आणी जरा : प्रधान पुरा भोग तेथे : ॥ ४ ॥ यैसीं उंलघुनी आलो स्थळें : बहु या भोवडीलो काळें : आतां हे उगवावें जाळे : उज्याडा बळे दीवसाच्या : ॥ ५ ॥ सांडीन या सौसराची वाट : बहु याने भोगवीलें कस्ट : दाषवी सत्या यैसें नस्ट : **तुका** म्हणे भ्रस्ट जालो देव दुऱ्हा : ॥ ६ ॥

नाट ५३३

चांगले नाम गोमटे रुप : नीवती डोळे हरतीं पाप : वाठल वीठल हा जप : प्रकट सल्प अती सार : ॥ १ ॥ शस्त्र हे नीर्वाणीचा बाणं : नीकट समयो अवसान : कोठे योजैल दसदान : षंडी नारायेन : दुष चींतनें : ॥२॥ सकळ सीस्टांचे हे मत : पावे सीधीं पावीते अनत : म्हणउनी होवे शरणागत :

आहे ते उचीत : येवढे ची : ॥ ३ ॥ म्हणउनी रुसोलो संवंसार : सर्प हा वीषार पांढरा : तुजसी अतर दातारा : याची दावेदारा : नीमीते : ॥४॥ याणे मज भोगवील्या षाणी : नसतां छदु लावीला मणी : माजलो मी माझे भ्रमणी जाली बोडणी वीटबना : ॥ ५ ॥ पावोलो केलीयाचा दड : षाणी भोगील्या उदड : आतां हा केला पाहीजे षंड : तुका म्हणे दंडवत घाली देवा : ॥६॥

नाट ५३४

श्रीअनंतां मदसुदना : पद्मनाभा नारायेना : जगव्यापका जनार्दना : आनंदघना : आवीनाशा : ॥ १ ॥ सकळां देवा आदीदेवा : कृपाळु वा जी केशवा : माहा माहा माहानुभावा : सदासीवा : सहजरुपा : ॥ २ ॥ चक्रधरा वीस्वंभरा : गरुडध्वजा करुणाकरा : सहस्त्रपादा सहस्त्रकरा : क्षीरसागरा शेश-सयेना : ॥ ३ ॥ कमळनयेना कमळापती : कामीनीमोहोना मदनमुर्ती : भवतारका धरीत्या क्षीती : वामनमुर्ती : त्रीवीक्रमा : ॥ ४ ॥ आगा ये सगुणा नीर्गुणा : जगजनीत्या जगजीवना : वसुदेवदेवकीनंदना : [ व. पृ. ११५ ] बाळरांगणा बाळकृस्णा : ॥ ५ ॥ तुका आला लोटांगणी : मज ठाव दयोवा जी चरणी : हे ची करी वीनवनी : भवबंधनी सोडवांवे : ॥६॥

नाट ५३५

न पवें सनीध वाटते चींतां : नुगवे पडत जातो गुंता : बरी या बहुतांचीं सता : कर्म बळीवंता : सांपडलो : ॥ १ ॥ बहु भार पडीयेला सीरी : मी हें माझे मजवरी : उघड्या नागवीलो चोरी : घरीचीया घरी : जाण-जाणतां : ॥ २ ॥ तुज मागणे ईतुलें अतां : मज या नीरवांवे संतां : जाला कंठस्फोट आळवीतां : उदास आतां न करावें : ॥ ३ ॥ आती हा नीकट समये : मग म्यें करांवें तें कांये : दीवस गेलीयां ठाकईल छाये : उरवील हाये : रातकाळी : ॥ ४ ॥ होईल सचीताची सता : आंगा येईल प्राधीनता : ॥ ठाव तो न दीसे लपतां : बहुत चीतां प्रवर्तली : ॥ ५ ॥ येसिया संकटाचे संधी : धांव घालावी कृपानीधी : आता : माझी तुका म्हणे बळ बुधी : सकळ सीधी : पाये तुझे : ॥ ६ ॥

धुर्वक ५३६

माझे मनोरथ पावलें सीधी : तंई पाई बुधी : स्थीरावली : ॥ १ ॥ समाधान जीव राहीला नीस्चळ : गेली हळहळ स्मरणे हे : ॥ २ ॥ त्रीवीध

तापाचें जालेसे दहन : सुषावले मन प्रेमसुषे : ॥ ३ ॥ माहा लाभ वाचे वसे पांडुरंग : आगांआंगी संग : अषंडीत : ॥ ४ ॥ जीवनाचा या जाला वोल्हावा अतरीं : वीस्व वीस्वंभरी सामांवलें : ॥ ५ ॥ तुका म्हणे माप भरी अलें सीग : धार बोळे गंगे : पुर वाहे ॥ ६ ॥ छ ॥

धुर्वक ५३७

आवीट हें क्षीर हरीकथा माउली : सेवीती सेवीली : वस्णव जन : ॥१॥ आमृत राहीले लाजोनी माघारें : येने रसे थोडें ब्रह्मानंदे : ॥२॥ पतीत पातकी पावन पगंती : ॥ चतुर्भुज होती देवा यैसे : ॥ ३ ॥ [व. पृ. ११६] सर्व सुषें तया मोहरती ठाया : जेथे या दाटणी वैसणवाची : ॥ ४ ॥ नीर्गुण हे सोग धरीले गुणवंत : धरुनीयां प्रीत गाये नाची : ॥ ५ ॥ तुका म्हणे केली साधने गाळंणी : सुलभ कीर्तनी होऊनी ठेला : ॥ ६ ॥ छ ॥

धुर्वक ५३८

हुंबरती गाई तयाकडे कान : कैवल्य नीधान : देउनी ठाके : ॥ १ ॥ गोपाळाची पुजा उचीस्ट कवळी : तेणे वणमाळी : सुषावला : ॥ २ ॥ चोरुणीयां षाये दुध दहीं लोनी : भावे चक्रपाणी गोवीयेला ॥ ३ ॥ नीह्काम तो जाला कामासीं लंपंट : गोपीकाची वाट पाहात बैसे : ॥ ४ ॥ जगदाणी ईछी तुळसी येक दळ : भावाचा सकळ : वीकीला तो : ॥ ५ ॥ तुका म्हणे हे चैतन्य सांवळे : व्यापंक नीराळे : परी असे : ॥ ६ ॥ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५३९

शब्दाची रत्नें केला अळंकार : तेणे वीस्वभर पुजीयेला : ॥ १ ॥ भावाचे उपचार करवीलें भोजन : तेणे नारायेन जेववीला : ॥ ३ ॥ संसारा हाती दील्हे आचवण : मुषंसुधी मन समर्पीले : ॥ ३ ॥ येकभाव दीप केला नीराजन : देउनी असन देहाचे या : ॥ ४ ॥ रंगली ईद्रीये सुरग तांबोळ : माथां तुळसीदळ : समर्पीले : ॥ ५ ॥ ना बोलोनी तुका करी चरणसेवा : नीजवीले देवा माजी घरी : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

धर्वक ५४०

देवाच्या प्रसादें करा रें भोजन : व्होल कोण कोण भाग्याचें तें : ॥१॥ ब्रह्मादीकांसी हे दुर्लभ उंचीस्ट : नका मानु वीट : ब्रह्मरसीं : ॥ २ ॥ अवघीयां पुरते वोसडलें पात्र : अधीकार सर्व सरवत्र आहे तेथे : ॥ ३ ॥ ईछा-

दानी येथें बोळला समर्थ : अवघे ची आर्त : पुरवी तो : ॥ ४ ॥ सरे यैसे येथे नाही कदा काळी : पुढीती वाटे कवळी : घ्यावी यैसे : ॥ ५ ॥ तुका म्हणे पाक लक्षमीच्या हातें : कामारी सागातें : नीरोपनी : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

श्रीधुर्वक ५४१

[व. पृ. ११७] जेवीलें संत ते मागन उस्टावळी : अवघ्या पत्रावळी : करुनीं झाडा : ॥ १ ॥ सोवळ्या वोवळ्या राहीलो नीराळा : पासुनी सकळा : अवघ्यां दुरी : ॥ २ ॥ पर परतें मज न लगें सागावें : हे तो बरे देवे सीकवीलें : ॥ ३ ॥ दुसरीया आम्ही : नाही आतळत : जानोणी सकेत : उभा असें : ॥४॥ येथे कोन्ही काही धरु नका संका : मज चाड येका : भोजनची : ॥ ५ ॥ लाकावला तुका मारीतसे झड : पुरवीले कोड नारायेणे : ॥ ६ ॥ छ॥

श्रीधुर्वक ५४२

नें कळे तें कळो येवील उगलें : नामें या वीठलें येकाचीया : ॥ १ ॥ न दीसे तें दीसों येईल उगले : नाम या वीठलें : येकाचीया : ॥ २ ॥ न भेटे ते भेटो येईल आपण : करीतां कीर्तन वीठोबाचें : ॥ ३ ॥ अलभे तो लाभ होईल आपार : नाम नीरंतर : म्हणतां वाचे : ॥ ४ ॥ तुका म्हणे अशेत्क जी सर्वभावें : तरती ती नामें : ॥ वीठोबाच्या : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५४३

सवसारसोहोळे भोगीतां सकळ : भग्तां त्याचे बळः वीठोबाचें : ॥ १ ॥ भये चीती धाक न मनीती मनी : भग्तां चक्रपानी सांभाळीत : ॥ २ ॥ पापपुन्ये त्यांचें धरु न सके आंग : भगतासी श्रीरंग सर्व भावें : ॥ ३ ॥ नव्हेती मुग्त अवडे संवंसार : देवभग्तां भार : सर्व वाहे : ॥ ४ ॥ तुका म्हणे देव भक्ता वेळावीत : भग्त ते नीस्वात त्याचीयाने : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

श्रीधुर्वक ५४४

देवासी अवतांर भत्कांसी संवंसार : [ व. पृ. ११८ ] दोहीचा वीचार येकपण : ॥ १ ॥ भत्कासी सोहोळे देवाच्या आंगें : देव त्यांच्या संगें : सुष भोगी : ॥ २ ॥ देवे भत्कां रुप दील्हासे आकार : भगती त्याचा पार : वाषाणीला : ॥ ३ ॥ येका आगें दोन्ही जाली ही णीर्मान : देवभग्तपण स्वामीसेवा ॥ ४ ॥ तुका म्हणे येथे नाही भीन भाव : भग्त तो ची देव : देव भत्क : ॥ ५ ॥ छ ॥

---

१ हा च अभंग लगे च पुढें पुन्हां असा च लिहिला असल्यामुळें येथें दुबार घेतला नाहीं.

धुर्वक ५४५

येसा माझा कोण आहे भीडभार : नावांचा मी फार वायां गेलों : ॥ १ ॥ काये सेवा रुजु आहे सताबळ : ते मज राउळ : क्रुपा करी : ॥ २ ॥ काये याती सुध आहे कुळकर्म : तेणे पडे वर्म : तुझें ठांई : ॥ ३ ॥ **तुका** म्हणे वांयां जालो भुमीभार : होईल वीचार : काये णेने : ॥ ५ ॥ छ ॥

धुर्वक ५४६

ईतुले करी देवा यैके हें वचन : समुळ अभीमान जाळी माझा : ॥ १॥ ईतुले करी देवा आईके × × × × सम द्रुस्टी तुज देंषें : ॥ २ ॥ ईतुले करी देवा ईनवीतो तुज : संतचरणरज : वंदी माथां : ॥ ३ ॥ ईतुले करी देवा यैके हे मात : न्हुदंई पंढरीनाथा : दीवसारात्री : ॥ ४ ॥ भलतया भावें तारी पंढरीनाथा : **तुका** म्हणे आतां : शरण आलो : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

ध्रुर्वक ५४७

तुझा दास यैसें म्हणती लोकपाळ : म्हणउनी साभाळ । करी माझा : ॥ १ ॥ अनाथांचा नाथा पतीतपावन : हें आतां जतन : करी नाम : ॥ २॥ माझे गुणदोश पाहातां न लगें अंत : यैसे माझे चीत मज गोही : ॥ ३ ॥ नेणें तुझी कैसी करावी हे सेवा : जाणसी तुं देवा : अंतरींचें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुं क्रुपेचा सींधु : तोडी भवबंधु माझा देवा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५४८

जाणावें तें काये नेणावें तें काये : ध्यावे तुझे पाये हें ची सार : ॥ १ ॥ करावें तें काये न करावें तें काये : ध्यावे तुझे पाये हेची सार : ॥ २ ॥ [ व. पृ. ११९ ] बोलावे तें काये नेबलांवे तें काये : ध्यावे तुझे पाये हे ची सार : ॥ ३ ॥ जावें तें कोठे नव जावें आंतां : बरवे अठवीतां नांमं तुझें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुं करीसी तें सोपे : पुन्यें होती पापें आमच्या मती : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५४९

नको ब्रह्मज्ञान अत्मतस्थीती भाव : मीं भक्त तुं देव : यैसें करी :॥ १॥ दावी रुप मज गोपीकारमना : ठेवीन चरणा : वरी माथा : ॥ २ ॥ पाहोनी श्रीमुष देईन आळीगण : जीवे नीवलोन : उतरीन : ॥ ३ ॥ पुसतां सांगैन हीतगुजमात : बैसोनी येकांत : सुषगोस्टी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे यासी न लवी उसीर : माझ आभ्यांतर जाणौनीयां : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५५०

साच काये मज कळों नये देवा : काये तुझी सेवा काये नव्हे : ॥ १ ॥ करावें तें बरे जनसमाधान : सेवावें हे वन : नोबलावें : ॥ २ ॥ शुध माझा भाव होईल तुझा पाई : तरी च हे देई नीवडुनी : ॥ ३ ॥ उचीत अनुचीत कळो आली गोस्टी : तुझे क्रुपाद्रुस्टी पांडुरंगा : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे मज पांयांसवे चाड : सांगसी तें गोड : आहे मज : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५५१

नाही कांटाळोलो परी वाटे भये : करावें ते काये : न कळतां : ॥ १ ॥ जन वन आम्हा समान ची जालें : काम क्रोध केले पावुटणी : ॥ २ ॥ शडउर्मी शत्रु जीतले अंनता : नांमांचीया सताबळें तुझ्या : ॥ ३ ॥ मुषे धर्म आम्हां सेवकाचा येसा : स्वांमी करीसी रसा पाळावी ते : ॥ ४ ॥ म्हणउनी **तुका** आवलोकुंणी पाये : वचणाची पाहे : वास येका : ॥ ५ ॥ छ ॥

धुर्वक ५५२

जे केली आळी ते अवघी गेली वांयां : उरला पंढरीराया श्रम माझा : ॥ १ ॥ काये समाधन केले कोणे येळें : कोणे माझे लळे पाळीयेलें ॥ २ ॥ आभास ही नाहीं स्वपनी दुच्हीता : प्रतक्षे बोलतां : ॥ कंईचा तो : ॥ ३ ॥ [ व. पृ. १२० ] आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा : भग्त येसे जगामाजी जालें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे आतां नाही भरवसा : मोकलीसी येसा वाटोतोसी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५५३

वायांवीन वाढवीला हा लोकीक : आणीला लटीक वाद दोघा : ॥ १ ॥ नाही ऐसा जाला देव माझ्या मतें : ॥ भुकेले जेवीतें काये जाणें : ॥ २ ॥ शब्दज्ञाणे गौरवीली हे वैषरी : साच ते आंतरी बीबे ची ना : ॥ ३ ॥ जांलो परदेसी गेलें दोन्ही ठाये : संवंसार ना पाये तुझे देवा : ॥ **तुका** म्हणे मागें कळो येतें येसें : नेघतो हे पीसे लाउनीयां : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५५४

मागे शरणागत तारीले बहुत : म्हणउनी दीनानाथ तुज देवा : ॥ १ ॥ पाहीले अपराध नाही याती कुळ : तारीला आजामेळ गणीका भीले : ॥ २ ॥ आढळ पदी बाळ बैसवीला धुरु : क्षीराचा सागरु उपमणी : ॥ ३ ॥ गज

ईद्र पसु पाडीये जळचर : भवसींधुपार उतरीलीं : ॥ ४ ॥ प्रल्हाद आग्नी राषीला जळांत : वीशाचें अम्रुत तुझा नामे : ॥ ५ ॥ पांडवां संकट पडतां जडभारीं : त्याचा तु कैवारी नारायेना : ॥६॥ तुका म्हणे तु अनाथांचा नाथ : आईकोणीया मात शरन आलो : ॥ ७ ॥ छ ॥

धुर्वक ५५५

तुझा शरणागत जालो मीं अकांत : करी माझे हीत पांडुरंगा : ॥ १ ॥ पतीतपावण तुझी ब्रीदावळी : ते आतां सांभाळी मायेबापा : ॥ २ ॥ आंनांथांचा नाथ बोलती संत : आईकोणी मात : वीस्वासलो ॥ ३ ॥ न करावी नीरास न धरावें उदास : देई याचाकास कृपादान : ॥ ४ ॥ तुका म्हणे मीं पातकांची रासी : देई पायांपासी ठाव देवा : ॥ ५ ॥ छ ॥

धुर्वक ५५६

[ व. पृ. १२१ ] सरवस्वाचा त्याग तो सदा सोवळा: न लीपे वीटाळा : आग्नी तैसा : ॥ १ ॥ सत्यवादी करीतां सवंसार सकळ : अलीप्त तो जळ : कमंळ तैसा : ॥ २ ॥ घडे ज्यां उपकार भुताची दया : आत्मंस्थीती तया आंगी वसें : ॥ ३ ॥ नोबले गुणंदोस : नाईके काणी : वर्तोनी तो जनी : जनार्दन : ॥ ४ ॥ तुका म्हणे वर्म जाणीतल्यावीण : पावे करीतां सींणं सांडीमांडी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५५७

चीती धरीन मी पाउलें सकुमार : सकळां बीढार संपतीचे : ॥ १ ॥ कंठी धरीन नाम अमृताची वली : होवील राहीली सीतळ तनुं : ॥ २ ॥ पाहेन श्रीमुष साजीरें सुंदर : ॥ सकळं आगर लावन्यांचा : ॥ ३ ॥ करीन अंगसंग बाळकाचे परी : बैसेंन तोवरी नुतरें कडीये : ॥ ४ ॥ तुका म्हणे हा केला तैसा होये : धरीली मंनें सोये वीठोबाची : ॥ ५ ॥ छ ॥

धुर्वक ५५८

न कळे तत्वग्यान मुढ माझी मती : परी ध्यातों चीतीं चरनकमळ : ॥ १ ॥ आगमांचे भेद मी काय जाणें : काळतो चीतने सारीतसें : ॥ २ ॥ कांही नेणें परी म्हंणवीतों दास : होईल त्याचा त्यास : आभीमाण : ॥ ३ ॥ संवसाराची सोये सांडीला मारग : दुरावीलें जग येका घाय : ॥ ४ ॥ मागीला लागाचे केलेसे षडणे : येकायेकी मंन राषीयेलें : ५ ॥ तुका म्हणे अगा रषुमादेवीवरा: आतां करुनां करा सांभाळावें : ॥ ६ ॥

धुर्वक ५५९

बाळ मातेपासीं सागें तान भुक : उपायाचे दुष काये जाणें : ॥ १ ॥ तयापरी करीं पाळण माझें : घेउनींयां वोझें : सकळ भार : ॥२॥ कासया गुणदोश आणीसी मंना : सर्व नारायेणां : आपराधी : ॥ ३ ॥ सेवाहीन दीन पातकांची रासी : आतां वीचारीसी काये येसें : ॥४॥ जेणें काळें पांई अनुसरलें चीत : नीर्धार हा हीत जाले येसा : ॥ ५ ॥ [व. पृ. १२२] तुका म्हणे तुम्ही तारीलें बहुतां । माझी कांहीं चीतां : असो देवा : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

धुर्वक ५६०

जीवनांवांचुन तळमळी मासा : प्रकार हा तैसा होतो जीवा : ॥ १ ॥ न संपडे जालें भुमीगत धन : चरफडी मन : तयापरी : ॥ २ ॥ मातेचा वीयोग जांलीयां बाळा : हातो कळवळा : जाणा देवा : ॥ ३ ॥ सागावे ते कीती तुम्हांसी प्रकार : सकळांचें सार पाये दावी : ॥ ४ ॥ ये ची चींते माझा करपला भीतर : कां नेणो वीसर पडीला देवा : ॥ ५ ॥ तुका म्हणें तुं हे जाणसी सकळ : यावरी कृपाळ : होई देवा: ॥ ६ ॥ छ ॥

धुर्वक ५६१

शरण आलें त्यासी नें दावी पाठी : आईका जगजेठी : वीज्ञापण :॥१॥ आळवी तयासी उतर झडकरी : द्यावे परीसा हारी : वीज्यापणा : ॥ २ ॥ गाजलीयाचें करावें धावणें : वीणती नारायन : परीसावी हे : ॥ ३ ॥ भागलीयाचा होये रे वीसांवा : परीसा पुरुशोतमा : वीज्ञापना : ॥ ४ ॥ अंकीतांचा भार वागवी मांथां : परीसावी अनांथा : वीज्ञापणा : ॥५॥ तुका म्हणे आम्हा वीसरावें ना देवा : परीसावी हे सेवा : वीज्ञापणा : ॥ ६ ॥ छ ॥

धुर्वक ५६२

कोण आम्हां पुसे भागले सीनलें : तुजवीण उगलें : पांडुरंगा : ॥ १ ॥ कोणापासी आम्ही सांगों सुषदुष : कोण तान भुक नीवारील : ॥ २ ॥ कोणं या तापाचा करील परीहार : उतरील भार : कोण दुजें : ॥ ३ ॥ कोणापे ईछेचे मागावें भातुके : कोण कवतुके बुझावील : ॥ ४ ॥ कोणावरी आम्ही करावी हे सता : होईल साहाता : कोण दुजा : ॥ ५ ॥ तुका म्हणे अगा स्वमी सर्व जाणा : दंडवत चरणां : तुमंच्या देवा : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

स्रवदा ५६३

आईका गाये भाई : स्रवंदा सागोतो काई : येथे नाडेल माये : दोघा पुत्राची : ते करीती तीची वीटंबणा : अवघ्या प्रसीध जणा : [व. पृ. १२३]

येक न मरीतां स्याहाणा : तो जाणा : सुष न पवे : ॥ १ ॥ आणीक आईका आईका गा ये : स्रवदा सांगोतो काये : षरे ची बोलें तो जाये : नरकामध्यें अधोगती: हें चौघाच्या मुषें : मनासी आनावें सुषें : आवघी चुकती दुषें : षोटे बोला नरनारी : ॥ २ ॥ आणीक नाडेंल येक जाण : स्रवदा बोलोतो वचन : जागें माझें चीत म्हणे उन : पडीलें षान : तया घरी : म्हणौउनी न म्हणे माझें काही : नीजी नीजा सुषे ठांई : येत्न होईल तै चोराठाई : ॥ वीस्वास : ॥३॥ आणीक येकीपरी : स्रवदा सांगोतो थोरी : दुष पावैल नारी : पतीव्रतयामध्ये : ॥ पांचानी दीधलें हाती : म्हणउन न मनावी नीस्चीती : परपुरुशी होये रती : सुष गती ते पावें : ॥ ४ ॥ अणीक येकी परी : स्रवदा सांगोतो तें करी : दाण देतां जो वारी : नव्हे नव्हे भला तो : **तुका** म्हणे आई : येंथें नांवं काई : सांगसी ते काई : मरो राडेचें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५६४ आभग ९

आलें भारा केणे : वेरझार चुके जेणे : ॥ १ ॥ धृ ॥ उभे केलें वीटेवरी : पेठ ईनामं पंढरी : ॥ छ ॥ वाहाती मारग : अवघे मोहोरलें जग : ॥ २ ॥ **तुका** म्हणे माप षरे : आणा माझें बाप : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५६५

लाभ षरा नये तुटी : नाही आडषळा भेटी : ॥ १ ॥ धृ ॥ जांये अबधीया देसा : येथे संचला च तैसा : ॥ छ ॥ न लगे पारषी : अवघी सकट सारीषी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वोळे : रुपे भुलया गोवी डोळे : ॥ ३ ॥

५६६

पाचारीतां पावें : यैसी ठाईची हे सवे : ॥ १ ॥ धृ ॥ बोले करुणां वचंणीं : करी कृपा लावी स्थीनी : ॥ छ ॥ जाणे कळवळा : भाव शुधीचा जीव्हाळा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नामे : मागमागें धावे प्रेमें : ॥ ३ ॥ छ ॥

५६७

लक्षीमीवलभा : दीनानाथा पद्मनाभा : ॥ १ [ व.पृ.१२४ ] धृ ॥ सुष वसे तुझा पांई : मज ठेवी ते च ठाई : ॥ छ ॥ माझी हे वासना : तुं ही उदारचा राना : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भोगे : पीडा केली धावं वेगे : ॥ ३ ॥

५६८

करी यैसा जागें : वेळोवेळा पायां लागें : ॥ १ ॥ धृ ॥ प्रमे झोंबें कंठी : देहे धरनीये लोटी : ॥ छ ॥ राहे लोकाचार : पडे अवघा वीसर : ॥ २॥ **तुका** म्हणे ध्यांवे : तुज वीभंचारभावें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५६९

टाळ दींडी हाती : वैकुंठींचे ते सांगाती : ॥ १ ॥ धृ ॥ जाल तरी कोण्ही जा गा : करा सीदोरी ते वेगा : ॥ छ ॥ जाती सादावीत : तेथे आसो द्यावें चीत : ॥ २ ॥ **तुका** म्हणे बोल : जाती बोलत वीठल :॥ ३ ॥

५७०

वायां जातों देवा : नेणें भग्ती करुं सेवा : ॥ १ ॥ धृ ॥ आतां जोडुनीयां हात :उभा राहीलों नीवांत : ॥ छ ॥ करावे तें काये : न कळे अवलोकीतो पाये : ॥ २ ॥ **तुका** म्हणे दान : केले पद्री घेईन : ॥ ३ ॥

५७१

बैसो पाठमोरी : मना वाटे तैसी फेरी : ॥ १ ॥ धृ ॥ परी तुं जाणसी अत्रडी : बाळां बहुनाची प्रवडी : ॥ छ ॥ आपलाल्या ईछा : मागो जया छंद जैसा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आई : नव्हसी उदस वीठावी : ॥ ३ ॥

५७२

वीस्वंभरा वोळें : बहुत कान हात डोळे : ॥ १ ॥ धृ ॥ जेथे असे तेथे देषे : मागीतलें ते आईके : ॥ छ ॥ जे जे वाटे गोड : तैसी पुरवीते कोडे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भेटी : कांही पडों नेंदी तुटी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५७३

वीठल नामाचा नाही ज्या वीस्वास : तो वसें उदास नरकामधी : ॥ १ ॥ तयासीं बोलतां होइंल वीटाळ : न वजे तो जळस्नान करीतां : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मज वीठलाची आन : जरी प्रतीवचण : करीन त्यासी : ॥ ३ ॥

५७४

जया घडले सकळ नेम : मुषी वीठलाचें नाम : ॥१॥ धृ॥ काही न लगे सीणावें : आणीक वेगळीया भावे : ॥ [ व. पृ. १२५ ] वाचे उच्चारावें रामकृस्ण गोवीदा : ॥ छ ॥ फळे पावैल आवलीळा : भोगी वैकुंठ सोहोळा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे त्याच्या नामे : तो ची होईजे स्वभावें : ॥ ३ ॥

५७५

पुराणप्रसीध हे सीमा : नांमंतारकमंहीमा : ॥ १ ॥ धृ ॥ मागें जाळी माहादोश : पुढें नाहीं गर्भवासी : ॥ छ ॥ जे नीदीलें शास्त्रे : वंद्यचे जालें नामामात्रें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे ग्रैसा : त्रीभुनी तुझा ठासा : ॥ ३ ॥

५७६

नाम घेतां न लगे मोल : नाममंत्र नाही षोल : ॥ १ ॥ धृ ॥ दोनी आक्षेराचें काम : उचारीतां रामराम : ॥ छ ॥ नाही वर्णा धर्म याती : नामी अवघी च सरती : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नाम : चैतन्ये नोजधाम : ॥ ३ ॥

५७७

नाम घेतां वांयां गेला : यैसा कोण अईकीला : ॥ १ ॥ धृ ॥ सांगा वीनवीतों तुम्हांसी : संत मंत सीध रुसी : ॥ छ ॥ नामे तरला नाही कोन्ही : यैसा द्योवा नीवडुनी : ॥२॥ सलगीच्या उतरा : **तुकां** म्हणे क्षेमा करा : ॥ ३॥

५८८

जीव षादला देवतें माझा येणे माहा भुतें : झोंबीनलें नीरुतें काही करीतां न सुटे : ॥ १ ॥ धृ ॥ आतां करुं काये न चले करीतां उपाये : तुम्हां आम्हा सये वीघडावी घडी केली : ॥ छ ॥ बोलतां द्रुस्चीती : मी वो पडीयेलें भ्रांती : आठव हा चीती : न ये म्हणतां मी माझे : ॥ २ ॥ भले तें ची चावळे : जाणा अवघीयां वेगळें : नाठवती बाळें : अपपर सारीषें : ॥३॥ नका बोलो सये मज वचन न साहें : बैसाल त्या राहे : उग्या वाचा षुंटुणी : ॥ ४ ॥ तुम्हां आम्हां भेटी : नाही जाली जीवें साटी : **तुका** म्हणे द्रुस्टी : पाहा आहे जवळी तों : ॥ ५ ॥ छ ॥

५७९

फुकाचें तें लुटा सार : व्होरे अभार सदेवं : ॥ १ ॥ धृ ॥ पुढती नांही गर्भवास : जळती दोशडोंगर : ॥ छ ॥ उदंड भावें उदड घ्यावें : नामं गावें अवडी : ॥ २ ॥ [ व. पृ. १२६ ] **तुका** म्हणे घरीच्या घरी : देशा उरी नसी जो ॥ ३ ॥

५८०

जीवाचा जीव्हाळा : पाहो आपलीये डोळा : ॥ १ ॥ धृ ॥ आंम्हां वीठल येक देव : येर अवघें चीं वाव : ॥ छ ॥ पुंडलीकच्ये पाठीं : उभा हात ठेउनी कटी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे चीती : वाहों रषुमावीचा पती : ॥३॥

५८१

माझें अराधन : पंढरपुरीचें नीधान : ॥ १ ॥ धृ ॥ तया येकावीण दुजे : काही नेंणें पंढरीराजे ॥ छ ॥ दास वीठलाचा : अकीत अकीला ठाईचा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आतां : नव्हे पालट सर्वथा : ॥ ३ ॥ छ ॥

५८२

आतां आम्हां हें ची कांम : वाचे गावें तुझें नाम : वावोनीयां टाळी प्रेम-सुषें नाचावें : ॥ १ ॥ धृ ॥ अवघी जाली आरातुक : मागें पुढें सकळीक : त्रीपुटीचें दुष प्रारलब्ध सारीलें : ॥ छ ॥ गोदातटे नीर्मळें : देवदेवांची देवाळे : संतमंतां मेळे : दीस जाये सुषाचा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे पंढरीनाथा : आणीक नाही मज चींतां : योगक्षेम माथां : तुझे भार घातला : ॥ ३ ॥

५८३

काही च नव्हे मी कोणीये गावींचा : येकटु ठावीचा ठांई येकु : ॥ १ ॥ जात नाही कोठें येत फीरोणीयां : अवघें ची वा(या)वीण बोल : ॥ २ ॥ ज्यांवें नाही आम्हां मरांवें लागत : आहो अषडीत जैसे तैसें : ॥ ३ ॥ नाही मज कोन्ही आपलें दुसरें : कोन्हांचा मी षरें काहीं नव्हे : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे नामं रुप नाही आम्हां वेगळा या कर्मा : अकर्मासी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५८४

मृगजळा काये करावा उतारु : पावावया पारु पैलथडी : ॥ १ ॥ षाप-राचे होन षेळती लेंकुरें : कोण त्या वेव्हारें लाभ हाणी : ॥ २ ॥ मगळदा-येके करीती कुमांरी : काये त्याची षरी सोईरीक : ॥ ३ ॥ स्वपणी जे सुषदुष जालें कांहीं : जागुती तो नाही साच भाव : ॥ ४ ॥ सारी ज्याली मेली लटीकें वचन : बंधमुग्त सीण **तुका** म्हणे : ॥ ५ ॥

५८५

[ व. पृ. १२७ ] भुतदयाप्ररत्वें जया तया परी : संत नमस्कारी सर्व भावे : ॥ १ ॥ सीकल्यां बोलांचा धरीसी ताठा : तरी जासी वाटा येमपंथें : छ ॥ हीरा परीस मोहोरा आणीक पास्याण : नव्हे परा जन संतां तैसी ॥२॥ सरीता वाहाळा गंगें सागरा समान : लेषी तयाहुन अधम नाहीं : ॥ २ ॥ आणीक अमुप होती तारांगणें : रवीससी मानें लेषु नये : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे नाही नमरता ( = नम्रता ) आंगी : नव्हे ते फीरंगी कठीण लोहो : ॥ ५ ॥ छ ॥

५८६

माझें म्हणतां याला का रे नाहीं लाज : कन्यापुत्र भाज ग्रह वीत : ॥ १ ॥ कोन्ही सोडवीणा काळाचे हतीचें : येकावीण साचे नारायेणा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे कीती सांगांवें चाडाळा : नेणे जीवकळा कोन्या जीतो : ॥ ३ ॥

५८७

आणीक कांही नावडे मज मात : येका पंढरीनाथा वाचुनीयां : ॥ १ ॥ त्याची च कथा अवडे कीर्तन : ते मज स्रवण गोडी लागें : ॥ २ ॥ तुका म्हणे संत म्हणोत भलते : वीठला परतें न मनी कांहीं : ॥ ३ ॥ छ ॥

५८८

वीठल सोवीरा सजन सांगांती : वीठल ये चीती बैसलासे : ॥ १ ॥ वीठलें आंग व्यापीली कायां : वीठल हे छाया माझी मज : ॥२॥ बैसला वीठल जीव्हेचीये माथां : न वदे ते अनेथा : आणीक दुजे : ॥ ३ ॥ सकळा ईद्रीयां मन येक प्रमान : ते ही करी ध्यान वीठोबाचे : ॥ ४ ॥ तुका म्हणे या वीठाबासी आतां : न ये वीसरतां माझें मज : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

५८९

तुजवीण वाणी आणीकांची थोरी : तरी माझी हरी जीब झडो : ॥ १ ॥ तुजवीन चींता अवडे आणीक : तरी हा मस्तक भंगो माझें : ॥ २ ॥ [ व. पृ. १२८ ] नेत्री आणीकांसी पाहेन अवडी : जात ते ची घडी चांडळ हे : ॥ ३ ॥ कथा अमृतपान नेघती श्रवण : काये प्रयोजन यांचे मग : ॥ ४ ॥ तुका म्हणे काये वांचोनी कारण : तुज येक क्षीण वीसंभतां : ॥ ५ ॥

५९०

गढी गेले रडी : कान्हो नेंदीस तुं चढी : ॥ १ ॥ धृ ॥ आंम्ही नेषळों आम्ही नेषळो : आला भाव तुझा कळो : ॥ छ ॥ न साहावे भार : बहु लागोतोसी जर : ॥ २ ॥ तुका आला रागें : येऊं नींदी मागमागें : ॥ ३ ॥ ॥ छ ॥

५९१

आंधळ्यासी जन अवघे ची आंधळें : ॥ आपणासी डोळे द्रुस्टी नाहीं : ॥ १ ॥ रोग्या वीशतुल्ये लागे मीस्टाण : तोंडासी कारण चवी नाही : ॥ २ ॥ तुका म्हणे सुध नाही जो अपण : तया त्रीभुवन अवघे षोटें : ॥ ३ ॥ छ ॥

५९२

चोरटे सुनें मारीले टाळें : केंउं करी परी न सडी चाळें : ॥ १ ॥ धृ ॥ यैसे येक दुराचारी गा देवा : आपलीया जीवा घात करी : ॥ छ ॥ नाक गेलें तऱ्ही लाज ना वीचार : हीडे फजीतषोर दारोदारी : ॥ २ ॥ तुका म्हणे कर्म बळींवंत गाढे : नेदी तया पुढे मार्गे सरो : ॥ ३ ॥ छ ॥

५९३

ठेवा जाणीवा गुडुण : येथे भाव ची प्रमाण ॥ १ ॥ धृ ॥ येका अनुसरल्यां काज : अवघे जाणे पंढरीराज : ॥ छ ॥ तर्कवीतर्कासी : ठाव न ळगे सायासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे भावेंवीण : अवघा बोलती तो सीण : ॥ ३ ॥ छ ॥

५९४

आम्हासी नाही आणीक प्रमाण : नामासी कारण वीठोबच्या : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ घालुनीयां कास करीतो कैवाड : कळी काळासी आड वागो नेदु : ॥ छ ॥ अवध वांकडें जैसें परी वाचे हरी हरी उचारण : । ॥ २ ॥ **तुका** म्हणे आम्हां सापडलें नीज : सकळ ही बीज पुराणाचें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५९५

[व. पृ. १२९] आम्हा आळंकार मुद्राचें श्रीघार : तुळसीचे हार वांहों कंठी : ॥ १ ॥ धृ ॥ लाडीके डींगर पंढरींरायाचे : नीरतर वाचें नामघोश : ॥ छ ॥ आम्हां अणीकांची चाड ची नाही : ॥ सर्व सुष पाई वीठोबाचां : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आम्ही न घो या मुग्ती : येकावीन चीती नाही दुजे : ॥ ३ ॥ छ ॥ ६

५९६

मुनी मुग्त जाले भेणे गर्भवासा : आम्हां वीस्णुंदासा सुलभ तो : ॥१॥ धृ ॥ अवघा ची संवसार केला ब्रह्म रुप : ॥ वीठल स्वरुप म्हणौनीयां : ॥ छ॥ पुरानी उपदेश साधने उदघाट : आम्हां सोपी वाट वैकुंठींची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जनां सकळां सहीत : घेऊं आषंडीत प्रेमसुष : ॥ ३ ॥ छ ॥

५९७

न करावी स्तुती : माझी संतजनी : होईल या व(च)नी आभीमान : ॥ १ ॥ भारे भवनदी नुतरवे पार : दुरावती दुर तुमचे पाये : ॥ २ ॥ **तुका** म्हणे गर्व पुरवीली पाठी : होये माझ्या तुटी वीठोबासी : ॥ ३ ॥

५९८

तुमंचीये दासीचा दास करुनी ठेवा : आसीर्वाद द्यावा : हा ची मज : ॥ १ ॥ नववीधा कांही बोलीली जे भग्ती : घ्यावी माझा हातीं संत-जनी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे तुमच्या पायांच्या आधारें : उतरन षरें भवनदी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

५९९

चोर टेंकाचें नीघालें चोरी : आपलें तैसे पारीषें घरी : ॥ १ ॥ धृ ॥ नाही नफा नागवे आपण गमावीलें कान हात पाये : ॥ छ ॥ बुधीहीन णये कांही च कारणा : तयासवे जाणा ते ची सुष : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नाही ठाउकें वरम : तयासी करमं वोडवलें : ॥ ३ ॥ छ ॥

६००

छळीं वीस्णुदासा कोन्हीं : त्याची अमंगळवाणी : ॥ १ ॥ धृ ॥ येउं नेंदावा समोर : अभागी तो दुराचार : ॥ छ ॥ नावडे हरीकथा : त्याची वीभचारीन माता : ॥ २ ॥ **तुका** म्हणे याती : भ्रस्ट तयाची हे मती : ॥३॥

६०१

[ व. पृ. १३० ] बोलवीसी तैसें आणी अनुभवा : नाही तरी देवा वीटंबना : ॥ १ ॥ मी ठेवीन काये करांवे मीस्टाण : सेव्य जीवेवीन स्नीघारीलें : ॥२॥ संपादणी वीण वीटबीलें सोंगं गुणवीन चांग : रुप हीण : ॥ ३ ॥ कन्यांपुत्रेंवीण मंगळदायेकें : वेचीलें हे फीकें द्रव्य तऱ्ही : ॥ **तुका** म्हणे तैसी होते मजपरी : नेदषें अतरी प्रेमभाव : ॥ ५ ॥ छ ॥

६०२

सामर्थाचें बाळ कीवीलवाणे दीसें : तरी कोण हांसें जन देवा : ॥ १ ॥ अवगुणी जऱ्ही जालें तें वोंगंळ : करावा सांभाळ लागें त्याचा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे तैसा मीं येक पतीत : परी मुद्रांकीत : जालो तुझा : ॥ ३ ॥

६०३

यमुनेतटी माडीला खेळ : म्हणे गोपाळ गडीयांसी : ॥ १ ॥ धृ ॥ हाल मांडा हाल मांडं : वांवगी साडा : मोकळी : ॥ छ ॥ नांवे ठेउनी वाटा गडी : न वर्जे रडी मग कोन्ही : ॥२॥ **तुका** म्हणे कान्हो तीळ्यातादळ्या : जीके तो करी आपला षेळ्या : ॥ ३ ॥ छ ॥

६०४

बळे डाई न पडे हरी : बुधी करी स्याहाणां तो : ॥ १ ॥ मोकळे देवा षेळो यावें : समभावें सांपडावा : ॥ छ ॥ येतो जातो येळोंवेळा : न कळे कळा सांपडती : ॥२॥ **तुका** म्हणे धरा ठाईचा ठाई : मीठी जीवे पावी घालुनीयां : ॥३॥

६०५

गाढवाचे आंगीं चंदनाची उटी : राषे तया त्याणे केलीसे भेटी : ॥ १ ॥ धृ ॥ सहज गुण जयाचे देही : पालट काही : नव्हे तया : ॥ छ ॥ मांकडाचे गळां मोलाचा मणी : घातला चाउनी टाकी थुकुणी : ॥ २ ॥ तुका म्हणे षळा नावडे हीत : आवद्या वाढवी अपलें मत : ॥ ३ ॥ छ ॥

६०६

आंगी जर तया नावडे साखर : जाणतो वीतर गोड जाणें : ॥ १ ॥ धृ ॥ येकाचे तो तोंडीली माती : आवघे खाती पोटभरी : ॥ छ ॥ [ व. पृ. १३१ ] चारीतां बळे येतसे दांती : मागोण घेती भाग्येवंत : ॥ २॥ तुका म्हणे संचीत बरें : तयासी दुसरें काय सागें : ॥ ३ ॥ छ ॥

६०७

नेणे सुणे चोर पाहुणा मागता : देषोन भलता भुंकतसे : ॥ १ ॥ धृ ॥ सीकवीलें काही न चलें तया : बोलीयेलें या बोला जाती : ॥ छ ॥ क्षीर वोकुणीयां षाये अंमगळ : अपली ते ढाळ जावो नेंदी ॥ २ ॥ बंदुं नींदुं काये नेणें दुराचार : षळाचा वीचार तुका म्हणे : ॥ ३ ॥ छ ॥

६०८

जन मानवीलें वरी बाह्याकारी : तैसा मी अंतरीं नाही जालों : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ म्हणउनी पंढरींनांथा : वाटतसे चीतां : प्रगट बोलतां लाज वाटे : ॥ छ ॥ संत ब्रम्हंरुप जाले अवघें जन : ते माझे अवगुण नेदषती : ॥ २ ॥ तुका म्हणे मी तों आपणासी ठावा : आहें बरा देवा जैसा तैसा : ॥ ३ ॥ छ ॥

६०९

काम क्रोध माझे जीताती शरीरी : ॥ कोंवळें तें वरी बोलतसें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ कैसा सरता जालो तुझा पांई : पांडुरंगा काहीं न कळे हें : ॥ छ ॥ पुराणाची गोही वदतील संत : तैसें नाहीं चीत सुध जालें : ॥ २ ॥ तुका म्हणे मज आणुनी अनुभवा : दाषवीं हें देवा साच षरें : ॥ ३ ॥ छ ॥

६१०

धीग जीणे तो बाईलें अध्यान : परलोक माना ही दोन्ही : ॥ १ ॥ धृ ॥ धीग जीणे त्याचें लोभावरी मन : न घडे पुजन भक्ती त्यासी : ॥ २ ॥ धीग जीणे अळस नीद्र जया फार : अमीत अहार आघोरीया : ॥ ३ ॥ धीग जीणे नाही वीवेक वैराग्या : झुरे मानालागी साधुपणें : ॥ ४ ॥ तुका म्हणे धीग यैसे जालें लोक : नीदक वादक नरका जाती : ॥ ५ ॥ छ ॥

६११

आठवे देव तो करावा उपाव : येर तेजी वाव षटपटा : ॥ १ ॥ धृ ॥ होई जागा होई जागा : वाउगा कां गा सीणसी : ॥ ल : ॥ छ ॥ [ व. पृ. १३२ ] जाणीवच्या भारे भवाचे डोही : बुडसी तो कही नीघसी ना : ॥ २॥ तुका म्हणे देवा पावसी भावें : जाणतां ठांवें कांही नव्हें : ॥ ३ ॥ छ ॥

६१२ पावीक अभंग १०

पाईकपणे जातीला सधीांत : सुरे धीर मात वचन चीती : ॥ १ ॥ पाईकीवांचुन नव्हे कांही सुष : प्रजामध्ये दुष न सरे पीडा : ॥ २ ॥ तरी होवे पाईक जीवाचा उदार : सकळ त्याचा भार स्वामी वाहें : ॥ ३ ॥ पाईकीचें सुष जयां नाही ठावे : धीग त्याणी ज्योवे : वायांवीण : ॥ ४ ॥ तुका म्हणे येका क्षीणाचा करार : पाईक अपार सुष भोगी : ॥ ५ छ ॥ १

६१३

पाईकीचें सुष पाईकांसी ठांवें : म्हणौनीयां जीवे केली साटी : ॥ १ ॥ येतां गोळ्या बाण साहीलें भढमार : वरसतां आपार : व्रुस्टी वरी : ॥ २ ॥ स्वामीपुढें होंवें पडतां भाडण : मागें त्या मडण सोभा द्यावी : ॥ ३ ॥ पाईकाणी सुष भोगीले आपार : सुध आणी धीर अंतबाही : ॥ ४ ॥ तुका म्हणे या सीधांतच्या षुणा : जाणोतो स्याहाणा : करीतां भोगी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ २

६१४

पाईक तो जाणे पाईकीचा भाव : लागपगें ठाव चोरवाटा : ॥१॥ आपणा राषोण ठकावे अणीक : घ्यावें सकळीक हरुनीयां : ॥ २ ॥ येउ नेंदी लाग लागो नेदी माग : पाईका त्या जग स्वामी मानी : ॥ ३ ॥ यैसे जन केलें पाइके पावीक : जया कोन्ही भींक न घलीती : ॥ ४ ॥ तुका म्हणे यैसे जयाचे पावीक : बळीया तो नाइंक : त्रीलोकीचा : ॥ ५ ॥ छ ॥ ३

६१५

पाईकाणी पंथ चालवील्या वाटा : पारीष्यांचां साटा मोडुनीयां : ॥ १ ॥ पारी(स्ती)ये ठाई घेउनीयां षाण : आपले तें जण राषीयेलें : ॥२॥ आधारें वीणे जें बोलतां चावळें : आपलें तें कळे नव्हे यैसें : ॥ ३ ॥ सांडीतां मारग मारीती पावीक : आणीकासी सीक लागवया : ॥४॥ तुका म्हणे वीस्वा घेउनी वस्विास : पाईक तयांस सुष देती : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ ४

६१६

[व. पृ. १३३] पाईक तो प्रजा राषोनीयां कुळ : पारषीयां मुळ छेदी दुस्टां : ॥ १ ॥ तो येक पाईक पाईकां नाईक : भाव सकळीक स्वामीकाजी : ॥ २ ॥ त्रुवंत तन सोनं ज्या पास्याण : पाईक त्यां भीन : नाही स्वामी : ॥ ३ ॥ बीस्वासावांचुण पाईकासी मोल : नाही मीथ्या बोल बोलीलीयां : ॥४॥ तुका म्हणे न ये स्वमी उनेपन : पाईका जतन करी त्यासी : ॥ ५ ॥ छ ॥५

६१७

धणी ज्या पाईका मानीतो अपण : तया भीते जन सकळीक : ॥ १ ॥ जीवाचे उदार सोभती पावीक : मीरवीती नाईक : मुगटमणी : ॥ २ ॥ आपलीया सता स्वामीचे वैभव : भोगीती गौरव : सकळ सुषें : ॥ ३ ॥ कमाईचीं हीन पडीली उदड : नाही तंयां षंड : येती जाती : ॥ ४ ॥ तुका म्हणे तऱ्ही पांईकी च भली : थोडी बहु केली स्वामीसेवा : ॥ ५ ॥ छ ॥ ६

६१८

पाईकपणें षरा मुशारा : पाईक तो षरा पाईकीणें : ॥ १ ॥ पाईक जाणे मारीतें अंग : पाईकां भंग नाहीं तया : ॥ २ ॥ येके दोही घरी घेतले षाण : पाईकपणे तो नीवडला : ॥ ३ ॥ करुनी कारण स्वामी येस यांवें : ॥ पाईक त्या नावे षरेपण : ॥ ४ ॥ तुका म्हणे ठाव पाईकां नीराळा : नाही स्वामी स्थळां : ग्याल्यावीण : ॥ ५ ॥ ७

६१९

उच नीच कैसी पाईकांची वोळी : कोण गांढें बळी नीवडलें : ॥ १ ॥ स्वामीकाजी येक सर्वस्वें तत्तर : येक ते कुचर आसाबध : ॥ २ ॥ प्रसंगावांचुनी आणीती युर्भाव : पाईक तो नावं : मीरवी वांयां : ॥ ३ ॥ गणतीचे यक उच नींच फार : तयामध्ये सुर : वीराळा थोडे : ॥ ४ ॥ तुका म्हणे स्वामी जाणे त्याचा मान : पाईक पाहोन मोल करी : ॥ ५ ॥ छ ॥

६२०

येका च स्वामीचे पाईक सकळ : जैसें बळ तैसें मोल : तयां : ॥ १ ॥ स्वामीपदी येकां ठाव उंचं स्थळी : येक ती नीराळी जवळी दुरी : ॥ २ ॥ हीन कमाईचा हीण आनं ठाव : उंचा सर्व भाव उचपद : ॥ ३ ॥ पाईकपणें तो सर्वत्र सरता : चांग तऱ्ही परता गाढ्या ठाव : ॥ ४ ॥ तुका म्हणे मरण आहे यां सकळां : भेणें अवकळा : आभये मोल : ॥ ५ ॥ ९

६२१

प्रजी तो पाईक वोळींचा नाईक : पोटासाटीं येक जैसी तैसी : ॥ १ ॥ [ व. पृ. १३४ ] आगळें पाउल आणीकासी तरी : पळती माघारी तोंडी-जती : ॥ २ ॥ पाठीवरी घाये म्हणती फटसर : धडा आंगे सुर मान पावें : ॥ ३ ॥ घेईल दरवडा देहा तो पाईक : मारी सकळीक सर्व हरी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे नव्हे बोलाचे कारण : कमावीचा पण सीधी पावें : ॥ ५ ॥ छ ॥ १०

६२२

बुधीचा पालट्टु धरा रे कांही : मागुतां हा नाही मनुस्यदेहें : ॥ १ ॥ आपल्या हीताचे नव्हती सायास : ग्रहद्वारा आस : धन वीतें : ॥ २ ॥ अवचीते नीधान लागले हाती : भोगुणी वीपती गर्भवास : ॥ ३ ॥ यावे जावें पुढे यैसें ची कारण : भोगावें पतन गर्भवासं : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे धरी आठउ या देहीं : नाही तरी कांही बरें नव्हे : ॥ ५ ॥ छ ॥

६२३

अरे हें देह वेर्थ जावें : यैसें जरी तुज होवें : जुत कर्म मनोभावें : सारीपाट षेळतां : ॥ १ ॥ धृ ॥ मग कैंचे हरीचे णाम : नीजेलीयां जागा राम : जन्मोजन्मींचा आधम : दुष थोर साधीले : ॥ छ ॥ वीशयेसुषाचा लपट्ट : दासीगमंनीं अती धीट्टु : तया ते ची वाट : अधोगती जावया : ॥२॥ आणीक येक कोड : नरका जावयाची चाड : तरी च संतनींदा गोड : करी कौतुकें सदा : ॥ ३ ॥ **तुका** म्हणे यैसें मना लावी रामपीसें : ॥ नाही तरी आलीया सायासे : फुकट जासी ठकोणी : ॥ ४ ॥ छ ॥

६२४

अवघें ब्रम्हरुप नाही रीता ठाव : प्रतीमा तो देव कैसा नव्हे : ॥ १ ॥ नाही भाव तया सांगावें कीती : आपलाली मती पाशांडीयां : ॥ जया भावे संत बोलीलें वचन : नाही अनमोदन शांब्दीकांसी : ॥ ३ ॥ **तुका** म्हणे संती भाव केला बळी : न कळतां षळी दुसीला देव : ॥ ४ ॥ छ ॥

६२५

आम्ही पतीतानी घालावें साकडें : तुम्हां लागें कोडें उगवें : ॥ १ : अच्चरतां दोश न घरुं साभाळ : नीवारउं काळ : तुम्हां हातीं : ॥ २ ॥ नेघतां कवडी करावा कुढावा : पाचारीतां देवा नांमासाटीं : ॥ ३ ॥ दयासींधु नाम पतीतपावन : हें ची आम्हां वचन : सांपडलें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे करुं अन्यायाच्या कोटी : कृपावंतां पोटी : तु ची देवा : ॥ ५ ॥ छ ॥

६२६

[व.पृ.१३५] शास्त्राचें सार वेदाची मुर्ती : तो माझा सांगाती प्राणसषा ॥ १ ॥ ध्रु ॥ म्हणउनी नांही आणीकाचा पांग : सर्व जालें साग नाम येक : ॥ छ ॥ सगुण नीर्गुन ही जयाची आगें : तो ची आम्हांसंगें : क्रीडा करी : ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हीं वीधीचे जनीतें स्वयंभ आईते केलें नव्हों : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

६२७

जो भत्काचा वीसांवा : उभा पाचारीतो धांवां : ॥ १ ॥ हातीं प्रेमाचें भातुकें : मुषीं घाली कवतुके : भवसींधु सुषें उतरी कासे लाउनीयां : ॥ छ ॥ थोरी भत्कांची आस : पाहे भोंवंतांली वास : ॥ २ ॥ तुका म्हणे कुपादाणी : फेडी आ(व)ढीची धणी : ॥ ३ ॥

६२८

आईका महीमा आवडीची : बोरें षाये भीलठीची : ॥ १ ॥ ध्रु ॥ थोर प्रेमाचा भुकेला : हा चीडुकोळ तयाला : आस्टामासी धीला : न मनी क्षीरसागरा : ॥ छ ॥ पव्हे सुदांम देवाची : फके मारी कोरडें ची : ॥ २ ॥ न म्हणे उचीस्ट आथवा थोडें : तुका म्हणे भत्कीपुढें : ॥ ३ ॥ छ ॥

६२९

अषंड तुझी जया प्रीती : मज दे त्याची संगती : मग कमळापती : तुज नानी कांटाळा : ॥ १ ॥ ध्रु ॥ पडोन राहेन तें ठाई : उगा ची संताचीये पाई : न मगें न करी काहीं : तुझी आण वीठला : ॥ छ ॥ तुम्ही आम्हीं पीडों जयाणें : दोन्हीं नीवारती येकाणें : बैसोलों धरणें : हाका देत दारेसी : ॥ २ ॥ तुका म्हणे या बोला : चीत देवी गा वीठला : न पाहीजे केला : अवघा माझा अव्हेरु : ॥ ३ ॥ छ ॥

६३०

कोणे तुझा सांग केला आंगीकारु : नीस्चींती तों थोरी मानीयेली : ॥ १ ॥ कोणे यैसा तुज उपदेश केला : नको या वीठला शरण जांवं : ॥२॥ तेव्हां तुज कोण घालील पाठीसीं : घासेल भुमीसी वद[1] वें येम : ॥ ३ ॥

---

१ व ज्यास्ती पडला आहे.

का रे नागवसी आयुस्य खातो काळ : दीसेदीस बळ क्षीण होतें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे यास सांगा कोन्ही तऱ्ही : वीसरला हरी मायेबापा : ॥ ५ ॥ छ ॥

६३१

[ व. पृ. १३६ ] साधुन बचनाग पातील तोळा : आणीकां तो डोळा पाहावेणा : ॥ १ ॥ साधुन भुजंग धरीतील हाती : आणीके कांपती देषोनीयां : ॥ २ ॥ न साहे तें साहे करीतां सायास : कारण अभ्यास **तुका म्हणें** : ॥ ३ ॥ छ ॥

६३२

आमंचे गोसावीं आयाचीत वृती : करवी सीस्याहातीं उपदेश : ॥ १ ॥ दगडांचीं नांवें तीं आधी च जड : ते काये दगड तारु जाणे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वेश वीटंबीला त्यांणीं : सोंग सपादणी : करीती परी : ॥ ३ ॥ छ ॥

६३३

सरळी हीं नामे उचारावी सदा : हरी बा गोवीदा : रामा कुस्णां : ॥ १ ॥ पुन्ये पर्वकाळा तीर्थी ही सकळ : कथा सीधुजळ : नाहो येती : ॥ २ ॥ अवघ ची लाभ बैसलीयां घरा : येती भेंव धरा येके ठाईं : ॥ ३ ॥ सेळ्या मेंढ्या गाई : सेवा घेती म्हैसी कामधेनु तैसी नव्हे येकी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे सुषे पावीजे अनता : हे वर्म जाणंतां सुलभ ची : ॥ ५ ॥

६३४

पुनीत केलें वीस्णुदासी : सर्गे आपलीया दोसी : ॥ १ ॥ ध्रु ॥ कोण पाहे तयांकडे : वीर वीठलाचे गाढे : आसुभ त्यापुढें : शुभ होउनी ठाके : ॥ छ ॥ प्रेमसुषाचीया रासी : पाप नाही वोषदासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे त्याणी : केली वैकुंठ मेदीनी : ॥ ३ ॥ छ ॥

६३५

जन देव तरी पायां च पडावें : त्याचीया स्वभावें चाड नाही : ॥ १ ॥ आग्नीचें सौजन्ये सीतनीवारण : अंगेंसी जडोन दुष पावी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे ज्यानें आपुलें स्वहीत : तैसी करीं नीत वीचारुनी : ॥ ३ ॥ छ ॥

---

१ 'खा' हें अक्षर येथें च प्रथम स्पष्ट लिहिलें आहे बाकी सर्वभर खा ऐवजीं षा लिहिला आहे. २ भा पाहिजे.

* * ६३६

भुत भवीश कळों यावे वर्तमान : हें तों भाग्येहीण त्याची जोडी : ॥ १ ॥ ध्रु ॥ आम्ही वीस्णुदासी देव ध्यावा चीते : होनार ते होते परारलब्धे : ॥ छ ॥ जगरुढीसाटी घातला दुकान : जातो नारायेण : अंतरोणी : ॥ २ ॥ तुका म्हणे हा हो परपच गाढा : थोरली ते पीडा रीधी-सीधी : ॥ ३ ॥ छ ॥

६३७

येथे दुसरी न सरे आटी : देवा भेटी जावया : ॥ १ ॥ ध्रु ॥ तो ची ध्यावा येका चीतें : करुनी रीतें कळीवर : ॥छ॥ [व. पृ. १३८] शड उर्मी ऱ्हुदयांतं : यांचा अंत पुरउनी : ॥ २ ॥ तुका म्हणे षुटे आस : तेथे वास करी तो : ॥ ३ ॥ छ ॥ २

६३८

प्रस्त्री आतां मज मातेसमान : रुषुमाई हे जण : पांडुरंग : ॥ १ ॥ ध्रु ॥ जाई वो तु माते न करी कांहीं आस : आम्हीं वीस्णुदास नव्हो तैसें : ॥ छ ॥ न साहावे मज तुज ही पंतन : नको हें वचन दुस्ट बोलो : ॥ २ ॥ तुका म्हणे तुज पाहीजे भ्रतार : तरी काये लोक येर थोडे जाले : ॥ ३ ॥ छ ॥ १

६३९

काम क्रोध आम्ही वाईले वीठली : आंवडी धरीली पायांसवें : ॥ १ ॥ ध्रु ॥ आतां कोण पाहे माघारे वळोन : गेला हारपोन देहभाव : ॥ छ ॥ रीधीसीधी सुषें हाणीतील्या लाता : तेथें या प्रकुत कोण मानी : ॥ २ ॥ तुका म्हणे आम्ही वीठलाचे दास : गीळुन ठेवीला ग्रास ब्रम्हांडाचा :॥३॥छ२

६४०

ज्याचे गर्जतां पवाडे : कळीकाळ पांयां पडे : ॥ १ ॥ ध्रु ॥ तो येक पंढरीचा राणा : पुसा सा चौ अठरां जणा : चीतीतां जयासी : ॥ भुग्ती मुग्ती कामारी दासी : ॥ २ ॥ वैकुंठासी जावे : तुका म्हणे ज्याच्या नावें : ॥ ३ ॥

६४१

प्रजन्ये पडावे आपुल्या स्वभावें : आपुल्या दईवे पीके भुमी : ॥ १ ॥ बीज ते ची फळ येईल सेवटी : लाभ हाणी तुटी : ज्याची तया : ॥ २ ॥ दीपाचीये आंगी नाही दुजा भाव : धनी चोर साव : सारीषे ची ॥ ३ ॥

काउळें ढोंपरा : कंकर तीतरा : राजहंसा चारा मुल्काफळें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे येथे आवडी कारण : पीकला नारायेण : तया तैसा : ॥ ५ ॥ छ ॥

६४२

सोन्याचें पर्वत करवती पास्याण : अवघे रानोराण कल्पतरु : ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ परी या दुर्लभ वीठोबाचे पाये : तेथें हे उपाये न सरते : ॥ छ ॥ अमृते सागर भरवती गगा ॥ म्हणेवैल उगा राहे काळा : ॥ २ ॥ भुत भवीस्य कळो येईल वर्तमान : ॥ [ व. पृ. १३९ ] करवती प्रसन रीधीसीधी : ॥ ३॥ स्थाने माने कळो येती यौग मुद्रा : नेववैल वारा ब्रम्हांडासी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे मोक्ष राहे आलीकडे : आणीक बापुडे काये तेथे : ॥ ५ ॥ छ ॥

६४३

अवघ्या जेस्टा देवी कोण पुजणाचा ठाव : धरीतां ची भाव कोठे न येसे जालें : ॥ १ ॥ ध्रु ॥ दीसे सारीषे सारीषें : परी तें कारणी पारीषे : तळी गेली देषें : वरी टोलें न साहाती : ॥ छ ॥ पट येका सीरी : येथा-वीधीने त्या येरी : बसकोळ्या घागरी : डेर राजण गाडगी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे माना येथे कोन्ही रुसाव ना : आपलाल्या स्थाना : जेथे त्या च शोभाल : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

६४४

म्हणवीती यैसे आईको भक्त : नेदृषीज होत डोळा कोन्ही : ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ यैसीयांचा कोण मानीतो वीस्वास : नीवडे तो रस घाई डाई : ॥ छ॥ प्रजन्याचे काळी वाहाळाचे नद : न धरे ची बुंद वोसरतां : ॥ २ ॥ हीरे यैस्या गारा दीसती दुरुन : **तुका** म्हणे घन ने भेटतां : ॥ ३ ॥

६४५

वाघाचा काल भुत दीसे वाघा यैसा : परी नाही दसा साच आंगीं : ॥ १ ॥ ध्रु ॥ बाहेरील रंग नीवडी कसोटी : संघटणे भेटी आपेंआप : ॥ छ ॥ सकिवीलें तैसें नाचावें माकडें : न चले त्यापुढें युक्ती काहीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे करी लटीक्यांचा साटा : फजीत तो षोटा सीघ्र होये : ॥ ३ ॥ छ ॥

६४६ घोगडी

घोगडीयांस घातली मीठी : नोसडी साटी केली जीवें : ॥ १ ॥ ध्रु ॥ हा गे चोर धावां धरा हो कोण्ही : घरांत राहाटे चहुं कोणी : ॥छ॥ नोळषवे म्या घरीला हाती : देहा दीप माय लावीली वाती : ॥ २ ॥ न पावे धावने मारीतो हाका : [ व. पृ. १४० ] जानाचारा **तुका** नागवला : ॥ ३ ॥ छ ॥ १ ॥

६४७

आतां मी देवा पांघोरो कावी : भींकेचें ते ही उरे ची ना : ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ सदेवं दुबळे नेणें चोर : देषोनी सुनाट फोडीले घर : ॥ छ ॥ नाही मजपासी फुटकी फोडी : पांचाणी घोंगडी दिल्ही होती : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जनावेगळें जालें : येक ची नेलें येकल्याचें : ॥ ३ ॥ २ ॥

६४८

मी माझें करीत होतो जतन : भीतरील्या चोरे घेतलें षान : ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ मज आल्यावीण आधी च होता : मज न कळतां : मजपासी : ॥ छ ॥ घोगडे नेलें घोंगडे नेलें : उंघडें केलें उघडें ची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे चोरटा ची झाला साव : सहज ची न्याव : नाही तेथें : ॥ ३ ॥ छ ॥ ३ ॥

६४९

घोगडे नेलें सागो मी कोणां : दुबळें माझें नाणीत मना : ॥ १ ॥ ध्रु ॥ पुढे तें मज नीमळे आता : जवळी सता दाम नाहीं : ॥ छ ॥ सेंटे महाजन आईका कोन्ही : घोगडीयाची करा सोधणी : ॥ २ ॥ घोंगडीयांचा करा बोभाट : तुका म्हणे जवं भरला हाट : ॥ ३ ॥ छ ॥ ४

६५०

माझें घोगडे पडीलें ठाई : माग तया पाई सांपडल : ॥१॥ ध्रु ॥ चोर तो भला चोर तो भला : पाठीसी घातला पुंडलीकें : ॥ छ ॥ चोर कुंठोरी येके च ठाई : वेगळे पाहावें न लगे कांहीं : ॥ २ ॥ आणीकांची ही चोरली आधी : माझें तयामधी : मेळवीलें : ॥ ३ ॥ आपल्या अपण सोधीलें तीही : करीन मी ही : ते ची परी : ॥४॥ **तुका** म्हणे माझें हीत ची जालें : फाटकें जाउन धड ची आलें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ ५ ॥

६५१

येक तटस्त मानसीं : येक सहजे ची आळसी ॥ १ ॥ ध्रु ॥ दोन्ही दीसती सारीषी : जाणें वर्म तो पारषी : ॥ छ ॥ येक ध्यानी करीती जप : येक बैसोन घेती झोप : ॥ २ ॥ येका सर्वस्वाचा त्याग : येका येकां पोटासाटी जोग : ॥ ३ ॥ येका भक्ती पोटासाटी : येकां देवासवें गांठीं : ॥ ४ ॥ [व.पृ. १४१] वर्म पोटी येका : फळें दोणी म्हणे **तुका** : ॥ ५ ॥ छ ॥

६५२

जाणे भक्तीचा जीव्हाळा : तो ची देवाचा पुतळा : ॥ १ ॥ ध्रु ॥ आणीक न ये माझ्या मंनां : हो कां पंडीत स्याहाणा : ॥ छ ॥ नामरुपा मीनलें चीत : त्याच्या दास मी अंकीत : ॥ २ ॥ तुका म्हणे नववीधा : ॥ वर्म जाणे तो ची सुधा : ॥ ३ ॥ छ ॥ १ ॥

६५३

वैस्णंव मुनी वीप्राचा सन्मान : करावा आपण घेंउं नंये : ॥ १ ॥ प्रभु जाला तऱ्ही संवंसाराचा दास : वीहीत तयास याची सेवा : ॥ २ ॥ तुका म्हणे हें सर्वा वंदे बळी : जाईल तो यास छळी : नरकामाजीं : ॥ ३ ॥

६५४

गातो भाव नाही आंगी : भुशण करावया जगी : ॥ १ ॥ परी तु पतीतपावण : करी साच ते वचन : ।।छ॥ मुखें म्हणवी दास : चीती माया लोभ आस : ॥ २ ॥ तुका म्हणे दावी वेश : तैसा नाही भीतरी लेश : ॥ ३ ॥

६५५

आ(प)ल्या महीमाने : धातु परीसे केलें सोनें : ॥ १ ॥ ध्रु ॥ तैसे न मनी माझें आतां : गुणदोश पंढरींनाथा ॥ छ ॥ गांवांषालील वाहाळ : गंगां न म्हणे अंमंगळ : ॥ २ ॥ तुका म्हणे माती : केली कस्तुरीने सरती : ॥ ३ ॥ छ ॥

६५६

मुग्त तो असंका नाही जया आंगी : बध मोहोसंगी लज्या चीतां : ॥१॥ सुष पावे स्यांती धरुनी येकांत : दुषी तो लोकांत डंब करी : ॥ २ ॥ तुका म्हणे लागे थोडा च वीचार : परी हे प्रकार : नागवीती : ॥ ३ ॥ छ ॥

६५७

सीदळचे सोर चोराची दया : तो ही जाणा तया संवसर्गी : ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ फुकासाटी भोगे दुषाचा वांटा : वाटेवरी उभा रोवीयेला कांटां : ॥ छ ॥ सर्प पोसुनीयां दुधाचा नास : केलें थीत वीश अम्रुतांचें ॥ २ ॥ तुका म्हणे यासी न करीतां दंडंण : पुढील षडन : नव्हे दोशां ॥ ३ ॥ छ ॥

६५८

दया तीचे नावं भुतांचें पाळन : आणी नीर्दाळंण : कंटकाचें : ॥ १ ॥ पाप त्याचें नांव न वीचारीतां नीत : भलतें ची उम्मत करी सता : ॥ २ ॥ तुका म्हणे धर्म रक्षाया साटी : देवास ही अटी जन्म घेणे : ॥ ३ ॥ छ ॥ ३

६५९

[ व. पृ. १४२ ] काणी धरी बोल बहुतांची मत : वाट त्यापरते आणीक नाही : ॥ १ ॥ धृ ॥ पावैल गौरव अ्ह्याळाचे परी : दंड पांठीवरी येमदुतां : ॥ छ ॥ शब्दग्नांनी येक आपलाल्या मतें : सांगती वेदातें भीन भावें : ॥ २ ॥ तुका म्हणे येक भाव न धरीती : पडीली हे माती त्यांचे तोंडी : ॥ ३ ॥ छ ॥

६६०

देवा आईके वीनती : मज नको हे मगती : तया ईछा गती हें च सुष आगळें : ॥ १ ॥ धृ ॥ या वैस्णवांचें घरी : प्रेमसुष ईछा करी : रीधी-सीधी द्वांरी : कर जोडुनी उभ्या : नको वैकुंठीचा वास : आसे तया सुषा नास : ॥ अद्भुत हा रस : कथाकाळी नामाचा : ॥ २ ॥ तुझ्या नामाचा महींमां : तुज न कळे मेघस्यामा : तुका म्हणे आंम्हां जन्म गोड त्यासाटी : ॥ ३ ॥ छं ॥

६६१

तेंणे सुषें माझें नीवालेसे आंग : वीठल हें जग देषीयेलें : ॥ १ ॥धु ॥ कवतुके करुणा भाकीतसें लाडें : आवडी बोबडे बोलोनीयां : ॥ छ ॥ मज नाही अदेसा अंतरी : दुषाची : ॥ भावना भेदाची समुळ गेलीं : ॥ २ ॥ तुका म्हणे सुष जालें माझ्या जीवा : रंगलो केशवा तुझा रंगे : ॥ ३ ॥ छ॥२

६६२

वीठल सजण सोवीरा वीसांवां : ॥ जाईन त्याच्या गांवां भेटावया : ॥ १ ॥ सीण भाग त्यासी सागैन आपुला तो माझा बापुला सर्व जाणें : ॥ २ ॥ माये माउसीया बंधुवर्ग जणा : भाकीन करुना सकळीकासी : ॥ ३ ॥ संत मंत सीध मानभाव मुनी : जीवभाव जाउनी सांगैन त्या : ॥ ४ ॥ माझीये माहेरीं सुषा काये उणे : न लगे येणे जाणें तुका म्हणे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १

६६३

गाईन तुझें नाम : ध्याईन तुझे नाम : आणीक न करी काम जीहुवा मुषे : ॥ १ ॥ पाहेन तुझे पाये : ठेवीन तेथे डोये : प्रुथक ते काये : न करी यांणीं : ॥ २ ॥ तुझे ची गुणवाद : आईकण काणीं : आणीकांचीं वांणीं :

पुरे आतां : ॥ ३ ॥ करीन सेवा करी :चालैण पाई: आणीक न वजे ठाई : तुजवीण : ॥ ४ ॥ तुका म्हणे जीव ठेवीला तुझां पांई : आणीक तो काई : देउं कवणा : ॥ ५ ॥ छ ॥ २

६६४

कवणाची ढोरें : कवनाची पोरे : मायबाप घरे काये येक : ॥ १ ॥ कारें गेलें म्हुण करीसी तळमळ : मीथ्या च कोल्हाळ मेलीयाचा : ॥ २ ॥ [ व. पृ. १४३ ] का रें माझें माझें म्हणसील गोत : नो सोडवी दुतां येंमाहाती : ॥ ३ ॥ का रें मी बळयाडा म्हणवीसी यैसा : सरणापासी कैसा : उचलवीसी ॥ ४ ॥ तुका म्हणे न धरीं भर्वसा काही : वेगीं सरण जाई पांडुरंगा : ॥ ५ ॥ छ ॥

६६५

देवाचे भजन का रे न करीसी तैसें : अघड हव्यासे पीडोतोसी : ॥ १ ॥ देवासी सरण का रें न व जेवे तैसा : बंदेकं मीण जैसा : मनुस्यालागी : ॥ २ ॥ देवाचा वीस्वास कारें नाही तैसा : पुत्रस्नहे जैसा : गुंतलासी : ॥ ३ ॥ का रें नाही तैसी देवाची गोडी : भागउणी सोडी : पत्नी तैसी : ॥ ४ ॥ का रें नाही तैसे देवाचे उपकार : माया मीथ्या भार : पीत्रुपुजन : ॥ ५ ॥ का रे भये वाहासी लोकाचा धाक : वीसरोणीयां यक नारायेण : ॥ ६ ॥ तुका म्हणे कां रें घातलें वांयां : अवघे आयुस्ये जांयां भग्तीवीण : ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥

६६६

ब्रम्ह न लीपे त्या मेळे : कर्म अकर्मा वेगळें : ॥ १ ॥ ध्रु ॥ तो ची येक तया जाणे : पावे अनुभर्वीलें घुणे : ॥ छ ॥ सौच असौचां संदी : तन अळा त ना च मंघी : ॥ २ ॥ पापपुन्यां नांहीं ठाव : तुका म्हणे सहज भाव : ॥ ३ ॥ छ ॥

६६७

माझें चीत तुझा पांई : राहे यैसें करी कांही : घरुणीयां बाही : भव तारी दातारा : ॥ १ ॥ ध्रु ॥ चुतुरां तु सीरोमणी : गुनलावन्याची षाणी : मुगट सकळा मंनी : तु ची धन्ये वीठोवा : ॥ छ ॥ करी त्रीमीराचा नास :

दीप होउनी प्रकास : तोडी आसापास : करी वास ऱ्हुदैवी : ॥ २ ॥ पाहे गुतो मी नेणता : तुज आसो माझी चींतां : **तुका** ठेवी माथा : पाई आंतां राषावें : ॥ ३ ॥

६६८

आम्ही जाणावें तें काई : तुझें वर्म कोणें ठाई : अंतपार नाही यैसें स्रुती बोलती : ॥ १ ॥ धृ ॥ होई मज तैसा मज तैसा : साणा सुकुमार रुसी-केशा : पुरवीं माझी आसा : भुजा च्याह्री दाषवी : ॥ छ ॥ षालुता सप्त ही पाताळा : वरुता स्वर्गाहुण ढीसाळा : तो मी मशक डोळा : [ व. पृ. १४४ ] कैसा पाहों आपला : ॥ २ ॥ मज असे हा भर्वसा : पढीये होसी तयां तैसा : पंढरी नीवासा : **तुका** म्हणे वीठोबा : ॥ ३ ॥ छ ॥ २

६६९

सर्प भुलोन गुतला नादा : गारुडीये फादा घात(ला)सें : ही-डउनी पोट भरी दारोदारी : कोंडुणी पेटारी असे रया : ॥ १ ॥ धृ ॥ तैंसी परी मज जाली पांडुरंगा : गुंतलों तो मी गा : सोडी आतां : माझें मज काही न चलेसें जालें : क्रुपा तुज न करीतां ॥ छ ॥ अवीसे मीनु लावीयला गळी : अभक्षे तो गीळी म्हणउनीयां : ॥ काढुनी बाहेरी प्राण घेउं पाहे : तेथे बापमाये कोण रया : ॥ २ ॥ पक्षी पीलीयां पातले आसा : देषोनीयां फांसा : गुंते बळें : मरण नेणे माया धावोन वोरसें : जीवींत्व ना जाली बाळे : ॥ ३ ॥ गोडपणे मासी गुतली लींगाडी : सांपडे फडफडी : अधीकाअधीक : **तुका म्हणे** प्राण घेतला आसा : धाव रुसीकेशा मायेबापा : ॥ ४ ॥ छ ॥

६७०

यातीहीन मज काये तो अभीमान : मानी तुज जन : नारायेना : ॥ १ ॥ धृ ॥ काये सुष मज तयाची हे षंती : आपुलाला घेती गुणभाव : ॥ छ ॥ द्रव्येमुळें माथा : वाहीली चीधी : होन जयेमधी होता गाठी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जन वदीतो वेगळा : मजसी द्रुबळा काये चाड : ॥ ३ ॥ छ ॥

६७१

न पुजी आणीका देवां : न करी त्याची सेवा : न मणी या केशवा : वीण दुजें : ॥ १ ॥ धृ ॥ काये उने जालें मज तया पाई : ते मी मागे काई

कवणासी : ॥ छ ॥ आणीकांची कीर्त नाईके नोबलें : चाड या वीठलें वीण नाही : ॥ २ ॥ न पाहे लोचनी : श्रीमुषावांचुणी : पंढरीं साडुनी न वजें कोठ : ॥ ३ ॥ न करीं कांहीं आस : मुगतीचे सायास : नी भें सौसारास येतांजातां : ॥ ४ ॥ [ व. पृ. १४५ ] तुका म्हणे काही होवे येसे जीवा : नाही या केशवावीण दुजें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

६७२

सीतळ साउली आमची माउली : वीठाई उ‌ळली प्रेमपान्हां : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ जाउनी वोसंगां रीघेणे वोरसें : लागे तें ईछे पीवन करी : ॥ छ ॥ कृपा तनु माझी साभाळी दुरुणी : अंमृतजीवनी : लोटलीसे : ॥ २ ॥ आनंदाचा ठाव नाही माझा चीतीं : सागर तो कीती उपमेसी : ॥ ३ ॥ सैर जाय पडे तयेसी सांकडें : सांभाळीत पुढें : मागें असें : ॥ ४ ॥ तुका म्हणे चींतां कैसी ते मी नेंणें : लडीवाळ तान्हें वीठोबाचें : ॥ ५ ॥ २

६७३

रामरुप केली : रामे कौसल्या माउली : ॥ १ ॥ धृ ॥ रामराम राहीला मानसी : ध्यान चीतन जयांसी : राम होये त्यासी : संदहे नाही सर्वथा : ॥ छ ॥ अयोध्येचे लोक : रामे केले सकळीक : ॥ २ ॥ स्मरतां जानकी : रामरुप जाले कपी : ॥ ३ ॥ रावनासी लंका : राम आपण जाला देषा : ॥ ४ ॥ नीत राम ध्येये : तुका वदी त्यांचें पायें : ॥ ५ ॥ छ ॥ १०

स्लोक ६७४

उभा भीमरेचा तीरी : राहीलाहें : असे सन्मुष दक्षेणमुष वाहें :
मांहा पातकांसी पळ काप थोर : कैसे गर्जती घोश हे नाम वीर : ॥ १ ॥
गुण गभीर हा धीर हांसें मुष : वदे वदनी अमृत सर्व सुष :
लागलें मुनीवरां गोड चीती : देहभावना तुटली त्यांसी षंती : ॥ २ ॥
ठसा घातला ये भुमीमाजी थोर : ईछादान हा द्यावयासी उदार :
जया वोळगती सीधी सर्व ठांई : तुझें नाम हें चांगलें गें विठावी : ॥ ३ ॥
असे उघडा हा ईटेवरी उभा : कटसुत्र हे धरुनी भगती लोभा :
पुढें वाट दावी भवसागराची : विठो माउली हे सीधांसाधकांची : ॥ ४ ॥
करावे गुहा धरा पंथ आधी : जया पार नांही सुषातें च साधी :
म्हणे पंढरीस तुका सर्व आलें : असे वीस्व हे जीवणे त्याची ज्यालें : ॥५॥

स्लोक ६७५

असे नांदतु हा हरी सर्व जीवीं : असे व्यापुन अग्न हा कास्ट तेवी :
घटी बींबलें बीब हे ठाई ठाई : तया संगती नासु हा त्यासी नाही :॥१॥
तन वाटीतां क्षीर हे होत नाही : पसु भक्षीतां पालेट ते च देही :
तया वर्म तो जाणतां येक आहें : असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे :॥ २॥
फळ कर्दळी सेवटी एक आहे : असे सोधीतां पोकळीमाजी काये :
धीर नाही ते वाउगें धीग जालें : फळ पुस्प ना येत्न ते व्यार्थ गेले :॥३॥
असे नाम हे दर्पणे सीध केलें : असे बीब तें या मळाआड ठेलें :
कसे सुध नाही दीसे माज्ये रूप : नका वाढउं सीण हा पुन्ये पाप :॥ ४॥
करा वर्म ठांवे नका सोग वांयां : तुका वीनवीतो मस्तक ठेउनी पांयां :
तजा पुत्रदाराधनवासना हे : मग उरलें सेवटी काये पाहे :॥ ५॥ छ॥

स्लोक ६७६

मना सांडी हे वासना दुस्ट षोडी : मती मानसी येक हे व्यार्थ गोडी :
असे हीत माझे तुज काही येक : धरी वीठली प्रेम ह पांइ सुष :॥ १॥
असे सर्वभावें तुज शरर्ण आलों : देहेदुष हें भोगीतां फार भ्यालों :
भवतारितें दुसरें नाहीं कोन्ही : गुरु होत कां आणीक देव तिन्ही : ॥२॥
जना वासना हे धना थोरी आहें : तुज लागली सगती ते ची सोये :
करी सर्व संगी : पर त्यागु ठाई : तुका वीनवी मस्तक ठेउनी पांई :॥ ३॥

स्लोक ६७७

धना गुतले चीत माझें मुरारी : मना घेउनी हीडवी दारोदारी :
मरे हीडतां नुपरे यासी कांहीं : मही ठेंगणी पर्वत त्रुप्त नाहीं :॥ १॥
न दीसे सुध पाहातां मज मती : पुढे पडीला ईद्रीया थोर घाती :
जीवा नास त्यां सगती दंडबेडी : हरी सीघ्र या दुस्ट संगां तोडी :॥ २॥
असी आणीकें काये सागो अनंतां : मोहो पापिणी दुस्ट माया ममंतां :
क्रोध कामना यातना थोरी करी : तुज वांचुनीं सोडवी कोण हरी :॥ ३॥
नीजे देषतां नीज हे दुरी जाये : नीद्रे अळस डंब यां भीत आहे :

[ व. पृ. १४७ ]

तयां वस्तु देही नको देऊं देवा : तुज वांचुणी अणीक नास्ती हेवा :॥ ४॥
करी घातपात संका लाज थोरी : असे सत्यभाव बहु भग्ती दुरी :
नको मोकलुं दीनबंधु अनाथा : तुका वीनवी ठेउंनी पांई माथा :॥ ५॥

## कावडी ६७८

आहा हा रे भाई प्रथम नंमों तो वीणायेक : ठेउनी गुरुचरणी मस्तक : वदैल प्रसादीक वाणी हरीहरचे पवाडे : ॥ १ ॥ माझी असे ब्रीदावळी : दासे दासेंत्वें आगळी : पान्हेरीनं मार्गा मळी : जीवण घ्या रे कापडी हों : ॥२॥ जे या सीतळाहुनी सीतळ : पातळाहुनी जे पातळ : परम आमृंत रसाळ : ते हे सेवा आहो भाग्याचें : ॥३॥ जींकाल तरी जीका रे आभीमांनं : दवडाला तरी दवडा लज्यां आणी मान : धराल ते धरा सभुचें चरण : दाता पण यैसा दावा ते : ॥ ४ ॥ काळा घेउं नेदी वाव : आला तो राषें घावडाव : सुध सत्वें राषोन नीभावं : म्हणा मांहादेव : हर हर वाणी गर्जो द्या ॥ ५ ॥ परावीया नारी माउलीसमान : परधनीं बाटों नेंदीं मंन : जीवीत्व तें त्रुणांसमान : स्वामी काजीं जाणं : सुर तया म्हणो आम्ही : ॥ ६ ॥ शक्ती वेचावीया परउंपकारा : षोटा षोटीयाचा पसारा : सत्य तो भवनदीचा तारा : अळस तो न करा : येथे आहो सांगातों : ॥ ७ ॥ व्रत करा येकदसी सोमवार कथा पुजनें हरीजागर : पुन्ये तें असे गातां नाचतां बहु फार : पुन्हां बोलीला संवंसार नाही नाही सतेत्वे : ॥ ८ ॥ संग संताचा करीतां बरवा : उतम उतम कीर्तीचा हा ठेवा : पंथ तो सुपंथ चालावा : उगवा वासनां लीगाड : हरी म्हणा रे : ॥ ९ ॥ **तुका** चालवीतो कावडी : प्रवृतेनीवृतें चोषडी : पुढीती पुढीती अधीक गोडी : भरुंणी कळस भजण अवडी : केशवदास नटतसें : हर म्हणा : ॥ १० ॥ छ ॥ १

## कावडी ६७९

[ व. पृ. १४८ ] अहा हा रे भाई : हें आनादानाचें छत्र : पव्हे घातली सर्वत्र : पंथी अवघे पंथ मात्र : ईछाभोजनाचे आत्र : पुरवावया : ॥१॥ घ्यांवे त्याणे ते ते घ्येवे : न सरेसे केलें सदासीवें : पात्र सुध पाहीजे बरवे : मगळ भावे सकळ हर म्हणा : ॥ २ ॥ नव्हे हें कांहीं मोकळें : साक्षी चौघांचीया वेगळे : नेंदीं नाचो मताचीया बळें : अनु अणोरणींया आगळें : महदी महदा साक्षत्वें हर म्हणा : ॥ ३ ॥ हे हरीनामाची आंबीलीं : जगा पोटभरी केली : वीस्रांती कल्पतरुची साउली : सकळां वर्णा सेवीतां भली : म्हणा हरहर महादेव : ॥ ४ ॥ **तुका** हरीदास तराळ अवघें हाकारी सकळ : या रे वंदुं सीषराचळ : चैत्रमास पर्वकाळ : माहादेवदरुशेणें : ॥ ५ ॥ छ ॥ २

आहाहा रे भाई : नमो उदासीण जाले देहेभावा : आळवीती देवा : तयां नमो : ॥ १ ॥ नमो तीर्थपंथें चालती तयांसी : नमो येती त्यांसी बोळवीत त्या : ॥ २ ॥ नमो तया मात्यापीत्याचें पाळण : नमो त्या वचण सत्ये वदे : ॥ ३ ॥ नमो तयां संतवचणी वीस्वास : नमो भावें दास गुरुचें त्या : ॥ ४ ॥ नमो तया जाणे आणीकांचें सुषदुष : राषे तान भुक : तयां नमो : ॥ ५ ॥ नमो पर उपकारी पुनेवंतां : नमो त्यां दमीत्यां ईंद्रीयांसी : ॥ ६ ॥ **तुका** म्हणे नमो हरीचीयां दासां : येथे सर्व ईछा पुरलीसें : ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥३

## ६८१

आहाहा रे भाई : तयावरी माझी ब्रीदावळी : भ्रस्ट ये कळी कीया-हीण ॥ १ ॥ धृ ॥ थुंका थुंका रे याच्या तोंडावरी : आणील ते थोरी : दवडा वांयां : ॥ छ ॥ बाईलेचा दास : पीत्रांसी उदास : भीक भीकऱ्यास न ये दारा : ॥ २ ॥ वीद्याबळें वादा सागोंणीयां छळी : आणीकांसी फळी माडुणी-यां : ॥ ३ ॥ गांवीचीया देवा नाहीं दंडवंतं : ब्रम्हणे अतीत घडे ची ना : ॥४॥ सर्वकाळ करी संतांची नींदा : स्वप्नी गोवींदा आठवीनां : ॥ ५ ॥ [ व. पृ. १४९ ] षांसेमंधी धन : पोटासी बधन : नेणें यैसा दानधर्म काई : ॥ ६ ॥ **तुका** म्हणे नटे दाउनीयां सोंग : लवों नेदी आंगं भगतीभावें : ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥ ४

## ६८२

आहाहा रे भाई : गगा नव्हे जळ : वृक्ष नव्हे वड पींपळ : तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ : स्रेस्ट तनु देवाच्या त्या : ॥१॥ नदी समुंद्र नव्हे पैं गा : पाशाण म्हणो न ये लींगा : संत नव्हेती जगा मा(न)सां सारीषे ते कांहीं : ॥ २ ॥ काठी नव्हे वेतु : अन म्हणो न ये सातु : रामराम हे मातु : न येती शब्द म्हणो हे : ॥ ३ ॥ चंद्रसुर्ये नव्हे तारागणे : मेरु तो नव्हे पर्वतासमान : शेसु नव्हे सर्व जाण : वीषाराच्या सारीषा : ॥ ४ ॥ गरुड नव्हे पांषीरुं : ढोर नव्हे नदकेस्वरु : झाड नव्हे कल्पतरु कामधेनु गाये न म्हणावी : ॥ ५ ॥ कुर्म नव्हे कासव : डुकर ते नव्हे वऱ्हाव : ब्रम्हा नव्हे जीव : स्त्री नव्हे लक्षीमी : ॥ ६ ॥ गवाक्ष नव्हे हाड : पाटांउं नव्हे कापड : परीस नव्हे दगड : सगुण ते ईस्वरीचें : ॥ ७ ॥ सोने तें नव्हे धातु : मीठ नव्हे रेतु : नाहीं हीं चर्मा तु : कृस्णाजने वाघांबरे : ॥ ८ ॥ मुत्काफळे

नव्हती गारा : षड्या यैसा नव्हे हीरा : जीव नव्हे सोईरा : बोळईजे साईछेने ॥ ९ ॥ गांवं नव्हे द्वारावती : रण सोडी नव्हे मुर्ती : तीर्थ नव्हे गोमती : मोक्ष घडे दरुशणे : ॥ १० ॥ क्रुस्ण नव्हे भोगी : शंकर नव्हे जोगी : तुका पांडुरगी : हा प्रसाद लाधला : ॥ ११ ॥ छ ॥ छ ॥ ५

६८३

सहज पावतां भगवंती : परी ही वीकल्पें परती : फुकाची हे चीती : आठवण कां न धरीती : ॥ १ ॥ धृ ॥ हरी व्यापक सर्वगत : हें तव मुषच्यत्वें वेदात : चींतनासी चीत आसों द्यावे सावध : ॥ छ ॥ वीरजाहोम याची नावें : देहे नव्हे मी जाणावे : मग का जी यावें वरी लागे संकल्पा : ॥ २ ॥ अनंन्या भक्तीचा उपाये : ते या वीठोबाचे पाये : ध्याईल तो काये : जाणे चको मारग : ॥ ३ ॥ [व. पृ. १५०] काम क्रोधें देह मळीन : स्वाहाकारीं कैंचं पुण्य : मंत्री पुजीला येज्ञ : मन मुंडण : नव्हे ची ॥ : ४ ॥ आतां सागे तुका : येक तुम्ही चुको नका : सांडी माडी धोका धोका : शरण रीघतां गोमटे : ॥ ५ ॥ छ ॥

६८४

आला भागासी तो करी वेवसाव : परी राहो भाव तुझा पाई : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ काये चाले तुम्ही त्रांधलें दातारा : वाहीलीया भारा उसंतीतों : ॥ छ ॥ शरीर ते करी शरीराचे धर्म : नको देउं वर्म : चुको मना : ॥ २ ॥ चळण फीरवी ठाव वहुवस : न घडो आळस चींतनाचा : ॥ ३ ॥ ईंद्रीये करुत अपलें व्यापार : आवडीस थार देई रुपी : ॥ ४ ॥ तुका म्हणे नको देउं काळा हाती : येतो काकुलती म्हणउनी : ॥ ५ ॥ छ ॥

६८५

सुटायाचा काही पाहतो उपाये : तों हे देषें पायें गोवीयेले : ॥ १ ॥ धृ॥ यैसीया सुषाचें सापडलो सधी : हारपली बुधी बळ माझें : परारब्ध क्रीयेमांनं संचीतांचें : ॥ वोढत ठाईचें आले चालें : वीधीनीशेधाचे सापडलों चपे : येके येक लोपे : नीवढेना : ॥ ३ ॥ सारावे तें वाढे त्याचीया च आगें : तुम्पेचीया संगें दुषी जालो : ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां करी सोडवण : सर्व शक्तीहीण जालो देवा : ॥ ५ ॥ छ ॥

६८६

भये वाटे पर : न सुटे हा संवंसार :॥ १ ॥ धृ ॥ यैसा पडीलो काचनी : करी धावा म्हणंउनी : वीचारी ता कांही : तो हे मन हातीं नांही : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : येथे न पुरे रीघावा : ॥ ३ ॥ छ ॥

६८७

ये गा पांडुरंगां : घेई उचलुनी वोसंगां : ॥ १ ॥ धृ ॥ यैसी आसोनीयां वेसी : दीसोतों मी परदेसी : ॥ छ ॥ उगउनी गोवां : सोडउनी न्यांवे देवा : ॥ २ ॥ [ व. पृ. १५१ ] तुका म्हणे आड कांही : बळ करी यैसें नाही : ॥ ३ ॥

६८८

माझी वीठल माउली : प्रेमपान्हां पान्हाईली : ॥ १ ॥ कुवाळुनी लावी स्थानी : न वजे दुरी जवळुनी ॥ छ ॥ केली पुरवी आळी : नव्हे नीस्टुर कोवळी : ॥ तुका म्हणे घांस : मुषी घाली ब्रम्हरस : ॥ ३ ॥

६८९

जाणते लेकरु : माता लागे दुरी धरुं : ॥ १ ॥ धृ ॥ तैसें न करी कृपांवंतें : पांडुरगें माझे मातें : ॥ छ ॥ नाहा मुग्ताफळा : भेटी मागुती या जळा : ॥ २ ॥ तुका म्हणे लोनी : ताका साडी नीवडुनी : ॥ ३ ॥ छ ॥

६९०

आठ प्रहर माता : वाहे वेडीयाची चीतां : ॥ १ ॥ धृ ॥ तैसें करुणी माझे आई : ठाव देउनी राषें पाई : ॥ छ ॥ काढीतां तळमळी : बाहेरी जीवना मासोळी : ॥ २ ॥ तुका म्हणे कुडी : जेवी प्राणाचे अवडी : ॥ ३ ॥

६९१

आम्ही उतराई : भाव नीरोपुनी पाई : ॥ १ ॥ तुम्ही पुरवावी आळी : करावी ते लडीवाळी : ॥ छ ॥ आमचा हा नेम : तुम्हा उचीत हा धर्म : ॥ २ ॥ तुका म्हणें देवा : जाणो सागीतली सेवा : ॥ ३ ॥ छ ॥

६९२

काये कळे बाळा : बाप सदेवं दुबळा : ॥ १ ॥ धृ ॥ आहे नाहीं तें न कळे : हातीं काये कोणे वेळे : देषीले ते द्रुस्टी : मागें घालुनीयां मीठी : ॥ २ ॥ तुका म्हणे भावे : माझ्या मज समजावें : ॥ ३ ॥ छ ॥

६९३

जालों नवसांचा : आम्ही तुम्हास वाणीची : ॥ १ धृ ॥ कोण होतें मागें पुढें : दुजे बोलाया रोकडें : छ पींडदान देते : कोण नाम तुझं घेतें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे पांडुरंगा : कोणां घेते ती वो सगा : ॥ ३ ॥ छ ॥

६९४

केलें पाप जेणें दील्हे अन्मोदन : दोघासी पतन सारीषें ची : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ वीश नवनीता वीश करी संगें : दुर्जनाच्या त्याग सर्व हीत : ॥ छ ॥ देषीलें वोढाळ नीघालीयां सेता : [ व. पृ. १५२ ] टाळावें नीमीत्या थै म्हुण : ॥ २ ॥ केल्यावीण **तुका** म्हणे जोडे कर्म : देषतां तों श्रम न मनीतां ॥ ३ ॥ छ॥

६९५

मुषी नाम हाती मोक्षे : यैसी साक्षे बहुतांची : ॥ १ ॥ वैस्णंवांचा माल षरा : तुरतुरा वस्तुसी : ॥ छ ॥ भस्म दंड न लगें काठी : तीर्थे आटी भ्रमणे : ॥ २ ॥ **तुका** म्हणें आडकठी : नाही भेटी देवाचें : ॥ ३ ॥ छ ॥

६९६

वीठल गीती वीठल चीती : वीठल वीश्रांती : भोग जयां ॥१॥ वीठल आसणी : वीठल सयेनी : वीठल भोजणी : ग्रासोग्रासीं : ॥ २ ॥ वीठल जाग्रुती : स्वप्नी सुस्पप्ती : आनु दुजे नेणेती : वीठलवणि : ॥ ३ ॥ भुसेण आळंकार : सुषाचे प्रकार : वीठली नीर्धार : जयां नरां : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे ते ही वीठल ची जालें : सकल्प मुरालें : दुजे पणी : ॥ ५ ॥ छ ॥

६९७

कुशळ वग्ता : नव्हे जाणीव स्रोता : राहे भावा चीता धरुनीयां : ॥ १॥ ॥धृ॥ धन्ये तो जगी धन्य तो जगी : तया आंगीं वसतसें : ॥ छ ॥ नोधवी तोंड न करी आंघोळी : जपे सदाकाळी रामराम : ॥ २ ॥ जप तप ध्यान नेणें या गती : कृपाळु जो भुती दयांवत : ॥ ३ ॥ **तुका** म्हणे होये जाणोन नेंणता : आवडे आनंता जीवाहुणी : ॥ ४ ॥ छ ॥ छ ॥

६९८

दास जालों हरीदासांचा : बुधी कायांमनें वाचा : ॥ १ ॥ धृ ॥ तेथे प्रेमाचा सुकाळ : टाळ मृदांग कलोळ : नासे द्रुबुधी सकळा : समाध्ये हरी-कीर्तनी : ॥ छ ॥ आईकतां हरीकथा : भग्ती लागे त्यां अभग्तां : ॥ २ ॥ देषोनी कीर्तनाचा रंग : कैसा उभा पांडुरंग : ॥ ३ ॥ हे सुष ब्रम्हांदीका : म्हणे नाही नाही **तुका** : ॥ ४ ॥

६९९

गती आधोगती मनाची युग्ती : मन लावी येकाती : साधुसंगें : ॥ १ ॥
॥ धृ ॥ जतन करा जतन करा : धांवातें सैरां : वोढाळ त : ॥ छ ॥ मान आप-
मान मनाचें लक्षेण : लावीलीया ध्यान ते ची होये : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मन :
उतरी भवसीधु : मन करी बंधु चौऱ्यासीचा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

७००

[ व. पृ. १५३ ] पंढरीस दुष न मीळे वोषदा : प्रेम सुष सदा सर्व
काळ : ॥ १ ॥ पुंडलीकें हाट भरीयेली पेंठ : अवघे वैकुंठ : आणीयेले तेणे :
॥ २ ॥ उदीमासी तुटी नाही कोन्हा हाणी : घेउनीयां धनी लाभ घेती :
॥ ३ ॥ पुरले देसासी भरलें सीगसी : अवघी पंचक्रोसी दुमदमीत : ॥ ४ ॥
**तुका** म्हणे संता : लागलीसे धणी : बैसलें राहोनी पंढरीस : ॥ ५ ॥ छ ॥ १

७०१

द्वरकेचे केमें आलें या ची ठाया : पुढे भगतराया : चोजवीत : ॥ १ ॥
गोवीलें वीसारे : माप केले षरे : न पाहे माघारे अद्यावरी : ॥ १ ॥ वैस्णव
मापारी : नाही जाली सळे : पुढे ही न कळे पारु त्याचा :॥ ३ ॥ लाभ जाला
त्यानी धरीलो तो वार : अहेक परत्र साटवीलें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे मज
मीळीली मजुरी : वीस्वस यां धरी संताचीये : ॥ ५ ॥ २

७०२

सुरवर येती तीर्थे नीत काळ : पेठ त्यां नीर्मळ : चद्रभागा : ॥ १ ॥
साक्षेभुत नव्हे सांगीतली मात : मंहीमा अद्भुत न वर्नवेना : ॥ २ ॥ पंच-
क्रोसीमाजी रीग नांही दोशा : जळती पैसा : आघोर ते : ॥ ३ ॥ नीरवीश
नर चत्रभुज नारी : अवघा घरोघरीं ब्रम्हानदु : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे ज्यापे :
नाही पुन्यलेश : जा रे पंढरीस : घेंई कोटी ॥ ५ ॥ छ ॥

७०३

कासया करावे तपाचें डोंगर : आणीक व्यापार दुषरासी : ॥ १ ॥
कासया फीरावे भोवंतलें देश : बोलतील आस पुढे लाभ : ॥ २ ॥ कासया
पुजावी आनीक देवते : पोट भरे तेथे लाभ नांही : ॥ ३ ॥ कासया मुग्तीचे
करावे सायास : मीळे पंढरीस फुकासाटी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे करी कीर्तन
पसारा : येवील लभ घरा : पाहीजे तो : ॥ ५ ॥ छ ॥

७०४

भजन घाली भोगावरी : अकर्तवे मनी धरी : ॥ १ ॥ धृ ॥ धीग त्याचे साधुपण । वीटालुनी वर्ते मन : ॥ छ ॥ नाही वैराग्याचा लेश : अर्थ-चाड जीवें आस : ॥ २ ॥ हे ना ते स केलें : तुका म्हणे वायां गेलें : ॥ ३ ॥

७०५

वीचार नाही नर षर तो तैसा : वाहे ग्रान पाठी भार लगड तैसा : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ वादावाद करणें त्यासी : तो ची वरी : गुषाडीची चाड हरे तो ची बाहेरी : ॥ छ ॥ [ व. पृ. १५४ ] सोभाग्यसंपन व्रुध हो कां प्रथीस्ट : चीकरुनी सांडी पांयां लागली वीस्टा : ॥ २ ॥ नाही याती कुळ फांसे अर्धी तयासी : तुका म्हणे काये मुद्रा सोग जाळीसी : ॥ ३ ॥ छ ॥

७०६

देव होसी तरे आणीकांथें करीसी : सदेहे यावी(सी) करणे न लगे : ॥ १ ॥ दुस्ट होसी तरे आणीकांथें करीसी : संदेहे यावीसी करणें न लगें : ॥ २ ॥ तुका म्हणे जें दर्पणी बीबलें : तें तुज बानलें नीस्चयेसी : ॥ ३ ॥ छ ॥

७०७

येकादसी अंन जे नर करीती भोजन : स्वान वीस्टा ते समान : आधम जन ते येक : ॥ १ ॥ धृ ॥ आईका व्रताचें महीमान : नेमे आचरती जन : गाती आईकती कीर्तन : ते समान वीस्णुसी : ॥ छ ॥ आसुध वीटाळसीचें षळ : वीडा भक्षीती ताबोळ : सांपडे सबळ काळाहातीं न सुटे : ॥ २ ॥ सेज बाज वीळास भोग : करी कामींनीचा सग : तया जोडे क्षेये रोग : जन्मव्याधी बळीवंतां : ॥ ३ ॥ नये हरीकीर्तना : आणीक वारीजतां कोन्हां : त्याच पापे जाणा रे ठेगणा : मांहा मेरु : ॥ ४ ॥ तयां दंडी येमदुत : जाले तयाचे अंकीत : तुका म्हणे व्रत येकादसी चुकल्या : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

७०८

करवीतां व्रतें अर्ध पुन्यें लाभें : मोडवीतां दोघे नरका जाती : ॥ १ ॥ सुध बुधी होये दोघा येकी मान : चोरासवे कोण जीवे राषे : ॥ २ ॥ आपलें देउनी आपला ची घात : न करावा थीत जाणोनीयां : ॥ ३ ॥ देउनी यां वेच धाडी वारानसी : नेंदावें चोरासीं चंद्रबळ : ॥ ४ ॥ तुका म्हणे तप तीर्थ व्रत या(ग) भग्ती हा मारग मोडी नेदी : ॥ ५ ॥ छ ॥

७०९

कळीधर्म मागें सागीतलें संती : आचार साडीती द्वीज लोक : ॥ १ ॥ तें ची कळो आंतां येती सप्रचीती : आधर्मा टेकती धर्म नव्हे : ॥ २ ॥ तप व्रत करीतां लागती सायास : पाळीतां पडीास गोड वाटे : ॥ ३ ॥ देव म्हण-उनी न येती देउळा : संवंसारां वेंगळा तरी कां नव्हें : ॥ ४ ॥ [ व. पृ. १५५ ] **तुका** म्हणे मज धरीतां गुमान : यैसे कोन्ही जन : नरका जाती : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

७१०

नमो वीस्णु वीस्वरुपा मायेबापा : आपारा आमुपा पांडुरंगा : ॥ १ ॥ वीनवीतो रंक दास मी सेवक : वचन ते येक आईकांवे : ॥ २ ॥ तुझी स्तुति वेद करीतां भागला : नीवांत ची ठेला : नेती नेती : ॥३॥ रुसी मुनी बहु सीध कवीजन : वरनीतां गुण न सरती : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तेथें काये माझी वानी : जो तुझी वाषाणी कीर्त देवा : ॥ ५ ॥ छ ॥

७११

दीनानाथा तुझी ब्रीदें चराचर : घेसील कैवार स्रणांगतां : ॥ १ ॥ पुराणे जे तुझे गर्जती पवाडे : ते आम्हा रोकडे कळों आलें : ॥ २ ॥ आप-ल्यां दासाचें न साहावे उणें : उभा त्या कारणे राहीलासी : ॥ ३ ॥ चक्रगदा हाती आयोध्यें आपारे : नीउन तेथे पुरें करु धावें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुज भग्तांचे पाळण : काराया कारण आवतार : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

७१२

वरनु महीमा यैसी नाही मज वाचा : नोंब्रळेवे साचा पारु तुझा : ॥ १॥ ठाईंची हे कायां ठेवीली चरणी : आतां वोवाळुनी काये सांडु : ॥ २ ॥ भाव नाही यैसा करी तुझी सेवा : जीव वांहों देवा : तो ही तुझा : ॥ ३ ॥ मज माझें कांहीं : न दीसे पाहातां : जे तुज अनंतां समर्पावें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे आतां नाही मज थोर : तुझे उपकार फेडावया : ॥ ५ ॥ छ ॥

७१३

अंतरीचा भाव जाणोनीयां गुज : तैसें केलें काज पांडुरंगा : ॥ १ ॥ घातलें वचण न पडे ची षाली : तुं आम्हा माउली अनाथाची : ॥ २ ॥ मज याचकाची पुरवीली आशा : पढरीनीवाशा : मायेबापा : ॥ ३ ॥ नासीली असंक माझीया जीवाची : उरली भेदाची होती कांही : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे आतां केलों मी नीर्भर : गाईन आपार गुण तुझे : ॥ ५ ॥ छ ॥

७१४

उद्‌ार कृपाळ अनाथाचा नाथ : आईकसी मात : स्रणागतां : ॥ १ ॥ सर्व भार मांथां चालवीसी त्याचा : [ व. पृ. १५६ ] अनुसरली वाचा काया मनें : ॥ २ ॥ पाचारीतां उभा राहासी जवळी : पाहीजे तें काळी पुरवावें : ॥ ३ ॥ चालतां ही पंथें सांभाळीसी वाटे : वारीसील कांटे : षडे हातें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणें चींतां नाही तुझ्या दासां : तुं त्याचा कोवसा सर्वभावे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

७१५

उद्‌ार कृपाळा पतीतपावणा : ब्रींदें नारायेना साच तुझी : ॥ १ ॥ वर्णाळासी जैसा जाणता नेणतां : तैसा तुं अनंतां : साच होसी : ॥ २ ॥ दैत्यां काळ भग्ता मेघश्याम मुर्ती : चत्रभुज हाती : संषचक्र ॥ ३ ॥ काम ईछा तया तैसा होये राणी : येस्वेदेचां स्थ(न)पाण करी : ॥ ४ ॥ होउनी सकळ कांही च नव्हेसी : **तुका** म्हणे यासी : वेद् गोही : ॥ ५ ॥ छ ॥

७१६

तुज वर्णी यैसा तुजवीण नाही : दुजा कोन्हीं तीहीं त्रीभुवणी : ॥ १ ॥ सहस्रमुषे सेष सीनला बापुडा : चीरलीया धडा : चीहुवा त्याच्या : ॥ २ ॥ आव्येग्ता अलक्षा आपारा अंनंता : नीर्गुणा सचीदा : नारायेणा : ॥ ३ ॥ रुप गुण नाम आपल्या स्वईछा : घेसी भाव तैसा : त्यां कारणें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तु च दावीसी आपणा : तरी च नारायेना कळों येसी : ॥ ५ ॥

७१७

कैसें करु ध्यान कैसा पाहो तुज : वर्म दावी मज याचकासी : ॥ १ ॥ कैसी भग्ती करुं सांग तुझी सेवा : कोण्या भावे देवा आंतुडसी : ॥ २ ॥ कैसी कीर्ती वाणु कैसा लक्षी आणु : जाणे हा कवणु : यैसा तुज : ॥ ३ ॥ कैसा गाउं गीती कैसा ध्याउं चीती : कैसी स्थी(ती) मती दावीं मज : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे जैसे दास केलें देवा : तैसें हें अनुभवा : आणी मज : ॥ ५ ॥

७१८

काये कीर्त ऊरु लोक दंभ मान : दाषवी चरण : तुझे मज : ॥ १ ॥ आतां मज यैसें नको करुं देवा : तुझा दास जावा वायांवीण : ॥ २ ॥ होईल थोरपण जाणीवेचा भार : दुरावैन दुर : तुझां पांई : ॥ ३ ॥ अंतरीचा भाव काये कळे लोंकां : येक मानी येका देषोवेषी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुझे पाये आतुडती : ते मज वीपती गोड देवा : ॥ ५ ॥ छ ॥

## ७१९

[ व. पृ. १५७ ] मानावया जगें होवी द्रवेमाया : नाही हे माझीया : जीवा चाड : ॥ १ ॥ तुझ्या पांयां साटी केली आरानुक : आंतां कांही येक : नको दुजें : ॥ २ ॥ करुनीयां कृपा करीं आंगीकार : न लवी उसीर : आंतां देवा : ॥ ३ ॥ नव्हे साच कांही कळो आले मना : म्हणउनी वासना आवरीली : ॥ ४ ॥ तुका म्हणे आंतां मनोरथसीधी : माझे कृपानीधी : पाववावें : ॥ ५ ॥ छ ॥

## ७२०

नाही सुष मज न लगे हा मान : न म्हाये हे जन काये करुं : ॥ १ ॥ देहेउपचारे पोळतसे आंग : वीषतुलें चांगं : मीस्टान ते : ॥ २ ॥ नाईकावे स्तुती वाणीतां थोरीवं : होये माझा जीव : कासावीसी : ॥ ३ ॥ तुज पावे यैसी सांग काही कळा : नको मृगजळा : गोउं मजं : ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां करी माझें हीत : काढावे जळत : आगीतुणी : ॥ ५ ॥ छ ॥

## ७२१

आतां माझा सर्वभाव हा नीर्धार : न करीं वीचार : आणीकासी : ॥ १ ॥ सर्व भावे हा नाम गाईन आवडीं : सर्व माझी जोडी : पाये तुझे : ॥ २ ॥ लोटांगण तुझा घालीन आगणी : पाहेन भरुणी : डोळे मुष : ॥ ३ ॥ नीर्लज होउनी नाचैन रगणी : येउं नेदी मनीं : संका काही : ॥ ४ ॥ आकीतां आकीला दास तुझा देवा : सकल्प हा जीवा तुका म्हणे : ॥ ५ ॥

## ७२२

कांही नीत नेमेवींण आनं षाये : तो सीवाण वांयां : मनुस्येपण भार वाहे व्रशभ : ॥ १ ॥ धृ ॥ त्याचा होये भुमीभार : नेणे यातीचा आचार : जाला दावेदार : भोगी आघोर पीत्रासी : ॥ छ ॥ अषंड आशुभ वार्णा : नो षरें नो बोलें स्वन्पी : पापी तयाहुणी नाही दुसरा : ॥२॥ पोट पोसी येकला : भुती दया नाही ज्यालां : पाठीं लागे आल्या : अतीताचें दारेसी : ॥ ३ ॥ कांही संतांचें पुजन : न घडे तीर्थाचें भ्रमन : येमाचा अंदना : सीण थोर पावैल : ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याणी : मनुस्यपणा केली हाणी : देवा वीसरोणी : गेली म्हणता मी माझें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १ ॥ छ ॥

७२३

[ व. पृ. १५८ ] अवघ्या वाटा जाल्या क्षीण : कळी न घडे साधन : उचीत वीधान : न कळे न घडे सर्वथा : ॥ १ ॥ धृ ॥ भग्तीपंथ बहु सोपा : पुण्ये नांगवे या पापा : येणे जाणे षेपा : येके येणे षुटती : ॥ छ ॥ उभारुनी बाह्ये वीठोबा पालवीत आहे : दासा मी च साहें : मुषें बोलें आपुला : ॥ २ ॥ भावीक वीस्वासी : पार उतरीलें त्यासी : तुका म्हणे नासी : कुतर्कांचें कपाळी : ३ ॥ छ ॥ छ ॥ ~

७२४

कास घालुनी बळकट : जालो कळीकाळासी नीट : केली पायेवाट : भवसींधु वरुनी : ॥ १ ॥ धृ ॥ या रे या रे लाहाण थोर : याती भलते नारी नर : करावा वीचार : न लगे चीतां कोन्हासी : ॥ छ ॥ कामी गुतलें रीकामे : जपी तपी येथे जमे : लावीलें दमांमे : मुत्क आणी मुमुंक्ष : ॥ २ ॥ येकंतर सीक : पाठवीला येह्ये लोका : आलो म्हणे तुका : मी नामाचा धारक : ॥ ३ ॥

आरती तुकोबाची ७२५

जगदेश जगदेश : तुज म्हणती : परी या जनामाजी अससील युग्ती : पुन्येपापवीरहीत : सकळां अधीपती : द्रुस्टापरी नळ नीळ अलीप्त गती : ॥ १ ॥ धृ ॥ जे देव जे देव जे पंढरीनाथा : नुरे पाप वीठल म्हणतां सर्वथा : ॥ छ ॥ आगमं नीगमं तुज नेणती कोण्ही : परी तुं भाव भग्ती जवळी च दोन्ही : नेणतां वीध युग्त राते पुजनी : न माये ब्रम्हांडी संपुस्ट सयेनी ॥ २ ॥ आसुरा काळ भासें वीक्राळु पुढें : पसरी मुष येक चावीतो धुडें : भग्तां शरणांगतां चालोतो पुढे : दावी वाट जाउं नेंदी वाकुडें : ॥ ३ ॥ येकायेकी बहु वीस्तारला सुषें : षेळ लीळा त्यासी तो ची कवतुके : तेथे नरनारी कवण बाळकें : ॥ काये पापपुन्ये कवण सुषदुषें : ॥ ४ ॥ सकळा वर्मा तु च जाणंसी येक : बंध मोक्षे प्राप्ती आणीं सुषदुष : जाणो म्हणती तुज ठकली बहुतेक : तुका म्हणे आलो शरण मज राष ॥ ५ ॥ छ ॥

आरती ७२६

सुंदर आंगकांती : मुष भाळ सुरेष : बाणली उटी आंगी : टीळा साजीरी रेष : मस्तकीं मुगुट काणी कुंडलें तेज फांके आरगत : दंत हीरे : कैसे जोडीले नीके : ॥१॥ धृ॥ [व. पृ.१५९]जयेजेया चत्रभुजा जया लावनीतेजा :

आरती वोवाळीन : भव तारी हा वोजा : ॥ छ ॥ उदार जुंझार हां जया वाणीती श्रुती : परतल्या नेती म्हणती : तथा न कळे गती : भाट हा चत्रमुष : अनुवाद करीती : पांगली साही अठरा : रुप न कळे गती : ॥ २ ॥ आईकोन रुप यैसें : तुजलागी धुंडीती : बोडीके नग्न येक : नीराहार युग्ती : साधने यौग नाना : तपे दारुणे करीती : सांडीले सुष दील्हा : संवंसारा हा स्याती : ॥ ३ ॥ भरुनी माजी लोका : तीहीं नादसी येक : कामीनीमनमोहणा रुप नाम अंनेक : नासती नाममात्रें : भव पातके शोष : पाउलें वंदीतांती : सीध आणी साधक ॥ ४ ॥ उपमा द्यावयासी : दुजे काय-हें तुज : तत्वासी तत्व सार : मुळ जालासी बीज : षेळसी बाळलीळा : अवतार सहज : वीनवीतो दास तुका : कर जोडुनी तुज : ॥ ५ ॥ छ ॥ २ ॥

## आरती ७२७

काये तुझा महीमा वर्णु मी कीती : नाममात्रे भवपाश तुटती : पाहातां पाउले हे वीस्णु मुर्ती : कोटी कुळासहीत ते उधरती : ॥ १ ॥ धृ ॥ जे देव जे देव जे पंढरीराया : जे पंढरीराया : करुनी कुरुवडी साडीन काया : ॥ छ ॥ मगळ आरतीचा थोर मंहीमां : आणीक द्यावया नाही उपमा : श्रीमुषासहीत देषे तो कर्मा : पासुन सुटे जैसा : रवी नासी तमां : ॥ २ ॥ धन्ये व्रत काळ हे येकादसी : जाग्रण उपवास : घडे जयांसी : वीस्णुचें धुजण : येकां भावेंसीं : नीत मुग्त पुजे : तीहीं लोकांसी : ॥ ३ ॥ न वजे वांयां काळ जे तुज ध्याती : असे तुझा वास : तयाचा चीती : धाले सुषे संदा प्रेमे डुलती : तीर्थ मळीन वाट तयाची पाहाती : ॥ ४ ॥ देव भग्त तुं ची जालासी दोन्ही : वाढावावया सुष : कीर्त ये जनी : जड जीवां उधार होवया लागुणी : शरण तुका वंदी पाउले दोन्ही : ॥ ५ ॥ छ ॥ ३ ॥

## अरती ७२८

दैत्ये भारें पीडली प्रुथवी बाळा : म्हणंउनी येणे तुज जालें गोपाळा : भक्ती प्रतीपाळण : उछाव सोहळा : मंगळें गाती : तुज अभोळ बाळा : ॥१॥ [ व. पृ. १६० ] ॥ धृ ॥ जये देव जये देव : जये गरुडध्वजा : आरती वोवाळीन तुज भग्तीकाजा : ॥ छ ॥ गुण रुप नाम : नाही जयासी : चीतीतां तैसा होसी तयांसी : मछ कुर्म वऱ्हा नरसीही जालासी : असुरा धाक मुनी ठाके ध्यानासी : ॥ २ ॥ संतां मंतां घरीं म्हणवीं म्हंणयारा :

संष चक्र गदा योध्यांचा भारा : सुद्रसेण घरटी फीरे आवस्वरा : सकुमार ना स्थुळ : होसी गोजीरा : ॥ ३ ॥ सहस्रनामे रुपें सावळा ना गोरा : श्रुती नेती म्हणती तुज वीसभरा : जीवनाजीवन तु च होसी दातारा : न कळें पार ब्रंम्हांदीकां सुरवरां : ॥ ४ ॥ भावेवीण तुझें न घडे पुजन : सकळ गगा जाल्या तुजपासुन : उत्पती प्रळयो : तुं चं करीसी पाळण : धरुनी राहीला तुका नीस्चेइ चरण : ॥ ५ ॥ ४

७२९

आलीया भोगासी : आसांवे सादर : देवावरी भार : घालुनीयां : ॥१॥ ॥ धृ ॥ तो ही कृपासीधु नीवारी सांकडी : येरे ती बापुडी काये रके : ॥ छ ॥ भयाचीये पोटी दुषाचीयां रासी : शरण देवासी : जातां भलें : ॥ २ ॥ तुका म्हणे काये नव्हे त्या करीतां : चींतांवा तो आतां : वीस्वभर : ॥ ३ ॥

७३०

भोग तों न घडे संचीतां वांचुनी : करांवें तें मनी समाधान : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ म्हणउनी मनी मानु णये षेद : म्हणावा गोवींद वेळोवेळा : ॥ छ ॥ आर्णीकां रुसावें न लगे बहुतां : आपुल्या संचीता वाचुनीयां : ॥ २ ॥ तुका म्हणे भार घातलीया वरी : होवील कैवारी नारायेन : ॥ ३ ॥ छ ॥ छ॥ २

७३१

नीरवैर होवें सर्व भुतांसवें : साधन बरवें हें ची येक : ॥ १ ॥ धृ ॥ तरी अंगीकार करी नारायेन : ॥ बडबड सीण येणेवीण : ॥ छ ॥ सोईरे पीसुन यां घडें : चीत परी वोढे उपकारी : ॥ २ ॥ तुका म्हणे चीत जालीयां नीर्मळ : तरी च सकळ केलें होये : ॥ ३ ॥ छ ॥ १

७३२

दील्ही चालें वाचा : क्षेये मागील्या तपाचा : ॥ १ ॥ धृ ॥ रीधी-सीधी येती घरा : त्याचा लुटीती पसारा : ॥ छ ॥ [ व. पृ. १६१ ] मान-दंभांसाटी : पडे देवासवें तुटी : ॥ २ ॥ तुका म्हणे मेवा : कैचा वेंठीच्या नर्देवा : ॥ ३ ॥ छ ॥

७३३

नव्हे जाषावी जोषावी : मायेराणी मेसाबाई : ॥ १ ॥ धृ ॥ माझा बळीया पंढरीरावो : जो या देवाचा ही देव : ॥ छ ॥ नव्हे रडीचंडी,शत्की :

मंदें मांउस भक्षीती : ॥ २ ॥ नव्हे बहीरवं षंडेराव : सुटी रोटीसाटी देव : ॥ ३ ॥ नव्हे गणोबा वीक्रळ : लडु मोदकचा काळ : ॥ ४ ॥ मुंजे म्हैसा सुरे : हे तो कोण लेंषी पोरें : ॥ ५ ॥ वेताळे फेताळे : जळो त्याचें तोंड काळे : ॥ ६ ॥ **तुका** म्हणे चीतीं : धरा लक्षुमीचा पती : ॥७ ॥ छ ॥

७३४

येणें मुषें तुझें वाणी गुणनाम : तें ची मज प्रेम देई देवा : ॥ १ ॥ डोळे भरुनीयां पाहे तुझे मुष : ते ची मज सुष देई देवा : ॥ २ ॥ कान भरुनीयां आईके तुझी कीर्ती : ते मज वीस्रती देई देवां :॥३॥ वांये रंगी टाळी नाचैन उदास : हे देई हातास पायां सुष : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे माझा सकळ देहभाव : आणीक नको ठाव : चींतुं त्यांसी : ॥ ५ ॥ छ ॥

७३५

तुं माझा मायेबाप : सकळ वीत गोत : तु ची माझें हीत करीता देवा : ॥ १ ॥ तुं माझा देव : तुं माझा जीव : तुं माझा भाव : पांडुरंगा : ॥ २ ॥ तु माझा आचार : तु माझा वीचार : तुं च सर्व भार : चालवीसी : ॥ ३ ॥ सर्व भावें मज तुं होसी प्रमाण : येसी तुझी आण वाहातुसें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुज वीकला जीवभाव : कळे तो उपाव करी आतां : ॥ ५ ॥ छ ॥

७३६

वारेवार तुज द्यावया आठव : आईक तो भाव माझा कैसा : ॥ १ ॥ गेला मग न ये फीरोनी दीवस : पुढीलाची आस गणीत नांहीं : ॥ गुण-अवगुणाचे पडती आघात : तेणे होये चीत कासावीस ॥ ३ ॥ कांहीं येक तुझा नेदषे आधार : म्हंणउनी धीर नांही जीवा : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुं ब्रम्हांडाचा जीव : तरी का आम्ही कीव : भाकीतसो : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

७३७

[व.पृ.१६२] जनी जनार्दन आईकोतो मात : कैसा तो वुतांत न कळे आम्हा : ॥ १ ॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग : व्याधी नाना रोग : सुषदुषें : ॥ २ ॥ पापपुण्ये सुधासुध : आचरणें ही कोणा कारणे कवणे केली ॥ ३ ॥ आम्हा मरण नास तुं तुवा आवीनास : कैसा हा वीस्वास साच मानु : ॥ ४ ॥ तुका म्हणे तुं च नीवडी हा गुढार : दाषवी साचार : ते ची मज : ॥ ५ ॥ छ ॥

७३८

आंसोत हे तुझे प्रकार सकळ : काये षळ षळ करावी हे : ॥ १ ॥ आमचें स्वहीत जाणोतसों आम्हीं : तुझे वर्म नामी आहे तुझा : ॥ २ ॥ वीचारीतां आयुस्ये जातें वांयांवीण : रोज नागवण : पडतीस : ॥ ३ ॥ राहेन मी तुझे पाये आठउनी : आणीक ते मनी : येंउं नेंदीं : ॥ ४ ॥ तुका म्हणे येथे येसी अनंयासे : थोर तुज पीसे कीर्तनाचे : ॥ ५ ॥ छ ॥ ५

७३९

कन्यां गौ करी कयेचा वीकरा : चांडळ तो षरा तया नावे : ॥ १ ॥ गुण आवगुण हे दोन्ही परमान : यातीसी कारण नाही देवा : ॥ २ ॥ आशा-बध नये करुं तें करीती : तुका म्हणे जाती नरका मधे : ॥ ३ ॥ छ ॥

७४०

येथार्थ वाद सांडुनी उपचार : बोळती ते आघोर भोगीतील : ॥ १ ॥ चोरास धरीतां सांगें कुंठोन्यार्चे नावें : दोघाचे ही पाव हात जाती : ॥ २ ॥ तुका म्हणे असें पुरानी णीवाड : माझी बडबड नव्हे कांहीं ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

७४१

येका नेणतां नाडली : येकां जाणीवेची भुली : ॥ १ ॥ धृ ॥ काये बोळो नेणे मुके : वेडें वाचाळ कोण नीके : ॥ छ ॥ दोहीस वानाड : वीहीर येकीकडे आड : ॥२॥ तुका म्हणे कर्म : तुझें कळो नेदी वर्म : ॥३॥ छ ॥ १

७४२

वीस्णुंदासां भोग : जरी आम्हा पीडी रोग : ॥ १ ॥ धृ ॥ तरी हें दीसे ळाजीरवाणें : काये तुम्हासी सांगणें : ॥ छ ॥ आम्हां काळें षवें : बोलीलों तें वांयां जावें ॥ २ ॥ तुका म्हणे दास : आम्ही भोगुं गर्भवास : ॥ ३ ॥ छ ॥

७४३

पतीत पतीत आम्ही त्रीवाचा पतीत : ॥ १ ॥ धृ ॥ परी तों आपुलीया सतां : मज करावें सरता : ॥ छ ॥ नाही चीत सुधी : स्थीर पांयांपासी बुधी : ॥ २ ॥ [ व. पृ. १६३ ] आपराधच्या केलों : तुका म्हणे कीती बोलो : ॥ ३ ॥ छ ॥

७४४

म्हणवीतों दास : येव्हेडी च मज आस : ॥ १ ॥ धृ ॥ षरी ते आंगी नाही वर्म : करी आपुला तुं धर्म : ॥ छ ॥ बडबडीतों तोंडें : रीते भावेंवीण वेडें ॥ २ ॥ तुका म्हणे बरा : दाउं जाणोतो पसारा : ॥ ३ ॥ छ ॥

७४५

पुजा समाधान : अतीशय वाढे सीण : ॥ १ ॥ धृ ॥ हे तो जाणा तुम्ही संत : आहे बोलीली ते नीत : ॥ छ ॥ पाहीजे ते केले : सहज प्रसंगी घडलें : ॥ २ ॥ तुका म्हणे माथा : माझा पाई तुम्हां संता : ॥ ३ ॥ छ ॥ ४

७४६

सहज आळस : वरी गुरुउपदेस : ॥ १ ॥ धृ ॥ मग कैंची आडकाठी त्यासी वीटाळाचे भेटी : ॥ छ ॥ नाचरवे कर्म : नव्हे उचीताचे धर्म : तुका म्हणे तें गा घेती नामा नामा गे धा : ॥ ३ ॥ छ ॥

७४७

भावें गावे गीत : शुध करुनी राषे चीत : ॥ १ ॥ धृ ॥ जरी होवा तुज देव : तरी हा सुलभ उपाव : ॥ छ ॥ आणीकाचे कांणीं : गुण दोश न धरी मणी : ॥ २ ॥ मस्तक ठेंगणा : करी संताच्या चरणा : वेची तें वचण : जेणे राहे समाधान : ॥ ४ ॥ तुका म्हणे फार : थोडा पर उपकार : ॥ ५ ॥ छ॥

७४८

दया क्षेमा संगती : तेथे देवाची वसती : ॥ १ ॥ धृ ॥ पावे धावोनीयां धरा : राहे धरुनीयां थारा : ॥ छ ॥ कीर्तनाचे वाटे : बराडीया यैसा लोटे : ॥ २ ॥ तुका म्हणे घडे : पुजा नामें देव जोडे : ॥ ३ ॥

७४९

समुद्रवळयांकीत : प्रुथुवींचें दान : करीतां समान : न ये नांमां : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी कोन्ही न करावा अळस : म्हणा रात्रदीवस : रामं रामं : ॥ छ ॥ सकळ ही तीर्थे प्रयाग कासी : करीतां नामासी तुळेती ना : ॥ २ ॥ सकळ ही शास्त्रें पठन करीतां वेद : सर नये गोवीद : नामे येकें : ॥ ३ ॥ कर्वती कर्मरीं देहासी दंडण : करीतां समान न ये नांमा : ॥ ४ ॥ तुका म्हणे यैस आहे सीस्टाचार : नांम हे ची सार : वीठोबाचें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ १ छ ॥

७५०

[व. पृ. १६४] हरीहरा भेद : नांहीं करुं नये वाद : ॥ १ ॥ धृ ॥ येक येकाचे ऱ्हुदई : गोडी साषरेंचा ठांई : ॥ छ ॥ भेदकांसी नाड : येकी वेलाडी च आड : ॥ २ ॥ उजवे वांमांग : तुका म्हणे येक आंग : ॥ ३ ॥

७५१ साधु

असे असयाने भेटती ते साधु : ज्याच्या दरुसेणे तुटे भवबंधु : जयां सचीदानंदीं नीत्यानंदुं : जे कां मोक्ष्य सीधी तीर्थ बंदु : रें : ॥ छ ॥ भाव सर्व कारण मुळ बंधु : सदा सम बुधी नास्ती भेदु : भुत कृपा मोडी द्वेशकंदु : शत्रु मीत्र पुत्र समं करी बंधु रे : ॥ १ ॥ मन बुधी काया वाचा शुध करी : रुप देषोन सर्व नमस्कारी : लघुत्व सर्व भावें अंगींकारीं : सांडीं मांडी मीं : तुंपण येसी थोरी रे : ॥ २ ॥ आर्थ कामं चाड नाहीं चींतां : मानामान मोहो माया मीथ्या : वते समांधानी जाणोनी नेणतां : साधु देंती भेटी तया अवचीता रे : ॥ ३ ॥ मनी द्रुढ धरी वीस्वास : नाहीं सांडी माडीचें सायास : साधु दरुसेणे नीत्यकाळ त्यास : तुका म्हणे जो वीटला जाणीवेस रे : ॥ ४ ॥ छ ॥ १ ॥

७५२

सीशाची जो ने घे सेवा : मानी देवासारीषे : ॥ १ ॥ धृ ॥ त्याचा फळ उपदेश : आणीकां दोश उफराटे : ॥ छ ॥ त्याचें घरें ब्रह्मज्ञान : उदासीन-देहभावें : ॥ २ ॥ तुका म्हणणे सेत्य सागें : योत रागें येतो ते : ॥ ३ ॥ छ ॥

७५३

तंका[१] सीशा मान : दुग्धां म्हणे नारायेन : ॥ १ ॥ धृ ॥

७५४

तापल्या वांचुणी नव्हे आळंकार : पीटोनीयां सार उरैल तें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ मग कदाकाळी नव्हें शुध जाती : नाशं शत्रुहाती : मीत्रु ते ची : ॥ छ ॥ [ व. पृ. १६५ ] कळीवर बरें मोगुं यावें भोगा : फांसीलें तें रोगा : हाती सुटे : ॥ २ ॥ तुका म्हणे मन करांवें पाठेळ : सहावे ची जाळ सीजेवरी : ॥ ३ ॥

७५५

पाठेळ करीतां न साहावे वारा : साहीलीयां ढोरा गोणी चालें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ आपली आपणां हे ची कसवटी : हरशामरश पोटी : वीरों यावे : ॥ छ ॥ नवनीत वरी कडकडी लोनी : नीस्चळ होउनी राहे मग : तुका म्हणे जरी जगे टाकी घाया : त्याच्या पडे पांयां जन मग : ॥ ३ ॥ छ ॥

---

१ हा अभंग मागें पृ. २२ वर १२० वा आला आहे. सबब येथें सर्व घेतला नाहीं.

७५६

वचन तें नांही तोडीत शरीरा : भेदत अंतरा : वज्रा यैसें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ कां हें न साहावे कारीयाकारण : सांधे हें नीधान : देह बळी : ॥ छ ॥ नाहीं शब्द मुषी लागत तीषट : नाही जड होंत पोट तेणे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जरी गीळे आहंकार : तरी वसे घर नारायेणें : ॥ ३ ॥ छ ॥

७५७

धीर तो कारण : साहे होतो नारायेण : नेदी होउं सीण : वाहो चींतां दासांसी : ॥ १ ॥ धृ ॥ सुषें करावें कीर्तण : हरुशे गावें हरीचे गुण : वारी सुद्रशन : आपण ची कळीकाळा : ॥ छ ॥ जीव वेची माता : बाळा जडभारीं होतां : तो तों नव्हे दाता : प्राकुतां सारीषा : ॥ २ ॥ हें तो माझ्या अनुभवें : अनुभवा आलें जीवें : **तुका** म्हणे परी सत्ये हवे : आहाच ना ये कारणा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

७५८

पुंढें आतां कैंचा जन्म : यैसा श्रम वारेसा : ॥ १ ॥ धृ ॥ सर्वथा ही फीरों नये : यैसी सोये लागलीया : ॥ छ ॥ पांडुरंगा यैसी नाव : तारूं भाव असतां ॥ २ ॥ **तुका** म्हणे चुकती बापा : पुन्हा षेपा सकळ : ॥ ३ ॥

७५९

दुध दही ताक पसुचे पाळण : त्यामधी कारण : घृत सार : ॥ १ ॥ हे ची वर्म आम्हा भावीकांचे हाती : म्हणउनी चींती धरीला राम : ॥ छ ॥ लोहो कफ गार अग्नीचीया काजें : येऱ्हवी ते वोझे कोण वाहे : ॥ २ ॥ [ व. पृ. १६६ ] **तुका** म्हणे षोरी पाहारा जतन : तोवरी हें धन : हाती लागे : ॥ ३ ॥ छ ॥

७६०

माझी मेलीं बहुवरी : तुं कां जैसा तैसा हरी : ॥ १ ॥ धृ ॥ वीठो कैसा वाचलासी : आंतां साग मजपासी : ॥ छ ॥ तुज देषतां ची माझा : बाप गेला आजा : पणजा : ॥ २ ॥ आम्हां लागलेंसे पाठी : बाळत्व तारुन्ये काठी : ॥ ३ ॥ तुज फवलें तें मांगें : कोन्ही नसतां वादी लागें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तुझा आंगी : मज देषी लागली औघी ॥ ५ ॥ छ ॥

७६१

वीर वीठलाचे गाढे : कळीकाळ पांयां पडे :॥ १ ॥ धृ ॥ करीती घोश जयेजयेकार : जळती दोशांचें डोंगर :॥ छ ॥ क्षेमा दया शांती : बान अभंग ते हाती : ॥ २ ॥ तुका म्हणे बळी : ते ची येक भुमंडळी :॥ ३॥

७६२

धणी नुपरे गुणं गातां : रुप द्रुस्टी न्यांहाळीता :॥१॥ धृ॥ बरवा बरवा पांडुरंग : कांती सावळी सुरग :॥ छ ॥ सकळ मंगळाचें सार : सुषसीधींचें भांडार :॥ २ ॥ तुका म्हणे या सुषा : नाही पार नव्हे लेषा : ॥ ३ ॥ छ ॥

७६३

आईके रे जना तुझीया स्वहीताच्या षुनां : पंढरीचा रानां : मना माजी स्मरावा : ॥ १ ॥ धृ ॥ मग कैंचे रे बंधन ॥ वाचे गातां नारायेण : भवसींधु तो जाण : ये च तीरी सरैल :॥ छ ॥ दास्ये करील कळीकाळ : बंध तुटे मायाजाळ : होतील सकळ : रीधीसीधी म्हणयारी : ॥ २ ॥ सकळ स्यास्त्रांचें सार : हे ची वेदाचें गव्हार : पाहातां वीचार : हा च करीती पुराणें : ॥ ३ ॥ ब्राह्मण क्षेत्री वैस्य शुद्र : चांडाळांहीं आधीकार : बाळे नारी नर : आदी करुनी वैस्या ही : ॥ ४ ॥ तुका म्हणे अनुंभवें : आम्हीं पाडीयेलें ठावें : आणीक ही दैवें : सुष घेती भावीक :॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

७६४

बरा कुणबी केलो : नाहीतरी डंबें असतों मेलो ॥ १ ॥ धृ ॥ भलें केलें देवराया : नाचे तुका लागें पांयां : ॥ छ ॥ वीद्या आसती कांही : तरी पडोतों अभई : ॥ २ ॥ [ व. पृ. १६७ ] सेवा चुकतों संतांची : नागवण हे फुकाची : ॥ ३ ॥ गर्व होता ताठा : जातो येमपंथें वाटा : ॥ ४ ॥ तुका म्हणे थोरपणें : नर्क होतें अभीमानें : ॥ ५ ॥ छ ॥

७६५

अधरा माझ्या मना आईके येकी मात : तुं कं रे इच्छीत नीरतर : ॥ १ ॥ हे ची चीतां काये षावें म्हणउनी । भले तुजहुनी पक्षीराजे : ॥ २ ॥ पाहा ते चातक नेघती या जळा : उभ्रसे उन्हांळं मेघ तयां : ॥ ३ ॥ अवघ्यां याती ठक आगळा सोनार : त्या घरी व्यापार झारीयाचा : ॥ ४ ॥ तुका म्हणे जळी वणी जीव येक : तया जवळी लेष काये असे : ॥ ५ ॥

७६६

कां रे नाठवीसी क्रुपाळु तयासी : पोसीतो जनासी येकला तो : ॥ १ ॥ बाळा दुधा कोण करीतो उत्पती वाढवी श्रीपती सवे दोन्ही : ॥ २ ॥ फुटती तरुवर उस्ण काळमासीं : जीवण तयांसी कोण घाली : ॥ ३ ॥ तुझी कांहीं त्याणें होईल केली चींतां : राहें त्या अंनंतां आठउनी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे ज्याचें नाम वीस्वंभर : त्याच नीरंतर ध्यान करीं : ॥ ५ ॥ छ ॥

७६७

ध्यानी यौगी राजे बैसले कपाटी : लागे पाठोवाठी तयांचीये : ॥ १ ॥ भुक तान त्यांचें राषे सीतउस्ण जाले उदासीन शर्वभावें : ॥ २ ॥ कोण सषे तयां आणीक सोईरे : असे त्यां दुसरे देवावीण : ॥ ३ ॥ कोण सुष त्यांच्यां जीवासी अंनंद : नाही राजेमद त्यांसी घडी : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे वीश अंम्रुतासमान : क्रुपा नारायेन करीतां होये : ॥ ५ ॥ छ ॥

७६८

न करी तळमळ राहें रे नीच्हेळ : आहे हा क्रुपाळ : स्वमी माझा : ॥ १ ॥ अवीनास सुष देवील नीर्वाणी : चुकतील षाणी गर्भवास : ॥ २ ॥ आणीकांही जीवां होईल उधार : ते ही उपकार घडती कोटी : ॥ ३ ॥ अहीक परत्रीं होसील सुषाचा : उचारी रे वाच रामराम : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे सांडी संवंसराचा छंद : मग प्रमानंद पावसील : ॥ ५ ॥ छ ॥

७६९

[व.पृ.१६८] कां रे दास होसी संवंसाराचा षारा : दुषाचे डोंगर भोगांवया : ॥ १ ॥ मीस्टाणाची गोडी जीहुवेचां आगरीं : मशक भरल्यावरी : स्वद नेणें : ॥ २ ॥ आणीक ही भोग आणीकां ईंद्रीयांचें : नाही यैसें साचें जवळी कांही : ॥ ३ ॥ रुप द्रुस्टी धाये पाहातां पाहातां : न घडे सर्वथा : आणी त्रुस्णां : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे कां रे नासीवंतांसाटी : देवासवें तुटी : करीतोसी : ॥ ५ ॥ छ ॥

७७०

बैसोनी नीच्हळ करी त्याचें ध्यान : देईल हा अनंवस्त्र दातां : ॥ १ ॥ काये आम्हां करणे अधीक सांचुणी : देव जाला रुणी : पुरवींतां : ॥ २ ॥ दयाळु मयाळु जाणे कळवळा : शरणागतां ळळा राषों जाणे : ॥ ३ ॥ न लगें मागणें सांगणें तयासी : जाणे ईछा तैसी : पुरवी त्याची : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे लेंई अळंकार आगी : वीठल ह जगी तु ची होसी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ ६॥

७७१

वैस्णव तो जया : अवघी देवावरी माया : ॥ १ ॥ धृ ॥ नाही आणीक प्रमाण : तनधनत्रुण जन : ॥ छ ॥ पडतां जडभारी : नेमा न टळे नीर्धारी : ॥ २ ॥ तुका म्हणे यातीं : हो कां तयाची भलती : ॥ ३ ॥ छ ॥

७७२

सोनीयांचा कळस : सुंरा भरीला माजी रस : ॥ १ ॥ धृ ॥ काये करावें प्रमाण : तुम्हीं जाणां संत जन : ॥ छ ॥ म्रुतीकेचा घट : माजी अंम्रृताचा सांट : ॥ २ ॥ तुका म्हण हीत : ते मज सांगावे त्वरीत : ॥ ३ ॥

७७३

बहुतां जन्मींचें संचीत : सबळ जरी होये बहुत : तरी च होये हरीभत्क : कृपावंत मानसी : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणवी म्हणीयारा तयाचा : दास अपुलीया दासांचा : अनुसरलें वाचा : काया मने वीठली : ॥ छ ॥ असें भुतदया मानसी : अवघा देषे रुसीकेसी : जींवें न वीसंभे तयासी मागमागे हीडतसे : ॥ २ ॥ तुका म्हणे हें नीर्वीकार : शरनांगतां वंरपंजर : जे जे अनुंसरलें नर : [ व. पृ. १६९ ] तयां जन्म चुकलें : ॥ ३ ॥ छ ॥

७७४ सेत

सेत करा रे फुकाचें : नाम वीठला रायाचें : ॥ १ ॥ धृ ॥ नाही वेठे जेवा सारा : जा हाती नांही म्हणीयारा : सरीक नाही रें दुसरा : धणी सारा तुझा तुं : ॥ छ ॥ जपतप नांगरनी : न लगे आटी दुणवणी ॥ २ ॥ कर्म कुळवणी न लगें : धर्म पाळी दोन्ही : ॥ ३ ॥ ज्ञान पाभारे ती फणी : न लगें करावी पेरणी ॥ ४ ॥ बीज न लगे संचीताचें : पीक पीकलें ठाईंचें : ॥ ५ ॥ नांही येमाचें चोरटे : वीठल पागोऱ्याच्या नेंटें : ॥ ६ ॥ अपीक न वजे हा भर्वसा : करी उदेग तो पीसा : ॥ ७ ॥ सारा ये सर्व काळ : वांयां न वजे घटीका पंळ : ॥ ८ ॥ प्रेम पीकलें आपार : नांही सांटवावया थार : ॥ ९ ॥ असये जोडी जो चुंकला : तुका म्हणे धीग त्यालां : ॥ १० ॥ छ ॥ छ ॥

७७५

वाटे या जनाचे थोर बा आच्हर : करीती वीचार कां हीताचा : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ कोण दम यैसा आहे यांचें पोटी : येईल सेवटी : कोण कामा : ॥ छ ॥ काये मानुनीयां राहीले नीच्हीती : ॥ काये जाब देती येमदुतां : ॥ २ ॥ कां ही वीसरली मरन बापुडी : काय यांसी गोडी लागलीसे : ॥ ३ ॥ काये

नांही हा करील तयासी : ॥ काये जाले यांसी काये जाणो : ॥ ४ ॥ कां हे नाठवीती देवकीनंदना : सुटाया बंधना पासुनीयां : ॥ ५ ॥ काये मोल यासी लागें धनवीत : कां हें याचें चीत : घेत नाही: ॥ ६ ॥ तुका म्हणे कांही भोगीतील षाणी : का त्या चक्रपाणी : वीसरली : ॥ ७ ॥ छ ॥

७७६

काये येकां जालें तें का नांही ठावें : काये हे सागांवे काये म्हुण : ॥ १ ॥ धृ ॥ देषतील डोळां आईकती काणी : बोलीलें पुराणी : ते ही ठांवें : ॥ छ ॥ कांये हे शरीर साच की जांन्हार : सकळ वींचार : जाणती हा : ॥२॥ कां हें कळों न ये आपल्या आपणं : बाळत्व तारुण्यें व्रुध दसा : ॥ ३ ॥ कां हें आवडलें प्रीया पुत्र धन : काये कामा कोण कोणां आलें ॥४॥ [वें. पृ.१६०][1] कां हें जन्म वांयां वेतलें उतंम : कां हें रामराम न म्हणती : ॥ ५ ॥ काय भुली यांसी पडीली जाणतां : देषती मरतां : आणीकासी : ॥ ६ ॥ काये करीती ही बांधली या काळें : तुका म्हणे बळें : वज्रफासी : ॥ ७ ॥ छ ॥

७७७

ॐन व्याने सों करी : सेत षादलें पांषंरी : ॥ १ ॥ धृ ॥ तैसा नको षांउं दगा : नीदुसुरा राहोंनी जागा : ॥ छ ॥ चोरासवें वाट : चालोन केलें तळपट : ॥ २ ॥ डोळे झांकुणी राती : कुपी पडीला दीवसा जोती : ॥ ३ ॥ पोसी वांजं गाये : तेथे कैची दुध साये : ॥ ४ ॥ फुटकी सांगडी : तुका म्हणे न पवी थडी : ॥ ५ ॥ छ ॥

७७८

नका घालु दुध जयामधें सार : ताकाचे उपकार : तह्नी करा : ॥ १ ॥ नेंदा तरी हे नका घालुं अंनं : फुकाचें जीवण : तह्नी पाजा : ॥ २ ॥ तुका म्हणे मज सगुनाची चाड : पुरवा कोन्ही कोड : दुर्बळाचे : ॥ ३ ॥ छ ॥

७७९

घरीं रांडा पोरे मरती उपवासी : सांगें लोकांपासी थोरपण : ॥ १ ॥ नेउनीयां घरा दाषवावे काये : काळतोंडा जाय चुकाउनी : ॥२॥ तुका म्हणे आम्ही जाणो त्या प्रमाने : ठकावें हें जन तैसें न हो : ॥ ३ ॥ छ ॥

---

[1] मूळ वहींत पृ. १६९ च्या पुढें १७० च्या ऐवजीं १६० हा च आंकडा चुकीनें पडला असून पुढें हि १६११,६२ असा च क्रम अखेरपर्यंत राहिला आहे. म्हणजे मूळ वहींत १० पृष्ठांक चुकले आहेत.

७८०

चीरगुटें घालुनी वाढवीले पोट : गह्लुवार बोभाट लोकांमधे : ॥ १ ॥ लटीके ची डोहोळे दावी प्रकार : दुध स्थीनी पोर : नाहीं पोटी : ॥ २ ॥ तुका म्हणे अती वांज ते ची घरी : फजीती दुसरी : केली वार्या : ॥ ३॥छ॥

७८१

सेत आलें सुगी साभाळवे च्याह्नी कोण : पीक आलें परी केलें पाहीजे जतन : ॥ १ ॥ धृ ॥ सोंहुं करी सोहु करी : वीसांवां तो वरी : नको उभें आहे तों : ॥ छ ॥ गोफनसी गुंडा सांडी पागोऱ्याच्या नेटे : पळती हाहाकारी अवघी पांषराची थाटें : ॥ २ ॥ पेटउनी अगी राहे जागा पालटुनी : पडी-लीया माने बळ बुधी होवी दोन्ही : ॥ ३ ॥ षळे दाने वीस्व सुषी करी होतां रासी : सारा सरुनीयां ज्यांचे भाग देई त्यासी : ॥ ४ ॥ [ व. पृ. १६१ ] तुका म्हणे मंग नाही आपले कारण : नीज आलें हाता भुस साडीलें नीकन : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

काला ७८२

कवळाचीया सुषें परब्रम्ह जालें गौरषें : हात गोउन षाये मुषे : ॥ बोटां सांदी लोनचें : ॥ १ ॥ धृ ॥ कोण जाणे तेथे कोण लाभ : कां तें ब्रम्हांदीका दुर्लभ ॥ छ ॥ घाली हमांमा हुंबरी : पावा वाजवी छंदे मोहोरी : गोपाळाचे फेरी : हरी छंदें नाचतुसें : ॥ २ ॥ काये नव्हेतें घरी षावया : रीघे लोणी चोरावया : तुका म्हणे तयासंवें आम्ही सोकावलो : ॥ ३ ॥

काला ७८३

आम्ही हरीचें सवगडे : जुने ठाईचे वेडे बागडे : हाती धरुण पाठीकडे : वाहोन संवें वागवीलें : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी भीन भेद नाहीं : जीव आम्हां देवा येक दोंही : नाही जालों कही येकायेक वेगळे : ॥ छ ॥ नीद्रा करीतां होतों पांई : लंका घेतली संवंच तंई : मांकडें गोवळें गाई : चारीत सवें फीरतसों : ॥ २ ॥ आम्हं नामाचें चीतंन : राम कुश्ण नारायेन : तुका म्हणे क्षीण : षातां जेवीतां न वीसंभो : ॥ ३ ॥ छ ॥

साषी ७८४

काफर सोही आपण बुझे : आला दुनीयां भर : ॥ कहे तुका तुम्हें सुन रे भाई : हींरीदा जीन्होका कंठोर : ॥ १ ॥ छ ॥

साषी ७८५

भीस्त न पावे मालथी : पढीया लोक रीझाये : नीचा जगथें कमतरीण सो ही सो फल षाये : ॥ १ ॥

उतराधी.७८६

हरीसुं मील देष येक ही बेरे : पाछे तु फीर नावे घर : ॥ १ ॥ धृ ॥ मात सुनो दुती आवे मनावन : जांयां करीती : भर जोबन : ॥ २ ॥ हरीसु मोही कहीयां न ज्याये : तब तुं बुझें आंगों पाये : ॥ २ ॥ देष ही भावा कछु पकडी हात : मीलाई तुका प्रभुसात : ॥ ३ ॥ छ ॥

७८७

॥ धृ ॥ क्या कहुं नही बुझत लोका : लीज्यावे जम मारत धका : क्या जीवनेकी पकडी आसा : हातों लीया नहीं तेरा घांस : ॥ १ ॥ कीसे दीवाने कहता मेरा : छुटे जावे तन तुं सब ल्यां नेरा : ॥ कहे तुका तु भया दीवाना : आपना बीच्यार कर ले जना : ॥ ३ ॥ छ ॥

उतराधी ७८८

[व. पृ. १६२] ॥ धृ ॥ कब मरुं पाउं चेरन तुम्हां रे : ठाकुर मेरे जीवन प्यारे : ॥ छ ॥ जेग डरे ज्याकु सो मोही मीठा : मीठा डर अंनदमाही पैठा : ॥ १ ॥ भला पांउं जनम ईन्हं बेरे : ॥ बस मायाके अबंसंग फेर : ॥ २ ॥ कहे तुका धन मान हीं दारा : वो ही लीये गुडलीये पसारा : ॥ छ ॥ ३ ॥ छ ॥

७८९

तुका दास राम का मनमे येक ही भाव : तो न पालटु अब ही यो तन ज्याव : ॥ १ ॥ छ ॥

साषी ७९०

तुका रामसुं चीत बांध राषु : तैसा आपणी हात धेनु बछरा छोर ज्याव प्रेम न सुटे सात : ॥ १ ॥ छ ॥

७९१

चीतसुं चीत जब मीले तब तन थंडं होये : तुका मीलना जीन्हंसु यैसा बीरला कोये : ॥ १ ॥ छ ॥

७९२

तुका बस्तर बीच्यारा क्या करे रे : ज्या को चीत भगवा(न) होये : भीतर मैला कैंउ मीटे जो मरे उपर धोये : ॥ १ ॥ छ ॥

७९३

चीत मीले तो सब मीले : न ही तो फोकट संग : पाणी पाथर येक ही ठोर कोरण भीगे अंगे : ॥ १ ॥

७९४

तुका संग तीन्हंसु कहीये जीनथें सुष दुनाये : दुर्जन तेरा मुष काला थीता प्रेम घटाय : ॥ १ ॥ छ ॥

७९५

तुका मीलना तो भला मनसु मन मील जाये : उपर उपर माटी घसणी नेन्हकी कोण बराई : ॥ १ ॥ छ ॥

७९६

तुका जग भुला रें कह्या न माने कोये । हात परे जम कालके तब मारत फोरे डोये : ॥ १ ॥ छ ॥

७९७

तुका कुटुव छोरे लरके जोरु सीर मुडाये : जबथें ईछा नही मुई : तब तु कीया काये : ॥ १ ॥ छ ॥

७९८

तुका ईछा मीट गई : तो काहा करें जट षाक : मथीया गोला डार-दीया तो नही मीलें फीर ताक : ॥ १ ॥

७९९

क्या गांउ कोण सुननवाला : देषु तो सब ही जग भुला : ॥ १ ॥ [ व. पृ. १६३ ] धृ ॥ षुलें अपणे राम ही सात : जैसी तैसी कर ही मात : ॥ छ ॥ कां हती मधुर वानी : रीझ्ये जेग यैसी बीरानी : ॥ २ ॥ गीरीधर लाल तो भाव ही भुका : राग कला नही जाणत तुका : ॥ ३ ॥ छ ॥

८००

दास पाछे दौरे राम : सोवे षडा आपे मुकाम : ॥ १ ॥ धृ ॥ प्रेमरसडी बाधी गलें : षैच च्यलें उधर ॥ छ ॥ आपणे जाणसुं भुल न देवे : कर ही धर आप्यें बाट बतावें : ॥ २ ॥ तुक प्रभु दीनदयाल वारी रे तुज पर हुं गोपाल : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

## ८०१

येसा कर घर आवे राम : यौर धदा सब छोर ही काम : ॥ १ ॥ धृ ॥ ईतने गोते काहे षाता : जब तु आपन भुल न होता : ॥ छ ॥ अंतरज्यामी जाणत साच्या : मनका यक उंउपर वाच्या ॥ २ ॥ **तुका** प्रभु देस बीदेस : भरीया षाली नहीं लेंश : ॥ ३ ॥ छ ॥

## ८०२

॥ धृ ॥ मेरे रामको नाम ज्यो लेंवे बारेबार : त्याके पाउं मेरे तनके पैज्यार : ॥ छ ॥ हासते षेलते च्यलेते बाट षाणा षाते सोवते षाट : ॥ १ ॥ जातनसुं मुजे कछु नही प्यार : असताकी नही हीदु घेड चंभार : ॥ २ ॥ ज्याका चीत लागा मेर रामको नांम : कहे **तुका** मेरा चीत लागा त्याके पाउं : ॥ ३ ॥ छ ॥

## ८०३

आप तरे त्याकी कोण बराई : आउरणकुं भलो नाव धराई : ॥ छ ॥ काहे भुमी येतना भार : राषे : डुभत धेनु नही डुध चाषे : ॥ १ ॥ बरसत मेघ फलत हे बीरषा : कोण काम अपणी उन्होती रीषा : ॥ २ ॥ काहे चंद्रा सुरीज षावे फेरा : षीन येक बैठ नही नही पावत घेरा : ॥ ३ ॥ काहे परीस कंचन करे धातु : नही मोल तुटे न ही पावत घातु : ॥ ४ ॥ कहे **तुका** उपकार ही काज : सब ही कर रही या रघुराज : ॥ ५ ॥

## ८०४

॥ धृ ॥ जग चले उस बाट : कोण जाये : नहीं समजत फीरे तो ही गोदे षायें : ॥ छ ॥ [ व. पृ. १६४ ] नही येक दो सकल संवंसार : जो बुझे सो आगला स्वार : ॥ १ ॥ उपर स्वार बैठे त्रुस्णापीठ : नही बांचें कोई जावे लुट : ॥ २ ॥ देष ही डर फीर बैठा **तुका** : जोवत मारग राम ही येका : ॥ ३ ॥

## ८०५

॥ धृ ॥ भले रे भाई जीन्हो कीया चीज : आछा नंही मीलत बीछ : ॥ छ ॥ फीरत फीरत पाया सार : मीटत लोले धन कीनारा : ॥ १ ॥ तीरथ बरत फीर पाया जोग : नही तळमळ तुटती भवरोग : ॥ २ ॥ कहे **तुका** मैं ताको दास : नही सीरभार चलावे पास : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८०६

॥ धृ ॥ लाल कबली ओढे पेनाये : मोसुं हरीथे कैसे बनाये : ॥ छ ॥ काहे सषी तुंम्हें करीती सोर : हीरीदा हरीका कठीण कठोर : ॥ १ ॥ नंहीं कीरीया सरुम कछु लाजे : अउ सुनांउ बहुत हे भाजे : ॥ २ ॥ और नाम रुप नही गोवरीया : तुका प्रभु माषन षैया : ॥ ३ ॥

८०७

तुका[1] वस्तर बीच्यारा क्या करे : जो चीत भगवान होये : भीतरी मैला केंउं मींटे जो मरे उपर धोये : ॥ १ ॥

८०८

द्रीद मेरे सांईयांके तुका चालावे पास : सुरा सो ही लडे हमसुं छोडें तनकी आस : ॥ १ ॥

८०९

॥ धृ ॥ राम कहो जीवना फल सो ही : हरी भजनसुं बीलंब न पाई : ॥ छ ॥ कवणका मंदीर : कवणकी झोंपरी : येक रामबीन : सब ही फुकरी : ॥ १ ॥ कवनकी काया कवणकी माया : येक रामबीनं सवं ही जांयां : ॥२॥ कहे तुका सब ही चलन्हारा : येक रामबीन नंहीं वासार :॥३॥छ॥

८१०

॥ धृ ॥ काहे भुला धन संपती घोरे : रामनाम सुनं गाउ हो बापु रे : ॥ छ ॥ राजे लोक सब कहे तु आपणा : जब काल नही पाया ठाणा : ॥१॥ माया मीथ्या मनका सब धंदा : तज अभीमान भज गोवीदा : ॥ २ ॥ [ व. पृ. १६५ ] राना रंक डोगरकी राई : कहे तुका करे ईलाही : ॥ ३ ॥ छ ॥

८११

॥ धृ ॥ काहे रोवे आगले मरना : गंह्वांर तु भुला अपणां : ॥ छ ॥ केते मालुम नही पडे : नन्हे बडे गये सो : ॥ १ ॥ बाप भाई लेषा नंही : पीछें तुं ही चलन्हांरा : ॥ २ ॥ कालें बाल सीपेते भये : षबर पकडे तुका कहे : ॥ ३ ॥ छ ॥

८१२

राम राम कह रे मन औरणसुं नंही काज : बहुत उतारे पार आघे रष तुकाकी लाज : ॥ १ ॥ छ ॥

---

१ मागें पृ. १५१ वर ७९२ वा ह्या च अभंग आला आहे.

८१३

लोभीके चीत धन बैठा कामीनके चीत कांम : माताके चीत पुत बैठा तुकाके चीत रांम : ॥ १ ॥ छ ॥ **तुका** पंषी बहीरीन माने और जनवर भाग : असंतनकुं संत न माने षीजे वरमके डाग : ॥ १ ॥ छ ॥

८१४

तुकारामं बहुत मीठा रे भर राषु शेरीर : तनकी करुं नावडी उतारुं पैल तीर : ॥ १ ॥ छ ॥ छ ॥

८१५

संतन पन्हंयां ले षडा रहु ग कुरद्वार : चेलते पीछें हुं फीरुं रज उडते लेउ सीर : ॥ १ ॥ छ ॥ छ ॥

८१६

नामाची आवडी तो ची जाणां देव : न धरी संदेहे काही मनी : ॥१॥ ॥ धृ ॥ यैसे मी हे नाही बोलोत नेणता : आणुनी समता : संताचीया : ॥ छ ॥ नाम म्हणे तया उरलें साधन : यैसे तवं वचन : बोलो नये : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सुष पाव या वचणी : ज्याची सुध दोन्ही : माये बापें : ॥ ३ ॥ छ ॥

८१७

यैसा आणीक कोठे सांगा : पाडुरंगा सारीषें : देवत ये भुमडळी : उधार कळी पावीते : ॥ १ ॥ धृ ॥ कोठे कांही कोठे कांही सोध ठांई स्थळांसी : ॥छ॥ अनेत्रीचें तीर्थी नासें : तीर्थी असे वज्रलेप : पांडुरंगीचे पांडुरंगी पाप आगी राहेना : ॥ २ ॥ यैसी हरें ग्रीजेप्रती : ग्द्य स्थीती सांगीतली : **तुका** म्हणे तीर्थ क्षेत्र : सर्वत्र ते देवत : ॥ ३ ॥ छ ॥

८१८

[ व. पृ. १६७[1] ] पुराणीचा ईतीआसा : गोड रस सेवीला : नव्हेत हे आहाच बोल : मोकळें फोल कवीत्व : ॥ १ ॥ धृ ॥ भावे घ्या रे भावे घ्या रे : येगदां जा रे पंढरीये : ॥ छ ॥ भाग्ये आलत मनुस्यदेहा : तो हा पाहा वीठल : ॥ पापा पुन्यां होईल झाडा जाईल पीडा जन्माची : ॥ २ ॥ **तुका** म्हणे घटापटा : न लगे वाटा शोधाव्या : घ्यावी हाती टाळ दीडी : गावे तोंडी गुणवाद : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ १६६ हा आंकडा मूळ वहीवर घालणेचें राहिलें आहे.

८१९ माहार

मायेबाप जोहार : सारा साधावया आलो वैशकर : ॥ १ ॥ मागील पुढील करा झाडा : नाहीतरी षोडां घालीती जी : ॥ २ ॥ फाको नका रुजु जालीया वाचुन : सांगा जी कोण घरी तीं धन्यां : ॥ ३ ॥ आजी मायेबाप करा तडामोडी : उद्या कोण्ही घडी : राहे ना हो : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे काही न चले बोली : अकर साली : झाडा घेती : ॥ ५ ॥ छ ॥

८२०

सुषे होतो कोठे घेतली सुती : बाधवीला गळा आपले हाती : ॥ १ ॥ धृ ॥ काय करुं बहु गुतंलो आंतां : न ये सरतां मागें पुढें : ॥ छ ॥ होतें गाठी तें सरलें येता : आणीक माथां रीण जालें : ॥ २॥ सों हुं करीली-यावीण गमावीलें पीक : राडा पोरी भीक लावीयेली : ॥ ३ ॥ बहुतांची बहु घेतली घरें : न पडे पुरें काही केल्या : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे कांही न धरावी आस : जांवें सर्वस्व टाकुंनींयां : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

८२१

येउ द्या जी काही वैसकरास : आंतुंन बाहेर घांस : ॥ १ ॥ जो यांवें तों हातं च रीता नाही : कधी तऱ्ही कांही द्यावे : ॥ २ ॥ **तुका** म्हणे उद्या लावीन म्हणे रा : जे दारोदरी भोवताली फीरा : ॥ ३ ॥ छ ॥

८२२

देती घेती परज गेली : घर षाली : करुणीयां : ॥१॥ धृ॥ धावणीयांचे न पडें हाती : षोदली राती काळोषी : ॥ छ ॥ आवघीयांचें अवघें नेलें : काहीं ठेवीलें नाही मागें : ॥ २ ॥ सोंग संपाडुन दावीला भाव : गेला आधी माव : वरी होती : ॥ ३ ॥ [ व. पृ. १६८ ] घराकडे पाहो नयेसे जालें : आमाणत केलें दीवाणीची : ॥ ४ ॥ आंतां **तुका** कोन्हा न लगें हाती : जाली नीस्चींती : बोलो नये : ॥ ५ ॥ छ ॥ ४ ॥

८२३

न मनावे तैसे गुरुचे ही वचन : जेणे नारायेन अतरे तें : आड आला म्हुण फोडीला डोळा : बळीने आधळा : शुक्र केला : ॥ १ ॥ धृ ॥ करी देव तें काये नव्हे येक : कां तुम्ही प्रुथक सीणां वांयां : ॥ छ ॥ उलंघुन भ्रताराची आज्ञ्यां येज्ञपत्न्यां अंनं घेऊन गेल्यां : आवघीची त्यांचें देवें केलें काज : धर्म आणी लाज राषीयेली : ॥ २ ॥ पीतीयासी केला पुत्रें वैराकार : प्रल्हादें

आसुर मारवीला : बहुत वीघ्नें केली तया आड : परी नाही कैवाड सांडी-येला : ॥ ३ ॥ गौळणी करीती देवासी वीभचार : सोडुनी आचार भ्रस्ट होती : तयां दील्हे तें कोण्हांस नाही : आपन ची अतर्बाही जाला : ॥ ४ ॥ देव जो (डे) ते करावे अधर्म : आतरी ते कर्म नाचरावें : **तुका** म्हणे हा जाणोतो कळवळा : म्हणउण आजामेळा उधरीलें : ॥ ५ ॥ छ ॥

८२४

आगी लागो तया सुषा : जेणे हरी न ये मुषा : ॥ १ ॥ धृ ॥ मज होत कां वीपती : पांडुरंग राहे चीती : ॥ छ ॥ जळो तें समुळ : धन संपती उतमं कुळ : ॥ २ ॥ **तुका** म्हणे देवा : जेणे घडें तुझी सेवा : ॥ ३ ॥ छ ॥

८२५

गळा प्रेमसुत्र दोरी : नेतो तीकडे जातो हरी : ॥ १ ॥ धृ ॥ मनसहीत वाचा काया : आवघे दील्हें पंढरीराया : ॥ छ ॥ सता सकळ तया हाती : माझी कीव काकुलती : ॥ २ ॥ **तुका** म्हणे ठेवी तैसें : आम्ही राहों त्याचे ईछे : ॥ ३ ॥ छ ॥

८२६

॥ धृ ॥ सदेवं तुम्हां आवघें आहें : हात पाये चालावया : मुषें वाणी कीर्त काणी : डोळे मुर्ती देषावया : ॥ छ ॥ अंध बहीर मुकी होती : ठकली कीती : पागुळे : ॥ १ ॥ [ व. पृ. १६९ ] घरास अग्न लागोन जागा न पळ तो गा : वाचे ना : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जागा आतां : कांही हीता अपुलीया : ॥ ३ ॥ छ ॥

८२७

वत्क्या आधी मान : गंध अक्षेतां पुजन : श्रोता ईती जाला जाण : तऱ्ही त्या नाही उचीत : ॥ १ ॥ धृ ॥ सीर सर्वांगा प्रमान : येथावीधी कर चरण : धर्माचे पाळन : सकळी सत्यें करांवें : ॥ छ ॥ पट पुत्रा साभाळी : पीता त्याची आग्न्यां पाळी : प्रमान सकळीं : ते मर्यादा कराई : ॥ ३ ॥ वरासनी पाइयाण : तो न मनावा सामान्ये : ॥ येर उपकर्णे : सोनीयांची परी नींचें : ॥ ४ ॥ (सोनि)यांचा पैजन : मुगटमनी केला हींन : जयाचे कारण : तये ठाई आळंकार ॥ ५ ॥ सेवका स्वामीसाटी मान : याचे नाम त्याचे धन : **तुका** म्हणे जाण : तुम्ही संत येदर्थी : ॥ ६ ॥ छ ॥

८२८

कथाकाळींची मर्यादा सगोतो ते भावे वंदा : प्रीतीने गोवींदा : हे चीं येक आवडे : ॥ १ ॥ धृ ॥ टाळ वाद्य गीत न्रुत्य : अंतकरण प्रेमभरीत : वाणीतां तो कीर्त : तद्भावने लेंषावा : ॥ छ ॥ नये अळसे मोडुं आंग : कथे काणवडें ढुंग : हेळणाचा रंग : दावीतां तो चांडाळ : ॥ २ ॥ तोंडी वीडा माने ताठा : थोरपणे घाली गेंठा : चीत नेदी नामपाठा : गोस्टी लावी तो चांडळ : ॥३॥ कथे वीछी मान : आणुनीयां थोरपन : रजां संकोचण : लुगडी सावरी चांडाळ : ॥ ४ ॥ आपण बैसे बाजेवरी : सामान्ये हरीच्या दासां धरी : तरी तो सुळावरी : वाईजेल नस्चयें : ॥५ ॥ येतां न करी नमस्कार : कर जोडुनीयां नम्र : नव्हे म्हणवी थोर : आणीकां षेटी चांडाळ : ॥ ६ ॥ **तुका** वीनवींतो जना : कथे नाणावें अवगुणा : करा नारायेना : रुणी समर्पक भावे : ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥ १

८२९

[ व. पृ. १७० ] आज्ञ तापलीयां कायां ची होमे तापत्रे संतप्त होती : संचीत क्रीमाण प्रारब्ध तेथे न चुके सौसारस्थीती : रहटघटीका जैसी फीरतां ची राहीली भरली जाती येक रीती : साधी हा प्रपच पंचायेज्ञ त्याणे पावसील निजशांती : ॥ १ ॥ धृ ॥ नारायेण नाम नारायेन नाम : नीत्य करीं काम जीव्हा मुषे : जन्म जरा व्याधी पाप पुन्ये तेथें नासती सकळ दुषें : ॥ छ ॥ सीत उस्ण वन सेवीतां कपाट आसण समांधी साधी : तप तीर्थ दान व्रत आचरण येज्ञ नाना मन बुधी : भोगाभोग तेथे न चुकती प्रकार जन्म जरा दुष व्याधी : साहोनी कामक्रोध अंहंकार आश्रमी आवीनास साधी : ॥ २ ॥ घोकींतां अक्षर आभीमान वींधी नीसेध लागला पाठीं : वाद करीतां नींदा घडती दोश होये वज्रलेपो भवीशती : दुश्चणांचे मुळ भुशण **तुका** म्हणे साडी मीथ्या षंती : रींघोणी संता शरण सवे भावे तुं राहें भलतीये स्थीती : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

सौरी ८३०

सौरी सुर जालें दुर : डौर घेतला हाती : मायां मोहे सांडवलें तीही लोकी जालें सरती : ॥ १ ॥ चाल वीठावाई : आवघी पाजी देई : न धरी गुज काही वाव्हवंटी सांपडतां : ॥छ॥ हींडोनी चौऱ्यासी घेरे आलें तुझ्या दारा : येका रुक्यासाठी आचवलें सवसांरा : ॥ २ ॥ लाज मेली संका गेली नाचो

माहाद्वारी : श्राती सावलें फीटोन गेलें : आतां कैची उरी : ॥ ३ ॥ झालें भाडी जगा सांडी : नाही भीड चाड : घालीन चरणी मीठी: पुरवीन जीवींचे कोड : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे रुका करी सवंसारें तुटी : आतां तुज मज कैसी जाली जीवें साटी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

सौरी ८३१

समसपाट वेसन काट जालें नीसंक सौरी : कुडपीयेला देश आंतां येउ नदी दुसरी : ॥ १ ॥ धृ ॥ [ व. पृ. १७१ ] गांउं रघुरामा हे उरेलें आम्हा : नाहीं जीवेंतमा वीतेगोतसहीत : ॥ छ ॥ ठाव झाला रीता झाकुण काये आतां : कोणासवें लाजा कोण दुजा पाहातां : ॥ २ ॥ सौरीयांचा संग आम्हा दुरावेले जग : भीन जालें सुष भाव पालटला रंग : ॥ ३ ॥ लाज भये ज्यानी : नाहीत ती दान्ही : फीरावीला वेशे नव्हे कोन्हाचीं कोन्ही : ॥ ४ ॥ **तुका म्हणे** आम्हां हा वेशं दील्हा ज्याणे : जणा प्रचींत सेवा आसो येकपणे : ॥ ५ ॥ छ ॥

सौरी ८३२

नव्हे नरनारी सौसारा आतरलो : नीलज नीव्हाम जना वेगळी च ठेलो : ॥ १ ॥ धृ ॥ चाल रघुरामा ने आपल्या गावा : तुजवीन आम्हां सुष सांगांती : ॥ छ ॥ जनवाद लोकनीदा पीसुनाचें चेरे : साहों तुजसाटी आंतरली सोहोदरे : ॥ २ ॥ केली आरानुक वीसरलो देहभाव : तुजसवें भेटी राम राहीलेत राहो : ॥ ३ ॥ बहुतां पाठी नीरोप हाटी पाठवीला तुज : **तुका** म्हणे फुका सांडुनीयां लोकलाजा : ॥ ४ ॥ छ ॥

सौरी ८३३

मोकळें गुंते रीतें कुथें नाही भार दांवें : धेडवांडा बैसे षोडां घेतले आपल्या भावें : ॥ १ ॥ धृ ॥ आईका बाई लाज नाही आणीका त्ये ही गरतीची : समाधानी उंच स्थानी जाणें सेवा पतीची : ॥ छ ॥ न पुसतां करी चीतां न मारीतां पळे : ॥ दादलें सेजे नावडे नीजे जगझोडीचें चाळें : ॥ २ ॥ देषत अंध बहीर कानी : बोलबोलतां मुंकें : **तुका म्हणे** पतन सोईरी जाली यैसी येके : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

सौरी ८३४

आणीका उपदेश नेणें नाचों आपण : मुढां मारीमार वांयां गेली हासें जन : ॥ १ ॥ धृ ॥ तैसा नव्हे चाळा आवरी मन डोळा : पुढीलांची

कळा ककतुक जाणोनी : छ ॥ बाहेरील्या वेशे आत जैसे तैसे : झाकलें तो बरे पोट भरे तेने वेशे : ॥ २ ॥ [ व. पृ. १७२ ] तुका म्हणे केलें तरी करी सुध भाव : नाहीं तरी वांयां जासी हा ना तो साठाव : ॥ ३ ॥ छ॥

गौळणी ८३५

षळतां मुरारी जाये सरोवरातीरी : तंवं नगन ची नारी तेथे देषीयेल्या :॥ मांडीलें वींद्रांन फ्याल सुषाचें साधन : आंगें लपउनी मान पीलंगत चालें : ॥ १ ॥ धृ ॥ फ्याल माडीला रे : षयाल माडीला रे : पांयां पडतां रे न सोडी नेंदी साउला रे : ॥ छ ॥ साड्या साउली पातळे गोडें कसणींयां : च्योळ्या वुंथी घेउनीयां : पळे कळबावरी : षांदी धरुनीयां करी : द्रुस्टी घालुनी सामोरी : बैसे पाला वोढी वरी : षदषदां हांसें : ॥ २ ॥ आंनदें कलोळ बाळा षेळती संकळ : देती उलटीया चपळ : येकी येकीहुनी : म्हैस-वेल सुर काडी : येकी उगवीती कोडी : नानापरीच्या वीकडी : षेळ मांडी-येला ॥ ३ ॥ येकी आलीयां बाहेरी : पाहे लुगडी तो नारी : म्हणे नाही नेली चोरी : काये जाणो केव्हां : केला सकळी हाकार : तंवं आलीया बा-हेरा : आतां म्हणतील घरा : जावें कैसे परी : ॥ ४ ॥ तंवं हासें वनमाळी : वरी पाहोनी सकळी : लाजे रीघालीया जळी : मागें पुढें हात : लाज राषीली गोपाळा : आम्हाजणीची सकळां : काये मागसी ये वेळां : देऊं गुळवाटी : ॥ ५ ॥ जोडुनीयां कर या गें सकळी समोर : वांयां नोबलावे फार : बडबड कांहीं : ॥ भातुके भुशण : नाही चाड नेंवें धन : करा येकचीत मन : या-गें मजपासी : ॥ ६ ॥ येकी येकीकडे पाहे : लाज सांडुनीयां राहें : म्हणे चला आतां सये : जाऊं तयापासी : जोडुनीयां हात : कैस्या राहील्या नीवांत : तुका म्हणे केली मात : लाज राषीली तयांची : ॥ ७ ॥ छ ॥ १

८३६

आमचें उचीत हे ची उपकार : आपलाची भार : घालु तुज : ॥ १ ॥ भुक लागलीयां भोजनाची आळी : पांघुरुन काळी सीताचीये : ॥ २ ॥ जेणे काळे उठी मनाची आवडी : ते ची मागो घडी : आवडते : ॥ ३ ॥ दुष येउ नेदी आमचीया घरा : [ व. पृ. १७३ ] चक्र करी फेरा : भोवंताला : ॥ ४ ॥ तुका म्हणे नाही मुग्तीसवें चाड : हे ची आम्हा जन्म घेतां ॥ ५ ॥

८३७

हो कां दुराचारी : वाचें नाम जो उचारी : ॥ १ ॥ धृ ॥ त्याचा दास मी आंकीत : कायामनवाचासहितं : ॥ छ ॥ नसो भाव चीती : हरीचें गुण गाती गीती : ॥ २ ॥ हो कां भलतें कुळ : सुध आथवा चाडाळ ॥ ३ ॥ करी आंनाचार : मुषी नामाचा उचार : ॥ ४ ॥ म्हणवी हरीचा दास ॥ तुका म्हणे धने त्यास : ॥ ५ ॥ छ ॥

८३८

मी दास तयाचा जया चाड नाहीं : सुषदुष दोही वीरहीत जो : ॥ १ ॥ राहीलासे उभा भीमरच्या तीरी : कट दोही करी धरुनीयां : ॥ २ ॥ नवल काई तरी पाचारीतां पावें : न स्वरीत धावे भगती काजे : ॥ ३ ॥ सर्व भार माझा त्यासी आहे चीतां : तो ची मांझा दाता स्वहीताचा : ॥४॥ तुका म्हणे त्यास गाईन मी गींती : आणीक ते चीती न धरी कांहीं : ॥ ५ ॥

८३९

आणीक कोन्हाचा न धरी संग : जेणें होये भंग माझ्या चीतां : ॥ १ ॥ वीठला वांचुन आणीक जे वाणी : नाईके मी कानी आपुलीये : ॥ २ ॥ समाधानासाटी बोलावी हे मात : परी माझें चीत नाही कोठें : ॥ ३ ॥ जीवाहुनी मज ते ची आवडती : आवडे ज्यां चीती : पांडुरंग : ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें तो ची जाणे हीत : आणीकाच्या चीत नेदी बोला : ॥ ५ ॥ छ ॥

८४०

काये माझे नेती वाईट म्हणोन : करु समाधान कास्यासाटीं : ॥ १ ॥ काये लोक मज नेती परलोका : जातां कोन्हा येका नीवारैल : ॥ २ ॥ न म्हणे कोन्हासी उंतम वावीट : सुषे माझी कुट : षात मागें : ॥ ३ ॥ सर्व भार माझा असे पांडुरंगा : काये माझें जगा : सवें काज : ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें सर्व हे साधन : नामसंकीर्तन वीठोबाचें : ॥ ॥ ५ ॥ छ ॥

८४१

यासी कोन्ही म्हणे नीदेची उतरे : नागवला षरे तो ची येक : ॥ १ ॥ आढ वांटें जातां लाई नीट सोई : धर्मनीत ते ही अैसी आहें : ॥ २ ॥ नाईकतां सुषें करावे ताडन : पाप नाहीं पुन्य असे फार : ॥ ३ ॥ [ व. पृ. १७४ ] जन्मव्यध फार चुकतील दुषें : षंडावा हा सुषें मान त्याचा : ॥४॥ तुका म्हणे नीबं दील्हीया वाचुन : अंतरीचा सीण : कैसा जाये : ॥ ५ ॥

८४२

सर्व्वीसी माझा त्रासलासे जीव : आतां कोण भाव नीवडुं येक : ॥ १ ॥ सवसाराची मज न साहे वारता : आणीक म्हणतां माझें कोन्ही : ॥२॥ देहे सुष कांही त्रोलीले उपचार : वीश ते आदर बंद वाटे : ॥ ३ ॥ उपाधी दाटनी प्रतेस्टा गौरव : होये माझा जीव कासावीस : ॥ ४ ॥ तुका म्हणे कांहीं आणीक न साहे : आवडती पाय वैस्णंवांचें ॥ ५ ॥ छ ॥

८४३

आणीक कांहीं उतराचें काज : नाही आतां काज बोलावया : ॥ १ ॥ भींन भीन देहेभावना स्वभाव : नव्हे कांही देव येकवीध : ॥ २ ॥ गुणद्रोश कोणे नीवडावे धर्म : कोण जाणे कर्म आकर्म ते : ॥ ३ ॥ तरी च भलें आतां न करावा उद्वेग : दुषाचा प्रसग : तोडावया : ॥ ४ ॥ तुका म्हणे मुन गाई या देवाचे : घेई माझें वाचें : हे ची धनी : ॥ ५ ॥ छ ॥

८४४

आपल्य वीचार करीन जीवासी : काये या जनासी चाड मज : ॥ १ ॥ आपले स्वहीत जाणती सकळे : नीरोधीतां बळे दुष वाटे : ॥ २ ॥ आईको नाईको कथा कोन्ही तन्ही : जाउनीयां घरी सुखें नीजो : ॥ ३॥ माझी कोण वोज जाला हा सेवट : देषोनीयां वाट आणीका लागी ॥ ४ ॥ तुका म्हणे भाकु आपुली करुना : जयाची वासणा : तया फळे : ॥ ५ ॥ छ ॥

८४५

॥ धृ ॥ हरी तु नीस्टुर नीर्गुन : नाही माया बहु कठीन : नव्हे तें करीसी अनं : कवणें नाहीं केले तें : ॥ छ ॥ घेउनी हरीचंद्राचें वैभव : राजे घोडे भागें सर्व : पुत्र पत्नी जीव डोंबांघरी उप्पवीली : ॥ १ ॥ नळा दम(यं)तीन्चा वीयोग : वीघडवीला त्यांचा संग : अैसे जाणे जग रे पुराणे बोलती : ॥ २ ॥ राजा सीभ्र चक्रवर्ती : रे कृपाळु दया भुती : तुळवीलें अंती : तुळे मास तयांचे : [व. पृ. १७५]॥ ३ ॥ कर्णा भीडतां स्वरंगणी : बाणी व्यापीयेला रनी मागसी पाडुनी : तेथे दांत तयाचें : ॥ ४ ॥ बळी सर्वसे उदार : जेणे उभारीला कर : करुनीयां काहार : तो पातांळी घातला : ॥ ५ ॥ श्रीयाळाचा घरी धरने माडीले मुरारी : मारवीलें करी : त्याचे बाळ त्या हाती : ॥ ६ ॥ तुज भावे जे भजती : त्याच्या सवंसारा हे गती : ठाव नाहीं पुढती : तुका म्हणे करीसी तें : ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥

नाम म्हणतां मुग्ती नाही : हा उपदेश करीती कांही : बहीर हो रे त्याचा ठांई दुस्ट वचणे नाईकेती :॥ १ ॥ धृ ॥ ज्याचा राहीले मानसी : ते ची पावले तयासी : चाचपतां मेली पीसी : हो भलतीसीं वाचाळें : ॥ छ ॥ नववीधेचा नीसेधु : जेंणे मुखें करीती वादु : जन्मा आले ते ची नींदु : शुकर याती सवसारा : ॥ २ ॥ आपलीया नामासाटी: लागें संकासुरा पाठी: वीदारुनी पोटी : वेद् चार्‍ही काढीयेले : ॥ ३ ॥ कीती सांगावे वेळोवेळा : नाही आठव चांडाळा : नामासाटी बाळा : क्षीरसागरी बैसवीलें : ॥ ४ ॥ जे पवाडे गर्जती : नाम प्रल्हादाचा चीती : जळतां बुडतां राखे हाती वीशाचा : ॥ ५॥ जनी प्रसीध हे बोली : नामें गणीका तारीली : आणीक उधरीली रें :चाडाळें माहा दोसी : ॥ ६ ॥ कायें वर्णु अैसी कीती : तुका म्हणे नाम क्ष्याती जाती नरकाप्रती : नीसेधीती ते येक : ॥ ७ ॥ छ ॥

८४७

नीवडे जेवन सेवटीच्या घांसें : होये त्याच्या अैसें :सकळ ही:॥१॥धृ॥ न पाहीजे जाला बुधीचा पालट : केली षटपट जाये वायां : ॥ छ ॥ संपादीलें होये धरीलें तें सोग : वीटंबणा वेंगं पडीलीयां : ॥ २ ॥ तुका म्हणे वर्म नेणतां जे रांधी : पाववी ते बुधी : आवकंळा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८४८

पुरवीली आळीं : जे जे केली ते ते काळी : ॥ १ ॥ धृ ॥ माये तरी अैसी सांगा : क्रुपाळु वा पांडुरंगा : ॥ छ ॥ [ व. पृ. १७६ ] घेतले नुतरी: उचलुनी कडीयेवरी : ॥ २ ॥ तुका म्हणे घांस : मुखी घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

८४९

न लगें मरावें : अैसा ठाव दील्हा देवें : ॥ १ ॥ धृ ॥ माझ्या उपकारासाटीं : वागवीला म्हुण कंठी : ॥ छ ॥ घरी दील्हा ठाव : आवघा सकळ ही वाव : ॥ २ ॥ तुका म्हणे येके ठाई : कोंठे माझें तुझे नाही : ॥ ३ ॥ छ ॥

८५०

नाही लाग माग : नेदषेसे केले जग : ॥ १ ॥ धृ ॥ आतां बैसोनीयां षावें : दील्हे अईतें देवें : ॥ छ ॥ नीवारले भये : नाही दुसऱ्याची सोयें ॥ २ ॥ तुका म्हणे काही : बोलायाचे काम नाही : ॥ ३ ॥ छ ॥

८५१

आमगळ वाणी : नये आईकों तें काणी : ॥ १ ॥ धृ ॥ जो हे दुसी हरीची कथा : त्यासी क्षेये रोग वेथा : ॥ छ ॥ याती वर्णे त्ररीस्ट : परी तो चांडाळा पापीस्ट : ॥ २ ॥ तुका म्हणे पाप : काये नावडे ज्या बाप : ॥३॥

८५२

कैसा सीनळीचा : नव्हे अैसी ज्याची वाचा : ॥ १ ॥ धृ ॥ वाचे नुचारी गोवींदा : सदा करावी परनींदा : ॥ छ ॥ कैसा नरयेगावां : जाउनी न पवे वीसावां : ॥ २ ॥ तुका म्हणे दंड : कैसा न पवे तो लंड : ॥ ३ ॥

८५३

आचरना ठाव नाहीं आंगी स्वता भाव ॥ १ ॥ धृ ॥ करवी आणीकाचें घात : षोडी काढुनी पतीत : ॥ छ ॥ स्वानाचीये परी : मीस्टानासी वीटाळ करी : ॥ २ ॥ तुका म्हणे येसां : सटव ची ना पांचा दिसा : ॥ ३ ॥ छ ॥

८५४

गर्भाचे धारण : तीने वागवीला सीण : ॥ १ ॥ धृ ॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा : वर न घली च तोंडा : ॥ छ ॥ उपजला काळ : कुळा लावीला वीटाळ : ॥ २ ॥ तुका म्हणे जाये : नरका आभग्ताची माये : ॥ ३ ॥ छ ॥

८५५

पत्नासी जे नेती : तीचा षेटा स्नहे प्रीती : ॥ १ ॥ धृ ॥ वीधीपुरतें कारण : बहु वारावें वचन : ॥ छ ॥ सरवस्व नाडी : अैसी लाघवाची बेडी : ॥ २ ॥ तुका म्हणे दुरी : राषतां हें तो च बरी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८५६ काला

[व. पृ. १७७] आवघे अवघीकडे : दील्हे पाहे मजकडे : आस सवगंडे : सहीत थोरी लागली : ॥ १ ॥ धृ ॥ कोरें घरीला आबोला : माझा वांटा देवी मला : सीदोरीचा केला झाडा : आतां नीवडे ना : ॥छ॥ भुक लागली आनंतां का रे नेणसी जाणतां : भागलो वळीतां : गाई सैरा अुप्साळा : ॥ २ ॥ तुका करुना भाकी : हरी पाहे गोळा टाकी : घेता जाला मुषी : भीतरे वाटी आणीकां : ॥ ३ ॥ छ ॥

## ८५७ काला

आम्ही गोवळी रानटे : न हो जनातील धीटे : ॥ १ ॥ धृ ॥ सीदोरी-चा करु काला : येक वाटीतो येकला : ॥ छ ॥ षेळो आपआपल्यांसी : अमंचीं तीं आम्हां ऐसी : ॥ २ ॥ म्हण मीळालो नेणतें : **तुका** कान्होबा भोवते : ॥ ३ ॥ छ ॥

## ८५८ काला

वळी गाई धावे घरा : आमंच्या करी वेरझारा : ॥ १ ॥ धृ ॥ नावं घेतां तो जवळी : बहु भला कान्हो बळी : ॥ छ ॥ नेदी पडों उने पुरे : म्हणे अवघे ची बरें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे चीता : वाटे न व्हावः परता : ॥ ३ ॥ छ ॥

## ८५९

म्हणती धालो धनीवरी : आतां न लगे सीदोरी ×

× × × × × × × ×

कान्होबा : षेळु माडु राणी : बैसऊं गोठणी : गाई × × ×
करुणी : ॥ छ ॥ न लगें जावे घरा : चुकली × × ×
झारा : संजन सोवीरा : माये बाप तु आ × × **तुका**
म्हणे भरलें पोट : आतां कास्या × × × ट : पाहाणे ते वाट :
मागें पुढे राहीली : ॥ ३ ॥

## ८६०

× × सगती : जाली अमची नीस्चीती : ॥ १ ॥ धृ ॥ नाहीं देषीले ते मीळे : भोग सुषाचे ते सोहळेः ॥ छ ॥ घरी ताकाची सरवर : येथे नवनीताचे पुर : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आतां : आम्हीं न वजों दवडीतां : ॥ ३ ॥ छ ॥

## ८६१

कामें पीडलो माया : बहु मारी नाहीं दया : ॥ १ ॥ धृ ॥ तुझ्या राहीलों आधारे : जालें आवघे च बरे : ॥ छ ॥ तुझे लागलो सगंती : आतां येतो काकुळती : ॥ २ ॥ **तुका** म्हणे तुझ्या भीडा : कान्होबा हे गेंली पीड : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८६२

[ व. पृ. १७८ ] कान्होबा तुं आलगट : नाही लाज बहुं धीट ॥ पाहिलें वाईट : बोलोनीयां वोषटें : ॥ १ ॥ धृ ॥ परी तु न संडीसी षोडी ॥ करीसी केली घडघडी : पाढीसी रोकडी : तुटी माये आम्हांसी : ॥ छ ॥ ठाईचा गोवळ : आवीचारी अनर्गळ : चोरटा सींदळ : अैसा पीटु डांगोरा ॥ ॥ २ जऱ्ही तुझी आई : आम्ही घालु सर्वा ठाई : तुका म्हणे ते ही : तुज वाटे भुशेणे : ॥ ३ ॥ छ ॥

८६३ काला

भोजनाचा काळी : कान्हो माडीयेली आळी : × ला करु वन: माळी : अने येकवाटा : देवी नी × × × ते म्हणो तों जननी : हात पीटुनी मेदी × × आंग घाली : ॥ १ ॥ धृ ॥ कैसा आळी घे × ते च करवीसी : घेवी दुसरे तयेसी : × × × × × × आतां काये करु : नये × × णो मारुं : नये वुझावीतां स्थीरु : कांहीं × × अवघे ची केले येकें ठाई : आंता × × × ×
मातें बरे जानवाल : आंग चोरुनी आपुलें : तोडीयेलें येक बोलें : केसें सुषदुष : ॥ २ ॥ ताट पावलें झांकीलें : होते तैसें तेथें केलें : ॥ भीनाभीन नीवडीलें : आने वेगळाली : ॥ वीस्मीत जननी : भाव देषोनीयां मनी : म्हणे नाही यैसा कोन्ही : तुज सारीषा रे : ॥ ४ ॥ हरुशली माये : सुष आंगीं न समाये कवळुनी बाहे : देती आळीगण : अनंदे भोजनी : तेथे फीटलीसें धणी : तुका म्हणे कोण्ही सांडा सेशे मज : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

८६४

येथे बोलो न काये : होवा गुरु तरी जाये : ॥ धृ ॥ मज म साहे वांकडे : ये वीठलकथेपुढें : ॥ छ ॥ आईकोन मरसी कथा : जा रे आहेसी तो जीत : ॥ २ ॥ हुरमतीची चाड : त्याणे न करावी बडबड : ॥ ३ ॥ पुसेल कोण्ही त्यास : जा रे करी उपदेश : ॥ ४ ॥ [ व. पृ. १८९ ] आम्ही वीठलाचे वीर : फोडु कळीकाळाचें सीर : ॥ ५ ॥ घेउं पुढती जन्म : वानु कीर्त मुषें नाम : ॥ ६ ॥ तुका म्हणे मुगती : नाही आस ची ये चीती : ॥५:

(वरील ' येथें बोलोन काये : ' हा ८६४ वा अभंग पुन्हां लिहिला आहे)

आनुहाती गुंतला णेने बाहे रंग : वृती येतां म × ×

[ येथें संताजीची ही वही संपली आहे. पुढील पानें गहाळ झालेली दिसतात. ]



## सूचना.



श्रीतुकोबारायांचें चरित्र व माहिती मीं *'महाराष्ट्र-सारस्वत' नांवाच्या माझ्या पुस्तकांत दिली आहे ती जिज्ञासूंनीं पहावी. त्यांत महाराजांचे अस्सल हस्ताक्षराचा फोटो दिला आहे. या गाथ्यावरून सुचलेले विचार निराळा निबंध लिहून प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे.

### पुस्तकाच्या प्रती पुढील ठिकाणीं मिळतील.



भारत-इतिहास-संशोधक-मंडळ ... ... पुणें.

---

* किं रु. ६. भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमाला. पु. २३ पुणें.

# तुकारामबुवांचा अस्सल गाथा.

भाग दुसरा.

महाराजांचे टाळकरी व लेखक
संताजी तेली जगनाडे यांचे वहीबरहुकुम.

विनायक लक्ष्मण भावे.

किंमत १ रु.  शके १८४२.

# तुकारामबुवांचा अस्सल गाथा

## भाग दुसरा.

( ८६६ )

[ वै.पृ.१२ ] सुखें गोवी ? सी भोजाना ॥ लेंपउनीयां[2] आपणा ॥ २ येकें येक बुझावीसी : तुका म्हणे ठक होसी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

V वीठळ ( ८६७ )

आम्हीं जाणों तुझा भाव : द्रुढ ॥ धरीयले पाव : ॥ १ ॥ धृ ॥ फांको नेदु चुकावीता : ॥ नेघो थोडें बहु देतां : ॥ बहुतां दीसांचें लीगाड : ॥ आलें होत होत : जड ॥ २ ॥ तुका म्हणे (ॐ) आता : नेघो सर्व मही देता ॥ ३ ॥ छ ॥ ४छ ॥ छ ॥

( ८६८ )

+ सुनीयां अ + ती जोडी दील्ही तुझे ? हातीं ॥ १ ॥ धृ ॥ त्याचे हे चीं उपकार : ॥ अंती आम्हासी वेव्हार : ॥ नामारुपा जाला ठाव : ॥ कोण म्हणत तुज देव ? येक : ॥ तुका म्हणे हारी तुळा ठा ( व ) दील्हा घरीं : ॥ ३ ॥

( ८६९ )

[ व. पृ. १५ ] न करावी चींता : भये न धरावे चीता : ॥१॥ धृ ॥ दासां साहे नारायेण : होये रक्षीतां आपण : ॥ छ ॥ नलगे प्ररीहार : काहीं योजावे उतर : ॥ २ ॥ न धरावी संका : ॥ नये बोलो म्हणे तुका : ॥ ३ ॥

( ८७० )

पडतां जड भारी : दांसी आठवावा हरीं : ॥ १ ॥ मग तो होउं नेदी सीण : आड घाली सुद्रसेन : ॥ छ ॥ नामाच्या चींतने वारा वाटा पळती वींघ्रें : ॥ २ ॥ तुका म्हणे प्राण : देवा करावा आर्पण : ॥ ३ ॥ छ ॥

---

१ ही वही दुसरी आहे. २ ह्या वहींत ल बद्दल ळ आणि ळ बद्दल त्ळ असा तकारयुक्त आहे. पण येथें पहिल्या भागाप्रमाणें ल व ळ हें छापिलें आहे.

८७१

आपुलीया लाजा : धांवे भक्ताचीया काजा ॥ १ ॥ धृ ॥ नाम धरीलें दीनानाथ करावया सती व्रत : ॥ छ ॥ अघात नीवारी : छाया पीतांबरें करी : ॥ २ ॥ उभा करं कटीं : तुका म्हणे या च साटीं : ॥ ३ ॥ छ ॥

८७२

गर्जतां पवाडे : जेथे श्रुती मौन्य पडे : ॥ १ ॥ धृ ॥ तेथे माझी वाचा कीती : ॥ पुरे कराया अस्तुती : ॥ छ सीणली सहश्र तोंडें : शेशा फणी यैसें बेडें ॥ २ ॥ तुका म्हणे मही : सींधुपात्र न पुरे शाही : ॥ ३ ॥ ॥ छ ॥ छ ॥

८७३

येव्हडा प्रभु भावे : ॥ त्याणें संपुस्टी राहावें : ॥ १ ॥ धृ ॥ होये भक्ती केला तैसा : पुरवी धरावी ते इछाः ॥ छ ॥ येव्हडा जगदानी : मागे तुळसीदळ पाणी : ॥ २ ॥ आला नामारुपा : तुका म्हणे जाला सोपा : ॥ ३ ॥ छ ॥

८७४

पाहातां रुप डोळा भरे : अंतर नुरे वेगळे : इछावसें षेळ माडीं : अवघे सा ? डी बाहेरी ॥ १ ॥ धृ ॥ तो हा नंदा नंदनु बाइये : यासी काय परीचार : ॥ छ ॥ दीसोतो हा नव्हे तैसा : असे दीसाव्यापकः ला घ वाहे षोळसाटी : ॥ होतां भेटी पसरावें : ॥ २ ॥ म्हणउनी उभी ठालें ॥ परतलें या वाटा : आड करून जावं तुका जो यां लोका दावी तो ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८७५

[ व. पृ. १६ ] हीं घाटावें लागत : येका सीतें कळे भात ॥ १ ॥ ॥ धृ ॥ क्षीर नीवडा तें पाणा : चोंची हंसाचीये आनी : ॥ छ ॥ आंगडें फाडून गोदडें करी : अवकळेच्या त्या परीः ॥ २ ॥ तुका म्हणे कण : ॥ भुसीं कैंचे होये सीण : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८७६

साळोमाळो हरीचे दास : म्हणउनी केला नास : ॥ १ ॥ धृ अवघें बच मंगल केलें : म्हणती येकाचें आपुलें : ॥ छ ॥ मोडूनी संतांची वचनें ॥ करीती आपणा भुशेणें : ॥ २ ॥ तुका म्हणे कवी : जगामध्यें रुढी दावी : ॥ ३ ॥ छ ॥

८७७

जायांचे अळंकार : बुडउनी होती चोर : ॥ १ ॥ धृ ॥ त्यांस ताडनाची पुजा योग घडे बरा वोजा : ॥ छ ॥ अभीळासाच्या सुषें : ॥ अंतीं होती काळीं मुषें : ॥ २ ॥ तुका म्हणे चोरा : होये भुभुसेन मातेरा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८७८

कालउनी विश : केला अमृताचा नास ॥ १ ॥ धृ ॥ येश्या अभाग्याच्या बुधी : ॥ सत्य मोडी नाही सुधी : ॥ छ ॥ नाक कापुन लावी सोनें : कोन अलंकार त्यणें ॥ २ ॥ तुका म्हणे बावी : मोडून मजारी बांधावी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८७९

कण भुसाच्या आधारें : + + नीवडीता बरें : ॥ १ ॥ धृ ॥ काये घो + + + धा (?) नी ताकामधी घाटी लोणी : सुइनीपुढें चेंटा : काये लपवीसी चाटा : ॥ २ ॥ तुका म्हणे ग्रान दीमाषाचे तें भनंभन : ॥ ३ ॥ ॥ छ ॥

८८०

वीकल तेथें वीका : माती नावं ठेउनी बुका : ॥ १ ॥ धृ ॥ हा तों नीवा (?) डाचा ठाव : खरें षोटें नीवडीता भाव : ॥ छ ॥ गऱ्हवरं + वी (?) धी पोट वाढवीलें चींधी ॥ २ ॥ लाऊ जाणे वी ? ल्हे तुका मा (?) या आणी कल्हे ॥ ३ ॥

८८१

[ व. पृ. १७ ] वीशंई अद्वये : त्यासी आम्हां बोलों नये : ॥ १ ॥ धृ ॥ देव तेथुनी नीराळा : असे नीह्काम वेगळा: ॥ छ ॥ वासनेची गुंती : तेथें कैंची ब्रम्हंस्थीती : ॥ २ ॥ तुका म्हणे अस्था देहीं येथें नाहीं जमेती ॥ ३ ॥ छ ॥

८८२

नमीतों देवा : माझी येके ठाई सेवा : ॥ १ ॥ धृ ॥ गुण अवगुणं नीवाडा : म्हैस म्हैस रेडा रेडा : ॥ छ ॥ जनी जनार्दन : ॥ साक्षी त्यासी लोटांगण : ॥ तुका म्हणे षडे : नीवडूं दळणी घडघडे ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८८३

आपलें मरण पाहीलें म्यां डोळां : तो जाला सोहोळा : अनुउपम्यें : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ अनंदें दाटली तीन्ही त्रीभुवनें सर्वात्मकपणें भोग जाला : ॥ छ ॥ येकदेसी होतों अहंकारें अथीला त्याच्या त्यागें जाला सुकाळ हा : ॥ २ ॥ फीटलें सुतक जन्ममरणाचें : मी माझ्या संकोचें दुरी जालों : ॥ ३ ॥ नारायेणा दिल्हा वसतीचा ठाव : ॥ ठेउनीयां भाव : ठेलों पाई : ॥ ४ ॥ तुका म्हणे दील्हें उमटुनी जगी : घेतलें तें आंगी लाउनीयां : ॥ ५ ॥ छ ॥



८८४

बोळविला देहे आपुलेनी हातें : ॥ हुतासीली भुतें ब्रह्मा आग्नी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ येक वेळे केलें सकळ कारण : आंतां नारायेण नारा(य)ण ॥ छ ॥ : अमृतसजीवनी नीववीली षाई : आंगें तये ठाई : ॥ हारपली : ॥ २ ॥ येकादसी केलें जाग्रण उपवास : ॥ बारांवां दीवस भोजनाचा : ॥ ३ ॥ अवघीं कर्मे केली कुळस्फोटापासी : समध येकेसी उरला नामा : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे आंतां आनंदीं अनंदु : ॥ गोवींदी गोवीदु : वीस्तारला : ॥ छ ॥ २ ॥ छ ॥

८८५

[ व. पृ. १८ ] पीडदान पींडे ठेवीलें करुनीः तीळ तीळवणी मुळत्रई : ॥ १ ॥ सारीले संकल्प येका ची वचनें : ब्रह्मीं ब्रह्मां अर्पणें: सेवटीच्या ॥ छ ॥ सत्रे आपसव्य बुडालीं अकर्मी : ॥ येकायेक वुर्मी येको वीस्णु : ॥ २ ॥ पीत्रुपुत्रत्वाचें जालें अवसान : जनी जनार्दन अभेदेंसी ॥ ३ ॥ आहे तैसी पुजा पावली सकळ : सहज तो काळ साधीयेला : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे केला अवघ्यांचा उधारः आतां नमस्कार सेवटीचा : ॥ १५ ॥ छ ॥ ३ ॥

८८६

स्वामीसेवा गुरुभक्ती : पीत्रुवचन सेवा पती : ॥ १ ॥ धृ ॥ हे च वीस्णुची मांहांपुजा : भाव न धरीतां दुजा : ॥ छ ॥ असत्य नोबलें नुषें : ॥ दुषवे आणीकांच्या दुषें: ॥ २ ॥ नीस्चेयाचें बळ : **तुका** म्हणे ते च फळ : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८८७

कोण जाणे कोणा घडे उपासना : कोण या वचना : प्रती पावे : ॥ १ ॥ आतां माझा श्रोता वग्ता तुं ची देवा : करावी ते सेवा : तुझी च म्यां : ॥ छ ॥ कुशळ चतुर येथे न सरे ते : करीतील रीतें : तर्कमतें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे जालें केणे येक घरीं : मज आण हरी : तुम्हां गांठी ॥ ३ ॥ छ ॥

८८८

क्षेरला सागर : गंगा वोघें मीळे : आपण ची षेळे : आपणासी ॥ १ ॥ ॥ धृ ॥ मधील ते वाव अवघी उपाधी : तुम्हां आम्हां मधी : ते ची परी : ॥ छ ॥ घट मठ जाले आकासाचे पोटी : वचनेची तुटी : तेथे ची तें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे बीजें बीज दाषवीलें : ॥ फळ पुस्प आलें गेलें वायां : ॥ ३ ॥

८८९

दुधाचे घागरी : मद्याचा बुंद : पडीलायां सुध : नव्हे मग : ॥ १ ॥ नसे खळा मुषें न करावें श्रवण : अहंकारें मन वीटाळलें : ॥ छ ॥ काये

करावी तीं बतीस लक्षेणें : नाक नाहीं तेणें वायां गेलें : ॥ २ ॥ [व.पृ.१९]
**तुका** म्हणे अन जीरों नेदी मासी : ॥ आपलीया जैसी सवंसगें : ॥ ॥ छ ॥

८९०

असो आतां यैसा धंदा : तुज गोवींदा आठउं : ॥ १ ॥ धृ ॥ रक्षिता तूं होसी जरी : काये येरी करावें : ॥ छ ॥ काया वाचा मन पाई राहे ठईं करूं तें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे गाईन गीती : रुप चीतीं धरुनी ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

८९१

येथीचीया अळंकारें : काये षरें पुजन : ॥ १ ॥ वैकठीचीया लाऊं वाटा : ॥ संर्व सांटा : ते ठाई : ॥ छ ॥ येथीया नासीवंतें : काये रीतें चाळउं : ॥ २ ॥ तुका म्हणे वैस्णवजन : माझे गण समुदाये : ॥ ३ ॥

८९२

अवघीयांच्या आलों मुळें : येक वेळ न्यावया : ॥ १ ॥ धृ ॥ सीध सी होवें सीध होवें : आधी ठावें : करीतों ॥ छ ॥ जोंवरी ते घटीका दुरी : आहे उरी तो काळ : ॥ २ ॥ मंगळांचे वेळे उभे : आसा शोभे सावध : ॥ ३ ॥ अवघींयांचा योग घडे : तरी च जोडे : स्लाघीता : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे पाहे वाट : बहुत आटी करुनी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

८९३

धनें देहुं गांवं : पुने भमी ठाव : तेथे नांदे देव पाडुरंग : ॥ १ ॥ धृ॥ धन्ये क्षेत्रवासी लोक दईवाचे : उच्चारीती वाचे नामघोश : ॥ छ ॥ कर कटी उभा वीस्वाचा जनिता : वामागी ते माता रखुमाई : ॥ २ ॥ गरुड पारी उभा जोडु यां कर ॥ २ ॥ अस्वथ समोर : उतरा मुखे : ॥ ३ ॥ दक्षेणे शंकर ली + हरेस्वर : शोभे गंगातीर : इद्रायेणी : ॥ ४ + + लक्ष्मी नारायेण बलाळाचें बन : तेथ आधीस्थान : सीधेस्वर : ॥ ५ ॥ वीघ्नराज द्वारीः बहीरवं बाहेरी : हनुमंत सेजारी : सहीत दोघे : ॥ ३ ॥ **दास तुका** तेथे करीतो कीर्तन : हृदई चरण वीठोबाचे : ॥ ७ ॥ छ ॥

८९४

भोरपच्याने सोंग पालटीलें वरी : बगध्यान धरी मछा जैसा : ॥ १ ॥ टीळे माळा मैद मुद्रा लावी आंगी : देषो नेदी ज ? ही [ व. पृ. २० ] फाते जैसा : ॥ २ ॥ ढीवर या मछा : चारा घाली जैसा : भीतरील फांसा कळों नेदीः ॥ ३ ॥ षाटीक हें स्नहेवादें पसु पाळी : कापावया नळी : तयासाटीः ॥ ४ ॥ **तुका** ह्मणे तैसा भला मीं लोकात : परी कृपावंत पांडूरंग : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

८९५

आमचा वीनोद त जगा मरण : करीती भावहीण : देखोवेखी : ॥ १ ॥ न कळे संतंत हीताचा वीचार : तों ही दारोदार : षाती फेरे : ॥ २॥ ॥ वंदाले वंदावे नींदीले नींदावे : येक गेले जावें : त्या च वाटा : ॥ ३॥ तुका ह्मणे कोण्ही नाईके सांगता : होती येमदूता वरपडीं : ॥४ ॥ छ ॥

८९६

दीपं घेउनीयां धुंडीतां आंधार : ॥ भेटे हा वीचार अघटीत : ॥ १ ॥ धृ ॥ वीस्णुदास आम्हीं नीर्भो कळीकाळा : भुलों मृगजळा न घडें तें ॥ छ ॥ उधळीतां माती रवीकळा मळे : हें कैसें न कळें । भाग्येहीना : ॥ २ ॥ तुका म्हणे त्रुणे झांके हुतासेन : हे तवं वचन : वाउगें ची : ॥ ३॥

८९७

मृत्यलोकी आम्हां आवडती परी नाहीं येका हरीनामावीण : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ वीटलें या चीत प्रपंच्यापासुनी : वमन तें मनीं : बैसलेंसे : ॥ छ ॥ सोने रुप धन मृतीकेसमान : मानीकें पाश्यान षडे तैसे : ॥ २ ॥ तुका म्हणे तैश्या दीसतील नारी : रीसांचीया परी : आम्हां पुढें : ॥ ३॥ छ॥ छ ॥

* एक अंभगाची जागा सोडली आहे.

८९८

[व.पृ.२१] संतासी तों नाहीं सन्मानाची चाड: परी पडे दोड अव्हेरीता : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ म्हणउनी तया नव जावें ठाया : ॥ होतुसे घात या दुबळाचा : ॥ छ ॥ भावहीना आड येतीसे असंका । उचीतासी चुका घालावया : ॥ २ ॥ तुका म्हणे जेथे संकोच दरुसेणें : तया ठाया जाणें : अनुचीत : ॥ ३ ॥

८९९

म्हणउनी जालों क्षेत्रीचे सन्यांसी चीत आशापासी : आवरुनी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ कदापी ही नव्हे सीमाउलंघण : ॥ केलें विसर्जन अव्हानी च०॥ छ ॥ पारीखा तो आंतां जालां दुजां ठाव : द्दढ केला भाव : येकवीध : ॥ २ ॥

* मुळांत ४ बोटें जागा सोडिली आहे.

९००

[ व. पृ. २२ ] बळें बाह्याकारें संपादीलें सोंग ॥ नाहीं जाला त्याग अंतरीचा : ॥ १ ॥ धृ ॥ यैसें येतें नीत्य माझ्या अनुभवा : मनासी हा ठावा समाचार : ॥ २ ॥ जाग्रुतीचा नाहीं आठव स्वप्नी : जातो विसरोनी सकळ

१ हा अभंग भा. १ मध्ये ३९ व्या पृष्ठावर–२०५–आला आहे. थोडा पाठभेद आहे.

हें : ॥ ३ ॥ प्रपंचा बाहेरी नाहीं जालें चीत : केले करी नीत्य वेवसाव : ॥४ ॥ तुका म्हणे मज भोरप्याचे परी : जालें सोंग वरी : आंत तैसें : ॥ ५ ॥

९०१

म्हणवीतों दास ते नाहीं करणी : आंतवरी दोनी भीन भाव : ॥ १ ॥ गातों नाचोतों तें दाषवीतो जना : प्रेम नारायेणा नाहीं आगीं : ॥ २ ॥ पावीजे तें वर्म न कळे ची कांहीं : ॥ बुडालों या डोहीं : डंबाचीये : ॥ ३ ॥ भांडवल काळें : हातोहातीं नेलें : माप या लागलें : आयुश्यासी : ॥ ४ ॥ तुका म्हणे वांयां गेलो यैसा दीसें : होईल या हांसें : लोकीकाचें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

९०२

न कळतां काये करावा उपाय : ॥ जेणें राहे भाव : तुझा पाई ॥ १ ॥ येऊंनीयां वास करीसी ह्रुदई : यैसें घडे कई कासयाणें : ॥ २ ॥ साच भावें तुझें चींतन मानसी : राहे हें करीसी : कई देवा : ॥ ३ ॥ लटीकें हें माझें करुनीयां दुरी : ॥ साच तुं अंतरीं : येउनी राहें : ॥ ४ ॥ तुका म्हणें मज राषावें पतीता :॥ आपुलीया सता पांडुरंगा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

९०३

भाडवल माझें लटीक्याचे गाठी : ॥ उदीम तो तुटी यावी हा ची : ॥ १ ॥ धृ ॥ कैसी तुझी वाट पाहों कोण्या तोंडें : भोवंती कीं (?) रें ? भाडें गर्भवास : ॥ छ ॥ चहुं षाणीचीया रंगलोंसें रंगें ॥ सुस्ट दुस्ट आंगें धरुनीयां : ॥ २ ॥ बहुतांचे बहु पालटलों सळें : बहु आले काळे रंग आंगा : ॥ ३ ॥ [ व. पृ. २३ ] उकलुनी नये दावीतां अंतर : ॥ घडीचा पदर सारुनीयां : ॥ ४ ॥ तुका म्हणे करी : करी ? गो व ळें सं ? वंसाटी : आपऱ्या पालटी : संगें देवा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

९०४

जऱ्हीं माझी कोंण्हीं कापीतील मान तऱ्हीं नको आन वदों जींव्हे : ॥ १ ॥ धृ ॥ सकळां इंद्रीयां हे माझी वीनती : नका होऊं परतीं पांडुरंगा : ॥ छ ॥ आणिकाची मात नाइकावी कानी : आणीक नयेनीं न पाहावें : ॥ २ ॥ चीता तूं रे पाई राहावें अषंडीत : ॥ होउनी मिश्रीत येकवीध : ॥ ३ ॥ चाला पाये हात हें ची काम करा : माझ्या नमस्कारा वीठोबासी ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्हां भये काये करी : आमंचा कैवारी : नारायेण : ॥ ५ ॥

९०५

येक भाव चीती : तरी न लंगती युग्ती : ॥ १ ॥ धृ ॥ कळो अले अनुभवें : म ? ज माझीया ची जीवें : ॥ छ ॥ आठव ची पुरे : सुष अवघें मोहरे : ॥ २ ॥ तुका म्हणे मन पुजा इछी ना(रा)येण

९०६

मनोमये पुजा : बहु पढीये केशीराजा : ॥ १ ॥ धृ ॥ घेतो कल्पनेचा भोग : न मानेती बाहेरंग : ॥ छ ॥ अंतरीचें जाणे : अवघे वर्तमान षुने : ॥ २ ॥ तुका म्हणे कुडें : कैसें सरे याचें पुढें : ॥ ३ ॥

९०७

थोडें परी नीरें : अवीट तें घ्यावें षरें : ॥ १ ॥ धृ ॥ घ्यावें ज्याणें नये तुटी : बीज वाढे बीजापोटी : ॥ छ ॥ चीत ठेवी गोही : आणीकांसीं चाड नाहीं : ॥ २ ॥ आपलें तें ही फार : तुका म्हणे राषें सार : ॥ २ ॥ छ ॥

* मुळांत चार ओळी जागा मोकळी सोडिली आहे.

: ॥ काला: ॥ ९०८

[व.पृ. २४] आजी वोस अवरावती : काला पाहावया येती : ॥ देव वीसरती : देहेभाव आपुला· : ॥ १ ॥ धृ ॥ अनंद न समाये मेदीनी : चारा वीसरलीं र पाणी : तटस्त होउनी गाई ठेलीं स्वापद : ॥ छ ॥ जें देवांचें देवत : उभें आहे या रंगात : ॥ गोपाळां सहीत : ॥ क्रीडा कान्होबा : ॥ २ ॥ जया सुषाची सीराणीं : तें च पावलें मेदिनी तुका म्हने मुनी : न लभे जें धुंडीता : ॥ ३ ॥

: ॥ काळा: ॥ ९०९

हा रस अनंदाचा : घोश काला हरीनामाचा : कोण दइवांचा : भाग ला:हे येथील : ॥ १ ॥ धृ ॥ पुन्यें पाहीजे बहुत : जन्मातरींचें संचीत : ॥ होइल करीत : आला आधीकारी तो : ॥ छ ॥ काये पाहाता भाई : हरुशें नाचों घनघाई : पोटभरी काहीं : घेतां उरीं नेठवी : ॥ २ ॥ जें सुष द्रुस्टी आहे : तें च अंतरी जो लाहे : तुका म्हणे काये : कळीकाळ बापुडें : ॥ ३ ॥

९१०

तुकाबा गोसावी यांचा काला: ।

[व.पृ.२५]येमुने पावळीं : गडीयां बोले वनमाळी: ॥ आणां सीदोऱ्या सकळीं: काला करुं आजी : अवघें येके ठांई : करुनी सवाद त्याचा पाहीं :

मजपासी आहे तें ही तुम्हां माजी देतों : ॥१॥ धृपद : ॥ म्हणती बरवें गोपाळ ॥ वांती सकळ : मोहोरी पावे अनंदें : ॥ छ ॥ षडक्ीं सोडीयेला मोटा : अवघा केला येकवटा : काला करुनीयां वाटां : गडीयां देतो हरी : ॥ येकापुढें येक : घाली हात पसरी मुष : ॥ गोळां पावे ? तया सुष : आधीक ची वाटे : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ म्हणती गोड जालें : म्हणती गोड जालें : आणीक देई नाहीं पोट धालें ॥ छ ॥ हात नेतो मुषापासी : येर आशा तोंड वासी : षाये आपण तयासी : दावी वांकुल्या : ॥ देउनीयां मीठी : पळे लागतील पाठी ॥ धरून काढी-तील बोटीं : मुषामाजी षाती : ॥ ३ ॥ धृ ॥ म्हणती ठकडा रे : म्हणती ठकडा रे : ॥ ठकडा कान्हा झांसा लावी भरी राणा : ढुम करीतो शाहाणा : पाठोपाठीं त्याचा : ॥ छ ॥ अवघींयांचें षाये कवळ कुस्ण माझी माये : ॥ सुरवर म्हंणती हाये : सुषा अंतरलों : ॥ येक येका मारी : ढूंगा तोंडा पाठीवरी : गोळा न साहावे हरी : ॥ म्हणे पुरे आंतां : ॥ ४ ॥ धृ ॥ येतो काकुळती : येतो काकुळंती : ॥ गोळा न सावे श्रीपती : ॥ म्हणे षेळोलों [ व. पृ. २६ ] आतां नीगुती : सांगो आदरीलें : ॥ छ ॥ आनंदाचे फेरीं माजी घालुनीयां हरी : येक घालीती हुंबरी : वाती सींगें पावे : ॥ वांकडे बोबडे : षुडे येक मुडेये येक लुडे : ॥ कुस्णा आवडतीं पुढें : बहुं भावीक ते : ॥ ५ ॥ धृ ॥ करी कवतुक : करी कवतुक : त्यांचें देषोनीयां मुष । हरी वांट ( ? ) तसें सुष : षदाषदा हांसे : ॥ छ ॥ येकयेकांचें उचीस्ट : षांतां न मनीती वीट : केलीं लाजतीं तीं धीट : ॥ आपुलीया संगें : ॥ नाहीं गेली ज्याची भुक : त्याचें पसरवी मुष : अवघींया देतो सुष : सारीषें ची हरी : ॥ ६ ॥ धृ ॥ म्हणती भला भला : म्हणती भला हरी तुझी संगती रे बरी : ॥ आतां चाळ-वीसी तरीं : न वजों आणीका सवें : ॥ छ ॥ गाई वीसरल्या चार : पक्षी स्वाप-दाचें भार : जालें येमुनेचें स्थीर : जळ वाहों ठेलें : ॥ देव पाहाती सकळ : मुषें घोंटूनीयां ळाळ : धन्य म्हणती गोपाळ : धीग्य जालों आम्हीं : ७ ॥ धृ ॥ म्हणती कैसें करावें : म्हणती कैसें करावें : ॥ येमुनाजळीं होंवें : मछ शेश घ्यावया ॥ छ ॥ सुरवरांचें थाट : भरलें येमुनेचें तट : ॥ तवं अधीक ची व्होंट : ॥ मटमटां वाजवी : ॥ आनंदें सहीत : क्रीडा करी गोपीनाथ : म्हणे येमुनेत हात : नका घोउं कोण्ही : ॥ ८ ॥ धृ ॥ म्हणती जाणे जीवीचें । म्हणती जाणे जीवीचें ॥ लाजे त्या कैइचें : शेश याचें : थोरीवे : ॥ छ ॥ धन्य दीवस काळ : आजी फावला गोपाळ : म्हणती धालों रे सकळ : तुझीयान हातें : ॥ मानवले गडी :

येकयेकाचे आवडी : दहीं षादलें परवडी : धनीवरी आजी : ॥ ९ ॥ धृ ॥ तुझा संग बरवा : तुझा संग बरवा : नीत्य आम्हां या देवा : ॥ यैसें करुनी चारावें : ॥ छ ॥ तवं म्हणे वनमाळी : [ व. पृ. २७ ] घ्या रे काठीया कांबळीं : आंतां जाउं षेळींमेळी : गाई चारावया : तुका म्हणे प्रेमें धालीं : कोण्हां न साहावे चाली : ॥ गाई गोपाळांसी केली : आपण यां सरी : ॥ १० ॥ धृ ॥ आजी जाला आनंदु : आजी जाला आनंदु : चालें परमानंदु : ॥ सर्वे आम्हां सहीत ॥ छ ॥ १० ॥ छ ॥ छ ॥

## ९११

अवघे गोपाळ मीळोनी या रे करुं काला : काये कोणाची सीदोरी : यैसी पाहों द्या मला : ॥ नका कांहीं मागें पुढें ठेउं येथे । षरें च बोला : वंची वचला तो ची रे येथें भोवंडू त्याला : ॥ १ ॥ धृ ॥ घेतल्या वांचुन झाडा नेदीं आपुलें कांही : गोही येकायेक बहुतें : देती मोकळें नाहीं : ॥ ताक सांडी येर कालवीं भात भाकरी दहीं : आळें घेंतो मधीं बैसला नाहीं आणवी तेंहीं ॥ छ ॥ येक नाहीं धीर तांतडी : दील्ह्या सोडन मोटा येक सोडीती गांठी रे : येक चालती वाटा : ॥ येक उभा भार वाहोनी : पाहे उगा ची षोटा : येक ते सारुनी आराळे : आंतां यैसे ची घाटा : ॥ २ ॥ येकीं थीरावील्या गाई रे : यकें वळ त्या देती : ॥ येकांच्या फाकळ्या वोढाला : फेरे भोंवते षाती : येक चाराबोरां गुंतले : नाहीं जेवन चीती : ॥ येक येकां चला म्हणंता येक हुंबरी घेती : ॥ ३ ॥ येकीं येकें वाटा लावीलीं भोळी नेणती मुलें : आपण घरीं च गुंतलें माळा नासीलीं फुलें : गांठीचें तें सोड नावडे : षाये अइतें दील्हें : सांपडळे वेठी भार रे : वोझीं वाहाता मेले : ॥ ४ ॥ येक ते माया गोवीले घरीं बहुत कामें वार्ता ही नाहीं तेथींची : तया कांहीं च ठावें : जैसें सीळें होतें संचीत : तैसें लागलें षावें : हातोहाती गेले वेचो-[ व. पृ. २८ ] नी मग पडीलें ठावें : ॥ ५ ॥ येकीं हातीं पाई पटे रे आंगीं लावील्या राषा : येक ते सोलीवं बोडीके : येकीं सपाट सीका : येक ते अळसी तळी रे : वरी वाढल्या काषा : ॥ सीदोरी वांचुन बुंथी रे : केला अवघ्यां वाषा : ॥ ६ ॥ तुका म्हणे कान्होबा आम्हां वाटून द्यावें : आहे नाहीं आम्हांपासीं रे तुज अवघें ठवें : ॥ मोकळितां तुज शरण आम्ही कोणास जावें : ॥ कृपावंत कृपा केली रे पोट भरे तों षावें : ॥ ७ ॥ छ ॥

९१२

गोपाळ म्हणती कान्होबा : या रे कांहीं मागों : आपुलाली आम्हीं जीवीची तया आवडी सांगो : येक म्हणती उगे रे उगे मार्गे ची लागों : ॥ नीजों नका कोण्हीं घरी रे : आजी अवघे जागों :॥ १ ॥ धृ ॥ जाणोनी नेणता हरी रे : मधीं उगा ची बैसे : ॥ नाइकोनी बोल आईके कोण कोणाचे कैसे : येक येकाच्या संवादा जाण नीमळे यैसे : ॥ पोंटीचें वोंठास आणवी : देतो तयांस तैसें :॥ छ॥ येक म्हणती बहु रे आम्हीं पीडलों माया : नेंदी दहीं भात सीदोरी : ताक घालीते प्येया : ॥ तापलों वळीतां गोधनें : नाहीं जीवन छाया : ॥ आतां मागों पोटभरी रे : याच्या लागोनी पायां : ॥ २ ॥ येक म्हणती अरे तुंमचें पोट तें कीती : गाई म्हैंसी घोडीं मागों रे : ॥ धन संपती हती : कन्या कुमरें दासी रे बा जां व री सु प ती : देव गडी कान्होबा आमुचा : आम्हां काये वीपती : ॥ ३ ॥ येक म्हणती बेटे हो कोण करी जतन : गाढव तैसें च घोडे रे याचा कोण तो मान : ॥ लागे बवरोग वाहातां : षांदी चौघे जन : ॥ हातीं काठ्या डोया बोडक्या हींडों मोकळें राण : ॥ ४ ॥ येक म्हणती + + णी रे बहु सावजें फार : फाडफाडुं षाती डोळे रे : पाये नेतील कर : [ व. पृ. २९ ] राखोनी राखे आपणा यैसा कैंचा सुर : ॥ बैसोनी राहों घरीं रे : कोण करी हे चार : ॥ ५ ॥ घरीं बैसलीयां बहुतें बहु सांगती कामें : रीकामें कोण्हांस नावडे यैसें आम्हांस ठावें : चौघां मधीं बरें दीसेसें तेथे नेमक होवें लपोनी षोळतां सहज : ॥ भलें गडीयां सवें : ॥ ६ ॥ येक म्हणती गडी ते भले मीळती मता : केली तयां वरी चाले बरी आपुली सता : ॥ नसावें तेथे तैसें षेळ हानती लाता : ॥ रडी येक येका गेलीयां : गोधळ उडती लाता ॥ ७ ॥ येक म्हणती षेळतां : उगीं राहाती पोरें : यैसें काये घडों सके रे : कोण्ही लाहान थोरें : ॥ अवघीं येतो रागा रे : येका म्हणतां बरें : संगें वाढे कळहो : राहावें येकाकी च बरें : ॥ ८ ॥ येक म्हणती येकला रे : जासील कोठे : सांडी मांडी हें वाउगें : तुझे बळ ची षोटे : ॥ अवघीयांची सीदोरी तुझे भरीली मोटे : ॥ ठाई राहा उगे ठाईचे : का रे सीणसी वाटे : ॥ ९ ॥ तुका म्हणे काहा ये काहाण्यां रे : सांगा ळ गोस्टी : वाटावे तुमचे

बोल रे : भुका लागल्या पोटी जागा करूं या रे कान्होबा : मागों कवळ ताटी : घाले गडी तुका ढेंकर देती वीठल कंठी : ॥ १० ॥ छ ॥

येथून पाऊण पान कोरें : ॥ काळा : ॥

९१३

[व.पृ.३०] आंगें आनुभव जाला मज : संत रज चरणाचा : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ सुखी जालों या सेवने : ॥ दुख नेणे या वरी : ॥ छ ॥ नीर्माल्याची तुलसीदळे : वीरणुजळें : चरणींची : ॥ २ ॥ तुका म्हणे भाव सार : करुनी फार : मीश्रीत : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९१४

देवासी आवतार : भक्तासी संसार : दोहींचा विचार येकपणें : ॥१॥धृ॥ भक्तांसी सोहोळे देवाचीया आंगें : ॥ देव त्यांच्या सगें : ॥ सुख भोगी : ॥२॥ देवें भक्तां रुप दील्हासे आकार : ॥ भक्तीं त्याचा पार वाखानीला : ॥ ३ ॥ येका आंगें दोन्हीं जालीं हीं निर्माण : देवभक्तपण : स्वामीसेवा : ॥ ४ ॥ तुका म्हणे येथे नाहीं भीन भाव : ॥ भक्त तो ची देव : देव भत्क : ॥ ५ ॥

९१५

संतांचे गुणदोश आणीतां मना : केला या उगाणा सुकृताचा : ॥ १ ॥ पीळुनीयां पुष्प पाहे परीमळ : चीरुनी केळी केळ : गाढव तो : ॥ २ ॥ तुका म्हणे गंगे अग्नीसी वीटाळ : लावी तो चांडाळ : दुख पावे : ३ ॥

९१६

संत संगती न करावा वास : येखादे गुणदोश आंगा येती : ॥ १ ॥धृ॥ मग तया दोशां नाही परीहार : होये अपहार सुकृताचा : ॥ छ ॥ तुका म्हणे ते नमस्कारावे दुरुन : अंतरी धरुन राहें रुप : ॥ २ ॥ छ ॥ छ ॥

९१७

[१]संतांसी तों नाही सन्मानाची चाड : परी पडे दोड अव्हेरीता : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी तया नव जांवें ठाया : होतुसे घात या दुबळांचा : ॥छ॥ भावहीना आड येतींसे असंका : उचीतासीं चुका : घालावया : ॥ २ ॥ तुका म्हणे जयां संकोच दरुसेनें : तया ठाया जाणें : अनुचीत : ॥ ३ ॥

---

१ ह्या च अभंग भाग १ मध्यें ५४४ वा आहे. २ पूर्वी ८९८ वा हा च अभंग आहे.

९१८

संतांपासी बहु असावं मर्यादा : फळकटाचा धंदा : उर फोडी : ॥ १ ॥धृ॥ बासर (?) तो भुंके गाढवाचे परी : उडे पाठीवरी दंड त्याणें : ॥ छ ॥समये नेणें तें वेडें चाहाटळ : अवगुणांचा बोंगळ : मान पावे ॥ २ ॥ **तुका** ह्मणे काय वाये चाळवाणी : हागवण घाणी पीटीपीटी : ॥३॥ छ ॥

९१९

[व.पृ.३१]संताच्या हेळना : बाटैल जें तोंडं : प्रत्तक्ष तें कुंड : चर्मकाचें : ॥ १ ॥ धृ ॥ भेंसळीचें वीर्य अैस्या अनुभवें : आपलें परावें : नाही खळा : ॥ छ ॥ सत्यासी जो सोध काढी तो चांडाळ: ॥ धरावा वीटाळ : बहु त्याचा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे प्रश्या केली या च साटीं : कांहीं माझे पोटी : ॥ संका नुरो : ॥ ३ ॥छ॥

९२०

हरीजनाची कोन्हा न घडावी नींदा : साहात गोवींदा : नाहीं त्याणें ॥१॥ ॥ धृ॥ रुपा येउनीयां : धरी आवतार : भक्तां आभयेंकर : खळां कस्ट : ॥ छ ॥ द्रपदीच्या कोपें : कौरवांची शांती : होउनी श्रीपती : साहें केला : ॥२ ॥ न साहे ची बभ्रु पांडवांसारीखा : धुडावीला सखा बळीभद्र: ॥ ३ ॥ दुर्वास या आला छळं अबरुसी : सुद्रसेन त्यासी : जाळीत फीरे : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे आंगीं राखीली दुर्गंधी अस्वस्थामा वधी : पांडवकुमंरा : ॥ ५ ॥ छ ॥ छ॥

९२१

संताचा महीमां : तो बहु दुर्गम : शाब्दीं कांम नाहीं येथे : ॥ १ ॥ बहु धड जन्हीं जाली म्हैंस गाये : तरी होईल काये : कामधेनु : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आंगें होंवं तें आपण : तरी च महींमान : येईल कळों : ॥ ३ ॥ छ॥

९२२

नाहीं संतपण मीळत हाटी : हींडतां कपाटी : रानी वनी : ॥ १ ॥ नये मोल देता धनाचीया रासी : नाही तें आकासी : पाताळी तें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मीळे जीवाचीये साटी : नाहीं तरी गोस्टी : बोलों नये : ॥ ३ ॥ छ ॥

९२३

संताचीये पाईं माझा वीश्वास : राहींलोंसें कास : धरुनी त्यांची : ॥१॥ ॥ धृ॥ ते ची माझें हीत करीती सकळ : जेणें हा गोपाळ : कृपा करी : ॥ छ ॥ भागलीयां मज वाहातील कडे : त्यांचीयाणें जोडे : सुकृत हें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे रुप धरीन आवडी : वचन तें न मोडी : बोलीले ते : ॥ ३ ॥

९२४

गंगाजळा पाहीं पाठीपोट नाहीं : अवगुण तो नाहीं : अमृतासी : ॥ १ ॥ रवीदीपकाळीमां : काये जाणे हीरा : आणीका त्रीमीरां : नाश तेणे : ॥ २ ॥ [व.पृ.३२] कर्पुर कांडणी : काये कोंडा कणी : सींधु मेळवणी : काये चाळे ॥ ३ ॥ परीस चींतामणी : आणींकांचा गुणी पालटला नव्हे तैसें ॥ ४ ॥ **तुका** म्हणे तैसे जाणा संतजन : सर्वत्र संपुर्ण : गगन जैसे : ॥ ५ ॥

९२५

फीरंग्या वाषर : लोखंडांचे ईळे : परी ते नीराळे : गुणमोलें : ॥ १ ॥ पायेरी प्रतीमा : येक ची पाशाण : परी तें महींमान : वेगळालें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे तैसी नव्हे जनापरी : संतजना सरी सारीखीया : ॥ ३ ॥ छ ॥

९२६

संतसंग होवा : ॥ भलतीये परी : होवें त्याचे द्वारी : स्वानयाती : ॥ १ ॥ धृ ॥ रामनाम तेथे होईल श्रवण : घडल भोजन उचीस्टाचें : ॥ छ ॥ कामारी बटीक : दीनपने रंक : तेथे भले : ॥ २ ॥ **तुका** म्हणे सर्व हीत त्या सांगती : घडैल पंगती : सताचीया : ॥ ३ ॥ छ ॥

९२७

संताचीये घरी : दास मीं कामारी : दारीं परवरीं : लोळतसें : ॥ १ ॥ धृ॥ चरणीचें रज लागती आंगास : तेणें बेताळीस : उधरती : ॥ छ ॥ उचीस्ट जमा : करीन पत्रावळी : घालीन कवळी : मुखामाजी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मीं : आणीका वीचारें : नेणें हे ची खरें : मानीतसें : ॥ ३ ॥

९२८

वैस्णवांची कीर्ती गाईली पुराणी : सांही अठराजनी : चहुं वेदी : ॥१॥ यैसें कोन्ही दावा : ग्रंथांचे वाचक : कर्मठ धार्मीक : पुन्यसीळ । आदीनाथ शंकर : नारद मुनेस्वर : शुका अैसा थोर : आणीक नाहीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मुगुटमणी हे भक्ती : आणीक वीश्रांती : आरतीया : ३ ॥ छ ॥ छ ॥

९२९

भक्तांचा महींमा : भक्त चि जाणंति : दुर्लभ । या गती : आणीकांसी ॥ १ ॥ जाणोंनी नेंणते : जाले तेणें सुखें : नोबलोनीं मुखें : बोलताती ॥ २ ॥ आभेदोनी भेद : राखीयेला आंगी : ॥ वाढावया जगीं : प्रेमसुख : ॥ ३ ॥ टाळ घोळ

कथा : प्रेमांचा सुकाळ : मुढ लोकपाळ : ॥ तरावया ॥ ४ ॥ **तुका** म्हणे हे आहे तयां टावें : जीहीं येकाभावें : जाणीतलें : ॥ ५ ॥

९३०

[व. पृ. ३३] भक्ती प्रेमसुख : नेणवे आणीकां : पंडीतवाचका : ज्ञानीयांसी : ॥१ ॥ अत्मनीस्ट जऱ्हीं जाले जीवनमुक्त : तऱ्हीं भक्तीसुख : दुर्लभ त्यां ॥ २ ॥ **तुका** म्हणे देव कृपा करील कांही : तरी च हें ठांई पडेल वर्म : ॥ ३ ॥

९३१

सांटवीला हरी : जीहीं हृदयेमंदीरी : ॥ १ ॥ धृ ॥ त्याची सरली येरझार : जाला सकळ व्यापार : ॥ छ ॥ हरी आला हाता : मग कैंची भये चींता : ॥ २ ॥ **तुका** म्हणे हरी : कांहीं उरों नेदी उरी : ॥ ३ ॥

९३२

जें ज्याचें जेवन : तें ची याचकासी दान : ॥ १ ॥ धृ ॥ आंतां जाउं चोजवीत : जेथे वसतील संत : ॥ छ ॥ होती धालीं पोटें : मागें उरलीं उचीस्टें : ॥ २ ॥ **तुका** म्हणे धांवं । पुढें खुटैल हावं : ॥ ३ ॥

९३३

धरावा तो बरा : ठाव वसतीचा थारा : ॥ १ ॥ धृ ॥ नीजवीलीयां जागवीती ॥ नीज पुरउनी देती ॥ छ ॥ येक वेवसाव : त्यांचा संग त्यांचा जीव : ॥ २ ॥ हीतें केलें हीत : गोही येक येक्यचीत : ॥ ३ ॥ वीशमांचें काही : आड तया येक नाहीं : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे बरी : घरा येतील ते परी : ॥ ५ ॥ छ ॥

९३४

त्यांचिया चरणा : माझें दंडवत : ज्यांचें धनवीत : पांडूरंग : ॥ १ ॥ धृ ॥ तेथे माझा जीव पावला वीसावां : ॥ म्हणउनी हांवां भरलासे : ॥ छ ॥ चरणींचे रज लावीन कपाळा : जे पदें राउळा : सोये जाती : ॥ २ ॥ आणीक ते भाग्यें : येथे कुरवंडीं : करुनीयां सांडी : इंद्रा यैसी : ॥ ३ ॥ वैस्णवांचा घरीं : देवाची वसती : वीस्वास हा चीती : सत्य भाव : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे सखे : हरीचे जे दास : आतां पुढें आस नाहीं दुजी : ॥ ५ ॥ छ ॥

९३५

नसतां अधीकार : ॥ उपदेसासी बळत्कार : ॥ नाहीं तरी केले होतीचा ? र : ॥ माकड आणी गारुडी : ॥ १ ॥ धृ ॥ भीन भीन राज बोल : ॥

---

१ मागें हा अभंग ४६६ वा आला आहे.

मीथ्या रजवनें फोल ॥ नसतां बुढीं बोल : बीज पेरी मुर्ष तो : ॥ छ ॥ नये बांधी ? गांठीं : ॥ पद्रा आणी यैसी तुटी : ॥ असतां कसवटी : अरे सीस्टांचे अनुभव : ॥ २ ॥ उपदेस करी तुका : मेघवृस्टीने आईका : सकळपा (?) सी धोका : ज ह ज तें उ त र म ? : ॥ ३ ॥ छ ॥

* लेखणी या अभंगास निराळी. पृ. ३४ वें कोरें सोडलें आहे.

[ व. पृ. ३५ ] अळकापुरीस ज्ञानदेवाचे देउळीं धरने बैसला ब्राम्हंण : त्याबदल तुकोबानें अभंग केले : ॥ ३१ येकतीस :

९३६

श्री पंढरीशा पतीतपावना : ॥ येकी वीज्ञापणा : पायांपांसी : ॥ १ ॥ अनाथा जीवांचा तुं काजकैवारी : ॥ यैसी चराचरी : ब्रीदावळी ॥ २ ॥ न संगतां कळे अंतरीचें गुज : ॥ आंतां तुझी लाज : तुज देवा : ॥ ३ ॥ आळीकर त्याचें करीं समाधान : ॥ अभयाचें दान देउनीयां : ॥ ४ ॥ तुका म्हणे तुं च षेळे दोहीं ठाई : ॥ नसैल तो देई : धीर मज : ॥ ५ ॥ छ ॥

९३७

अगा ये उदारा अगा वीस्वंभरा : ॥ रषुमाईच्या वरा पांडूरंगा : ॥ १ ॥ अगा सर्वोत्तमा : अगा क्रुस्णारामा : ॥ अगा मेघशामा : वीस्वजनीत्या : ॥ २ ॥ अगा क्रुपावंता : जीवदान तुं दाता : ॥ अगा सर्व सता : धरीतीया : ॥ ३ ॥ अगा सर्वजाणा : अगा नारायेणा : ॥ करुणावचना चीत द्यावें : ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं अधीकार तैसी : ॥ सरती पायांपासीं : केलीं मागें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

९३८

नव्हें दास षरा : परी जाला हा डांगोरा : ॥ १ ॥ धृ ॥ यास काये करुं आंता : ॥ तुं हें सकळ जाणता : ॥ छ ॥ नाहीं पुन्य गाठी : जें हें वेचुं कोण्हां साटी : ॥ तुका कासंया उपाधी : ॥ वाढवीली क्रुपानिधी : ॥ ३ ॥ छ ॥

९३९

तुजवीण सता : ॥ नाहीं वाचा वद्वीता : ॥ १ ॥ यैसें आम्ही जाणों दास : ॥ झालों म्हणउनी उदास : ॥ छ ॥ तुम्ही [ व. पृ. ३६ ] दील्हा धीर : ॥ तरी हें मन जालें स्थीर : ॥ २ ॥ तुका म्हणे आड : ॥ केलों मी हें तुझें कोड : ॥ ३ ॥ छ ॥

९४०

काये मीं जाणता : ॥ तुम्हाहुनींया अनंता : ॥ १ ॥ धृ ॥ जो हा करुं अतीशये : ॥ काये तुम्हां दया न ये : ॥ छ ॥ काये तुज माहीं कृपा : ॥ वीस्वाचीया मायेबापा : ॥ २ ॥ तुका म्हणे वाणी : माझी वदे तुम्हांहुनी : ॥ ३ ॥ छ ॥

९४१

काये ज्ञानेस्वरी उनें : ॥ तीहीं पाठवीलें धरणें : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउन जाणवीली मात : आइकोनीयां लीखीत : ॥ छ ॥ जऱ्हीं जाणें धनी : ॥ बदवी सेकवाची वाणीं : ॥ २ ॥ तुका म्हणे सेवा : ॥ होता सांभाळीं हा ठेवा : ॥ ३ ॥ छ ॥

९४२

ठेउनींयां डोई : ॥ पांई जालों येके सोंई ई : ॥ १ ॥ धृ ॥ कारण तें तुम्हीं जाणां : ॥ मीं तराळ नारायेणां : ॥ छ ॥ प्रसंगीं वचन : ॥ दीलें तें च घांवें अनं : ॥ २ ॥ तुका म्हणे भार : तुम्हीं जाणा थोडें फार : ॥ ३ ॥ छ ॥

९४३

नको काहीं पडों ग्रंथांचीये भरी : ॥ सीघ्र वत करीं : हें ची आंतां : ॥ १ ॥ धृ ॥ देवाचीये चाडे आळवावें देवा : वोस देहेभावा : ॥ पाडूनीयां ॥ छ ॥ साधनें घालीती काळाचीये मुषी : ॥ गर्भवासा सेषीं : न चुकतीं : ॥ २ ॥ उधाराचा मोक्ष होये नव्हे यैसा : पतन्नासी इच्छा अवसेक : ॥ ३ ॥ रोकडी पातली अंगसग जरा : ॥ आतां उजगरा कोठवरी : ॥ ४ ॥ तुका म्हणे धाली नामासाटी उडी : पांडुरंग थडी : पाववील : ॥ ५ ॥ छ ॥ ८ ॥

९४४

देवापासी नाहीं मोक्षाचें गांठोळें : ॥ आणुनी नीराळें : द्यावें हातीं : ॥ १ ॥ धृ ॥ इंद्रीयांचा जये साधुनीया मन : ॥ नीर्वीश का—

राम राम राम राम जय राम

[ व. पृ. ३७ ]—रण आहे तेथे : ॥ छ ॥ उपास पारणी अक्षरांची आटी : ॥ सत्कर्मी सेवटी यैसें फळ : ॥ २ ॥ आदर संकल्प वारीं अतीशये : सहज तें काये दुष जाणें : ॥ ३ ॥ सपनींच्या घायें वीवळसी वांयां : रडे रडतीयां सर्वे मीथ्या : ॥ ४ ॥ तुका म्हणे फळ आहे मुळापासीं : ॥ शरण देवासी : जांई वेगीं : ॥ ५ ॥ छ ॥ ९ ॥

९४५

तजीलें भेटवी आनुनी वासना : ॥ दावील्या जना काये काज : ॥ १ ॥ धृ ॥ आळवावें देवा भाकुनी करुणां : ॥ आपुलीया मना साक्ष करीं : ॥ छ ॥ नाही जावें यांवें डुरुनी लांगत : ॥ आहे साक्षभुत अंतरीचा : ॥ २ ॥ तुका म्हणे हा आहे कृपासींधु : ॥ तोडी भवबंधु : तात्काळ : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १० ॥

९४६

पाहोनीयां ग्रंथ करांवें कीर्तन : ॥ तेव्हां आलें जाणं फळ त्यासी : ॥ १ ॥ धृ ॥ नाहीं तरीं वायां केली तोंडपीटी : उरी ते सेवटी उरली च : ॥ छ ॥ पढोनीयां वेद हरीगुण गावे : ॥ ठावे ते जाणावे तेंव्हां जाले : ॥ २ ॥ तप तीर्थाटण तरी कार्येसीधी : स्थीर राहे बुधी : हरीचा नामीं : ॥ ३ ॥ यागयेज्ञांदीक काये दानधर्म : ॥ तरी फळ नांमं कंठीं राहे : ॥ ४ ॥ तुका म्हणे नको काबाडाचे भरी : ॥ पडों सार धरीं हे ची येक : ॥ ५ ॥ ११ ॥

९४७

गोवींद गोवींद मना लागलीयां छद : ॥ १ ॥ धृ ॥ मग गोवींद ते काया : ॥ भेद नाहीं देवा तया : ॥ छ ॥ अनंदलें मन प्रेमें पाझरती लोचन : ॥ २ ॥ तुका म्हणे अळी : जेवी नुरे ची वेगळी : ॥ ३ ॥ छ ॥ १२ ॥

९४८

ज्यांचें जया ध्यान : ते च होये त्याचें मन : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी अवघें सारा ॥ पांडुरंग द्रुढ धरा : ॥ छ ॥ सम धुन त्याच पावे ? : ॥ उभा व्यापक इट ठाये : ॥ २ ॥ तुका म्हणें नभा : परता : अनुचा ही गाभा : ॥ ३ ॥ छ ॥ १३ ॥

९४९

[व. पृ. ३८ ] सुखें षावें अनं : ॥ त्याचें करावें चींतन : ॥ १ ॥ धृ ॥ ज्याचे दील्हे त्यासी पावे : ॥ फळ आपणांसी फावें : ॥ छ ॥ असे हा आधार नाम त्याचें वीस्वंभर : ॥ २ ॥ नाहीं रीता ठाव : ॥ तुका म्हणे पसरीं भाव : ॥ ३ ॥ छ ॥ १४ ॥

९५०

संकोचोन काये जालासी लाहान : ॥ घेई आपोशण : ब्रम्हांडाचें : ॥ १ ॥ करुणीं पारणें : आंचवें संसार : ॥ उसीर उसीरां लाऊं नको : ॥ छ ॥

धरकुलानें होता पाडीला आंधार : ॥ त्याणें केलें फार कासावीस : ॥ २ ॥ झुगारुनं दुर लपवीलें काषें : ॥ तुका म्हणे वाषे : कवतुकाचे : ॥ ३ ॥ छ ॥ ॥ छ ॥ १५ ॥

९५१

माझ्या बापें मज दीधले भातुकें : म्हणउनी कवतुकें : क्रीडा करीं : ॥ १ ॥ धृ ॥ आळी केली पुढें बोलीलों वचन : ॥ उतम हें दान : आलें याचें : ॥ छ ॥ घेउनी वीभाग जावे लवलाह्या : ॥ आलेती त्या ठाया : आपुलीया : ॥ २ ॥ तुका म्हणे ज्ञानदेवीं समुंदाये : ॥ करा मीं पाये : येईन वंदु : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १६ ॥

९५२

ज्ञानीयांचा तुं राजा मांहाराव : ॥ म्हंणती ज्ञानदेव यैसें तुम्हां : ॥ १ ॥ धृ ॥ मज पांमरां हे काये थोरपण : पाईंची वाहान पाई बरी ॥ छ ॥ ब्रह्मांदीक जेथे तुंम्हां वोळगणें : आणीक तुळने : काय पुरे : ॥ २ ॥ तुका म्हणे नेंणें युक्तीची षोळी : म्हणउनी ठेवीळी पांई डोई : ॥ ३ ॥ १७ ॥

९५३

बोलीलीं उतरें वेडी वांकुडी लेंकुरें : ॥ १ ॥ धृ– ॥ पद करा क्षेमा आपराध : माहांराज तुम्हीं सीध ॥ छ ॥ नाहीं वीचारीला अधीकार म्यां आपुला : ॥ २ ॥ तुका म्हणे ज्ञानेस्वरा राषा पांयांपें कींकरा ॥ ३ ॥ १८ ॥

देवाचा धावा अभंग ७ सात उपदेस अभंग ११

९५४

काये तुम्हीं जाणा : ॥ करुं अव्हेर नारायेणा : ॥ १ ॥ धृ ॥ तरी या लटीक्याची गोहीं [ व. पृ. ३९ ] नीवडीली दुसरे ठांई ॥ छ ॥ कळों अंतरीचा गुण : नये फुटल्या वांचुन : ॥ २ ॥ आणीलें अनुभवा : ॥ जनाच्या हें : ज्ञानदेवा : ॥ ३ ॥ पुढें कोंण्हीं भीती : ॥ त्याच्या चीतासी वीस्रांती : ॥ ४ ॥ तुका म्हणे बीजापोटीं ॥ फळ तैसें च सेवटी : ॥ ५ ॥ १९ ॥

९५५

अवीस्वासीयांचें शरीर सुतकी : ॥ वीटाळ पातकी भेद आहे : ॥ १ ॥ त्याचा वेल काये जाइल मांडवा : ॥ होंता तैसा ठेवा आला पुढें : ॥ छ ॥ मातेचे संकल्प होवा राजबींडा : ॥ कपाळीचें तोंडा : उभें राहे : तुका म्हणे जैसा कुचराचा दाना : ॥ परपाकीं जाणा : षोटा तैसा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ २० ॥

९५६

तामसाची तपें पापाची सीदोरी : ॥ तमोगुणें भरी घातले ते : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ राज्यमद आड : सुषाची संपती : ॥ उलंघुन जाती : नरयेगांवा : ॥ छ ॥ इद्रींयें दमीली ईछा जीवीं (?) ॥ जीवी नागवी ती ठांवीं : नाहीं पुढें : ॥ २ ॥ तुका म्हणे हरीभजना वांचुन : करीतीं तो सीण : पाहों नये : ॥ ३ ॥ छ ॥ २१ ॥

९५७

हरीकथे वांचुन ईछीती स्वहीत : ॥ हरीजन चीत न घला तेथे : ॥ १ ॥ धृ ॥ जाईल भंगोन आपुला वीस्वास : ॥ अवघीया : नास कारणाचां : ॥ छ ॥ ज्याचीये वैसावें भोजनपंगती : ॥ त्याचीये संगती तैसें षावें : ॥ २ ॥ तुका म्हणे काये जालेती जाणते : देवा ही परते : थोर तुम्हीं : ॥ ३ ॥ २२ ॥

९५८

सेवकें करावें स्वामीचें वचन : ॥ त्यासी हुंतुंपण कामा नये : ॥ १ ॥ धृ ॥ घेईल जीव कां सांरील परतें : ॥ भंगलीयां ची तें : सांदी जना ? : ॥ छ ॥ षद्योतें दावावी रवी केवी वाट (?) : ॥ आपलें ची नीट : उसंतावें : ॥ तुका म्हणे तो ज्ञानाचा सागर : ॥ परी नेंदी आम्रर भीजो भेदें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ २३ ॥

९५९

जयायीये गावीं सोन्याचा पींपळ : आगीं : येैसें बळ रेडा बोले : ॥ १ ॥ धृ ॥ [व.पृ.४०] करील तें काये नव्हे मांहाराज : ॥ परी पाहे बीज : सुध आंगीं ॥ छ ॥ जेणे हे घातली मुक्तीची गवांदी : ॥ मेळवीली मांदी : वैस्णवांची : ॥ २ ॥ तुका म्हणे तेथे सुषा काये उणें राहे समाधाने : चीताचीया : ॥ ३ छ ॥ छ ॥ २४ ॥

९६०

बहुतां छंदाचें बहुवस जन : ॥ नये वांटू मन त्यांच्या संगे : ॥ १ ॥ धृ ॥ करावा जतन आपुला वीस्वास : ॥ आंगा आला रस आवडीचा : ॥ सुखाची समाधी हरीकथा माउली : ॥ वीश्रांती साउली : सीणलीयांची : ॥ २ ॥ तुका म्हणे बुडे बांधोनी दगड : ॥ तेथे काये कोड : धांवांयाचें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ॥ २५ ॥ छ ॥

९६१

हरीचे कथे नाहीं :॥ वीस्वास ज्याचे ठांई : ॥ १ ॥ धृ ॥ त्याची वाणी अमंगळ : कान उंदीराचे बीळ :॥ छ॥ सांडुनी हा रस : करीती आणीक सायास तुका म्हणे पीसी : ॥वांयां गेली कीती यैसीं :॥ ३ ॥ छ॥ २६ ॥

९६२

परमं अमृताची धार : चाले देवा हे समोर : ॥१ ॥ धृ ॥ उर्धवाहेनी हरीकथा : मुगटमनी सकळा तीर्थां :॥ छ॥ सीवाचें जीवन : जाळी मांहांदोश कीर्तन :॥ २॥ तुका म्हणे हरी :॥ स्तुती वाणी इची थोरी :॥ ३ ॥ छ ॥ ॥ २७ ॥

९६३

आतां माझ्या मना :॥ इची घडो उपासना :॥ १ ॥ धृ॥ यैसें करीं गा पांडूरंगा :॥ प्रेम बोसंडेसें आंगा :॥ छ ॥ सर्वकाळ नये :॥ वाचे वीट आड भये रंगा :॥ २ ॥ तुका वैस्णवां संगती :॥ हें च भोजन पंगती : ॥ ३ ॥ छ ॥ २८॥

९६४

उपास कराडीं : तीहीं करांवीं बापुडीं :॥ १॥ धृ॥ आम्हीं वीठोबाचे दास :॥ चींता झुगारावी आस :॥ छ ॥ भक्ती– [व. पृ.४१]–च्या उतकरशें : ॥ नाहीं मुक्तीचें हीं पींसें :॥ २॥ तुका म्हणे बळ : आगीं आमुच्ये सकळ : ॥ २ ॥ २९॥

९६५

करवीली तैसी केली कटकट :॥ वांकडें का नीट : देव जाणें ॥ १॥ कोंणा कारणें हें जालेंसे नीर्मान :॥ देवाचें कारण : देव जाणें : ॥ २॥ तुका म्हणे मीं या अभीमानावेगळा : घालुनी गोपाळा : भार असें ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ३० ॥

९६६

तुम्हीं येथे पाठवीला धरणेंकरी : त्याची जांली परी : आईका ते ॥ १ ॥ धृ॥ काये पुढें वाडउनीयां वीस्तार :॥ जाला समाचार : आईका तो :॥ छ॥ देवाचें उचीत येकादश अभंग :॥ मांहांफळत्याग :॥ करुनी गेला :॥ २॥ तुका म्हणे सेवा संमर्पुनी पाईं :॥ जालों उतराई ठांवें असो :॥ ३ ॥ छ॥ ३१ ॥

ज्ञानदेवी ब्राह्मण धरणे बैसळा होता : दीवस ४२॥ बेताळीस : या कारणें तुकावा गोसांवीं याणीं अभंग केलें येकतीस ३१ हें ळीही सही :॥ हस्त अक्षर : संताजी तेळी जगनाडे : कसबे चाकण : वीठळ

* पुढें पान ४१ वें बाकी कोरें.

९६७ फाक : सीमघा

[व.पृ.४२] संष करीसी ज्याच्या नावें: ॥ त्याचें तुज नाहीं ठावें: ॥ आईक सांगोतों येक्या भावें: सांपडे घरीं तें: जीवउनी षावें: रे वीठल: ॥ १ ॥ टीळे माळा करंडी सोंग: ॥ धरुनीयां चाळवीलें जग: ॥ पसरी हात नाहीं त्याग: दावी दगड आण पुजी मग रे वीठल ॥ २ ॥ राष लाउनी आंगं मळी : ॥ वाहे ठोक मी येक बळी : वासने हांती बांधवी नळी तया योनी गीळी रे वीठल : ॥ ३ ॥ कै कोणतें राहाडीचें सुष : वरते पाये हडतें मुष : करवी पीडा भोगवी दुष : पडे नरकीं : न पळे मुर्ष : ॥ रे वीठल : ॥ ४ ॥ सीकला फाका मारी हाका : रांडापोरें मेळवि लोकां : वीटंबी शरमा गे रुका : केलें तें गेलें आवघें चं फुका रे वीठल : ॥ ५ ॥ कळांवें जना मीं येक बळी : ॥ उभा राहे मांडूनीयां फंळी : फोडून गुढघे कोंपर चोळी : आपला घात करुन आपण तळमळी रे वीठल : ॥ ६ ॥ फुकट षलें ठकलीं वांया : ॥ धरुनीयां सोंगें बोडक्या डोया : सीवों नये ते अंतरीं माया : संपादनीवीन वीटंबीली काया : रे वीठल : ॥ ७ ॥ धुळी माती कांहीं षेंलों च नका : ॥ जवादी चंदन घ्यावा बुका : आपणां परीमळ आणीका लोका : ॥ मोलाची महींमा फजीती फुका : रे वीठल : ॥ ८ ॥ बहुत दुषी जाली यां षेलें : ॥ आंगीं बुधी नाहींत बळें : पाठीवरी तोबे तोंड काळें : रसना इंद्रीयें : उपस्थाच्या मुळें : रे वीठल : ॥ ९ ॥ काळे सांगोतों तें आईका तुका : ॥ षेळ कांहीं अवगों च नका : ॥ चला जावं आधीं पोटीं लागल्या भुका : घाल्यावरी टाकमंटीका : रे वीठल : ॥ १० ॥ छ ॥ छ ॥

९६८

देषोनीयां तुझ्या सगुणाचा आकार : उभा कटीं कर: ठेउनीयां : ॥ १ ॥ धृ ॥ त्यणें माझें चींत वाटे समाधान : ॥ वाटातें चरण नोसडावे : ॥ छ ॥ मुषें गातों गीत वाजवीतों टाळी: ॥ नाचोतो राउळीं: प्रेमसुषें: ॥ २ ॥ [वै. पृ.४४] तुका म्हंणे केले तुझ्या नामा पुढें : ॥ तुझें हें बापुडें सकळ हि : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९६९

धोंड्यासवें आदळीतां फुटे डोकें : ॥ तों तों त्याच्या सुषें : घामेजना : ॥ १ ॥ इंगळांसी सनेधान अतत्याई : ॥ क्षेम देतां काये सुष वाटे : ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला : ॥ तयाचा आबोला : आकासासी ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हें पुढील शब्दाचें आद्याक्षर मुळांत ओळ संपल्यामुळें दुबार झालें आहे.
२ वहींत ४३ वा पृष्ठांक च राहिला आहे.

९७०

स [ स.? ] रे आम्हां पासी येक सुध भाव : ॥ नाहीं तरी वाव उपचार : ॥ १ ॥ कोण माणी वरी रसाल बोलणें : ॥ नाही जाली मने वोळषी तों ॥ २ ॥ **तुका** म्हणें आम्हां जाणीवेचें दुष : ॥ न पाहों या सुष : दुर्जनाचें ॥ ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९७१

जळो माझी तैसी बुधी : मज घालीं तुजमधी : ॥ आवडी तों वीधीनीसेधी च चांगली : ॥ १ ॥ धृ ॥ तुं स्वांमी मीं सेवक : उंच नीच पद येक : ॥ यैसें कवतुक नको करुं षंडणा : ॥ छ । रत्न शोभलें कोंदनें : ॥ अळंकरीं मीरवे सोनें : ॥ यक असतां तेणें : दुजें केवी जाणावें : ॥ २ ॥ जळें न षाती जळां : वृक्ष आपुलीया फळा : भोगीता नीराळा : त्याणें गोडी नीवडीळी : ॥ ३ ॥ उरणं छाया सुष वाटे : माते बाळें पान्हां लोटे : ॥ येक येकां भेटे : ॥ कोण सुष ते काळीं ॥ ४ ॥ **तुका** म्हणे हीत : हें च मानी माझें चींत : ॥ नव्हें आतां मुक्ता : यैसा केला वीचार : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

९७२

स्वमुषें तुम्हीं सांगावी सेवा : यैसे माझें देवा मनोरथ : ॥ १ ॥ धृ ॥ नेघों कांहीं आम्हीं आपुल्या उदारा : चीत वीत घर जीवावरी : ॥ छ ॥ बोलों परस्परें वाढवावें सुष : ॥ पाहावें श्रीमुष डोळेभरी : ॥ **तुका** म्हणे सते बोलोंतों वचन : ॥ करुणीयां : चरण साक्ष तुझें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९७३

[व.पृ.४५] न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान : ॥ गोजीरें सगुण पढीये रुप : ॥ १ ॥ धृ ॥ लागला उसीर पतीतपावना : ॥ वीसरोनी वचना : गेलासी या : ॥ छ ॥ जाळु नीयां संसार : बैसलों आंगणी : ॥ तुझे नाहीं मनी : मानसींहीं : ॥ २ ॥ **तुका** म्हणें नको रागेजों वीठला : उठी देई मला भेटी आतां : ॥ ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९७४

कमोदीनी काये जाणे तो परीमळ : ॥ भ्रमर सकळ : भोगीतसे : ॥ १ ॥ धृ ॥ तैसें तुज ठांवें नाही तुझें नाम : ॥ आम्ही च ते प्रेम : सुष जाणो ॥ छ ॥ माते त्रुण बाळ दुधांची गोडी : ज्याची नये जोडी : त्यासी कामा : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मुक्ताफळ सींपीपोटीं : नाहीं त्याची भेटी : भोगीतया : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९७५

आमची का नये तुम्हांसी करुणां : कीती नारायेणां : आळवांवें : ॥ १ ॥ छ का ये णा तुम्हीं दुर्बळांचे जीणें : वैभवाच्या गुणें : आपलीया : ॥ २ ॥ देती घेती करीती : * खटपट आणीक ॥ वेगळा कौक पाहोनिया ॥ ३ ॥ वाहातो संकल्प स्वहिताचे ॥ ४ ॥ तुका म्हणे मग देसी कोणा काळें ॥ चुकुर होतो आम्हीं ॥ ५ ॥ छ

९७६

रायाचें से व-( मध्येंच गळालेला मागील व अभंग पुरा करणाऱ्यानें वर काढून ठेविला आहे ) क : सेवटींचें पीडतां रंक : ॥ १ ॥ धृ ॥ तरी ते उणाव कवणा । कां हो नेणा नारायेणा : ॥ छ ॥ परीसाचीये भेटी : लोहोपणा नाहीं तुटी : ॥ २ ॥ : तुका म्हणे तुझें नाम कंठी : ॥ आम्हां काळासवें भेटी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९७७

धीर नव्हे मनें : काये तयापासी उणे: ॥ १ ॥ धृ ॥ भार घातलीया वरी : दासां नुपेक्षील हरी : ॥ छ ॥ श्रीया यैसी घ्यावी आंटी : घ्यावी द्रव्याचीये साटी : ॥ २ ॥ तुका म्हणे पोटें : देवा बहु केलें खोटें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९७८

[ व. पृ. ४६ ] द्रव्याचीया कोटी : नये गांडीची लगोटी : ॥ १ ॥ धृ ॥ अंती बोळवने साटी पांडुरंग धरा कटी : ॥ छ ॥ लोभाची लोभीकें : यांचें सन्याधान फीके ॥ २ ॥ तुका म्हणें हीतें : जाग नको पडों रीतें : ॥ ३ ॥ छ ॥

९७९

तें च कीति वारेंवार : बोलों फार : बोलीलों : ॥ १ ॥ धृ ॥ आतां माझें दंडवत : + त तुमच्या संतचरणासी : ॥ छ ॥ आवडी ते नींच नवी: ॥ : जाली जीवी वसती : ॥ २ ॥ तुका म्हणे बरवें जालें घरा आलें : बंदरीचें: ॥ ३ ॥ छ ॥

+ मागील 'को' प्रमाणें पुनरावृत्त.

९८०

कोणापासीं आतां सांगों हा बोभाट कधी खटखट सरैल हैं : ॥ १ ॥ छ ॥ कोणा आरानुक होई कोणें काळी आपलाली जाळी : उगउनी : ॥ २ ॥ माझा येणें दुखें

---

* येथून पुढें हा अभंग संपेपर्यंत शाई, ढाक व अक्षर निराळें. मध्यें च कोणीं तरी लिहून पुरें केला आहे.

फुटतसे प्राणः न कळतां जनः सुषी आहेः॥३॥ भोगा आधीं मने मानीलासे त्रासः पाहें लपायासः ठाव कोठे ः॥४॥ **तुका** म्हणे देतों देवाचें गाऱ्हाणें ः माझें रीण याणेंःसांसीयेलें ः॥५॥ छ॥ छ॥

९८१

उपासा सेवटीः अनांसवें होये भेटी ः॥ तैसी माझी मीठी ः पडो पाई ः ॥१॥ धृ॥ पुरवीं वासनाः साच सर्व जाणाः आंम्हां नारायेणां ः अंकीताची ः ॥ छ॥ बव्हां दीसां पुत्रां माते मधीं भेटी ः तैसी दाटो पोटी ः प्रीती उभड ः॥२॥ **तुका** म्हणे धन कृपना सोईरें ःऱ्या परी दुसरें ः॥ नव्हे अंतां ः ॥३॥ छ॥ छ

९८२

रंणी नीघतां [र] सुर न पाहे माघारें ः येस्या मज धीरें ः राष आंतां। १॥ धृ॥ ॥ सवंसारा हातीं अंतरलों दुरीः आतां कृपा करीं ः नारायेणां ः॥ छ॥ वागवीतों तुझ्या नामाचें हतीयार ः हाची बडीवारः मीरवीतों ः॥२॥ **तुका** म्हणे मज फीरतां माघारें ः तेथे उणे पुरें ः तुम्हीं जाणां ः॥३॥

९८३

[व. पृ. ४७][1]पाणीपात्र दीघांबरा ः हस्त करा सारीषे ः॥१॥ धृ॥ अवसेक देव मनीः चींतनी च सादर ः॥ छ॥ भीक्षा कामधेनु येसी ः अवकासीं ः शयेंण ः ॥२॥ पाघंरोनी **तुका** दीसा ः केला वास अलक्षी ः॥३॥ छ॥ छ॥

९८४

आणींतां ते गती ः हंस काडळीं नव्हेती ः॥ १ ॥ धृ ॥ सांडा सांडा रे मीठार ः येथ गाठी सवें धुरे ः॥ छ॥ नाकेंवीण मोती ः उभे बाजारीं ः फजीती ॥२॥ म्हणे हुकुमदाज **तुका** ः येथें कोण्हीं फुंदों नका ।॥३॥

९८५

तरटा पुढें बरें नाचे ः सुस्तकाचें मुसळ ॥१॥ धृ॥ नको धरुं राग मनीः गांडमरणी सांगोतो ः॥ छ॥ कांडीलीयां होतो मांडा ः अळसें धोंडा ः पडातें ॥२॥ **तुका** म्हणे काठी सार ः करीता फार शाहाणा ः॥३॥ छ॥ छ॥

९८६

बहु टाळाटांळी ः होते भोंवंतां हे कळी ॥१॥ धृ॥ बरे नव्हेल सेवटीं ः भये असों द्यावें पोटी ः॥ छ ॥ मुरगाळी कान गोसमाळी सावधान ः॥२॥ आळबोळणा **तुका** ः येसें को इंहा लेषुं नका ः॥३॥ छ॥ छ॥

---

१ हा अभंग मागें २७१ वा आला आहे.

९८७

राहीलों नीराला : पाहों कवतुक डोळ : ॥ १ ॥ धृ ॥ करुं जगाचा वीनोद : डोळां पाहोनीयां छंद : ॥ छ ॥ भुललीं या संवसारें : आलें डोळ्यांसी माजीरें : ॥ २ ॥ तुका म्हणे माथा : कोण्हीं नुचली सर्वथा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९८८

आम्हां येकवीधा पुन्य सर्वकाळ : ॥ चरण सकळ : स्वामीचे ते :॥ १॥धृ ॥ चीताचे (सं) संकल्प राहीलें चळण : अज्ञां ते प्रमाण : करुणी असो : ॥ छ ॥ दुजीया पासुन परतलें मन : केलें घ्यावें दान : होईल तें : ॥ २ ॥ तुका म्हणे आंतां पुरला नवस : येकावीण वोस : सकळ हि : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९८९

राहाणें तें पांयांपासी : आणीकां रसीं वीटोनी : ॥ १ धृ ॥ यैसा धीर देई मना :॥[व.पृ.४८]नारायेणां : वीनवीतों : ॥छ॥ अंतरीं तो तुझा वास : आणी नास : कारणें : ॥ २ ॥ तुका म्हणे सेवटींचें : वाटे साचें राषावें : ॥ ३ ॥ छ ॥ छ॥

९९०

बाळ बाप म्हणे काका : तरी तो काये नीपराद : ॥ १ ॥ धृ ॥ जैसा तैसा भाव गोड : पुरवी कोड : वीटल : ॥ छ ॥ साषरेसी म्हंणता धोंडा : तरी का तोंडा : न रुचे : ॥ २ ॥ तुका म्हणे अरुश बोल : ॥ नव्हे वोल आहा च : ॥ ३ ॥

९९१

चंदन तो चंदनपणें : सहजगुणें : संपन : ॥ १ ॥ धृ ॥ वेधलीया धन्ये जाती : भागें होती सन्मुष : ॥ छ ॥ परीसाआंगीं परीसपण : बाणोंनी तें राहीलें : ॥ २ ॥ तुका म्हणे कैंची षंती : सुजाती ते ठाईची : ॥ ३ ॥ छ ॥

९९२

मरण माझें मरोनी गेलें : मज केलें अंबर : ॥ १ ॥ धृ ॥ ठाव पुसला बुड पुसलें ३० सें वसलें अक्षई : ॥ छ ॥ आला होता पुर : धरला धर : जीवनी : ॥ २ ॥ तुका म्हणे बु (?) नादीचें जालें : साचें : उजेवन : ॥ ३ ॥ छ ॥

९९३

ईनामाची भरली पेंठ : वाहाती दाट मारग: ॥ १ ॥ धृ ॥ अवघे ची येती वाण : अवघी कुण : लाभाचे : ॥ छ ॥ अडचणी त्या केल्या दुरी : देण्यां उरी घ्याण्यांच्या : ॥ २ ॥ तुका म्हणे जोडी जाली : ते आपुली आपणां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

९९४

लेये लक्षीं मन न न्हाये नीस्चळ : मुषे तेथे बळ । आसनाचें : ॥ १ ॥ धृ ॥ हें तों असाध्ये जी सरवत्र जना : भलें नारायेणां : आळवीतां : ॥ छ ॥ कामनेचा त्याग वैरागे या नावें : कुटूंब ते सवें : वीशयेजात : ॥ २ कर्म उसंतावें चालतां पाउळीं : होये जों राहीळीं : देहेबुधी : ॥ ३ ॥ भक्ती ते नमावें जीवजात भुत : सांतउनी उत : कामक्रोध : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे साधे साधनें अवघडें : देतां हें सांकडें : जीव बळी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

९९५

वेदांचें गंहुंवर न कळे पाठका : आधीकार लोकां : नाहीं येरां : ॥ १ ॥ धृ ॥ वीठोबाचें नाम सुलभ सोपारें : तारी येकसरें भवसींधु : ॥ छ ॥ जाणत्यां न साधे मंत्र [ व. पृ. ४९ ] तंत्र काळ : येर तों सकळ मुढ लोक : ॥ २ ॥ **तुका** म्हणे वधिनीसेधे लोपला : उछेद या जाला मारगाचा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९९६

आळवीण स्वरें : यस्या मधुरा उतरें : ॥ १ ॥ धृ ॥ ये गे ये पांडूरंगे : प्रेम पान्हा मज दे गे : ॥ छ ॥ पसरुनं चोंचीं : वचने ये करुणेची ॥ २ ॥ **तुका** म्हणे बळी : आम्ही लडीवाळें आळी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९९७

साधावया भगतीकाज : नाहीं लाज धरीत : ॥ १ ॥ धृ ॥ भीस्में पण केला षरा : ॥ धनोरधरां रक्षीलें : ॥ छ ॥ यैसीयासी शरण जावें : शक्ती जीवें न वंची । ॥ २ ॥ **तुका** म्हणे साक्ष हाती : तो म्यां चीती धरीयेला : ॥ ३ ॥ छ ॥

९९८

[१]यैसें कां हो न करा काहीं : पुढें नाहीं नास ज्या : ॥ १ ॥ धृ ॥ या वीस्वंभरा श [ र ]णांगत : भुतजात वंदुनीयां : ॥ छ ॥ श्रुतींचें कां नेघा फळ : सार मुळ जाणोनी : २ ॥ **तुका** म्हणे पुढें काहीं : वाट नाहीं यावरी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

९९९

[२]वंदीन मी भुतें : आतां अवघीं समस्तें : ॥ १ ॥ धृ ॥ तुमची करीन भावनां : पदोपदीं नारायेणा : ॥ छ ॥ गाळुनीयां भेद प्रमाण तो यैसा वेद : ॥ २ ॥ **तुका** म्हणे मग : नव्हे दुजीयाचा संग ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हा अभंग मागें ११२ वा आला आहे. २ हा अभंग मागें ४४७ वा आला आहे.

१०००

वीधीने सेवन : वीशत्यागातें समान : ।धृ॥ मुषे धर्म देव चीधी : आदी अवसान अंती : ॥ छ ॥ बहु अतीशये षोटा तर्कें बहु होती वाटा : ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें : कृपा करीजेतें देवें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१००१

भोगें घडे त्याग : त्यागें आंगा याती भोग ॥ १ ॥ धृ ॥ यैसें उफराटें वर्म : धर्माचे आगीं धर्म : ॥ छ ॥ देव अंतरें तें पाप : षोटे उगवा संकल्प : ॥ २ ॥ तुका म्हणे भीड षोटी : लाभ वींचारा पोटीं : ॥ ३ ॥ छ ॥

१००२

तुकाराम बहुत मीठा रे भर राषों शरीर । तनकी करूं नावडी : उतारु पैल तीर : ॥ १ ॥

१००३

[व. पृ. ५० ] ठकीलें काळा मारीली दडी : दील्ही कुडी टाकुनी : ॥ १ ॥ धु ॥ पांघु (घु) रलों बहु काळें घोंगडें वाळे साडवलें : ।छ। नये यैसें माग वरी : परतें दुरी पळालों : ॥ २ ॥ तुका म्हणे आड सेवा : लावीली हे वा धांदली ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १

१००४

घोंगडीयांचा पालट केला : मुंला मुलां आपल्यात : ॥ १ ॥ धृ ॥ कान्होबा तो मीं च दीसें : लावीलें : पीसें : सवंगड्या : ॥ छ ॥ तो बोले मीं उगा च बैसें : अनारीसें न दिसे : ॥ २ ॥ तुका म्हणे दील्हें, सोंग : नेंदी वेंग जाउं देव ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ २ ॥

१००५

षेळों लागलों सुरकवडी : माझी घोंगडी : हारपली : ॥ १ ॥ धृ ॥ कान्होबाचे पडीलों गळा : घेईं गोपाळा देईं झाडा : ॥ छ ॥ मीं तों हा गे उघडा जालों : अवघ्यां आलों : बाहेरीं : ॥ २ ॥ तुका म्हणे बुधी काची नाहीं ठाई ची : मज : पासीं : ३ ॥ छ ॥ छ ॥ ३ ॥

१००६

घोंगडीयांची येकी रासी : ॥ त्या च पासी तें ही होतें : ॥ १ ॥ धृ ॥ माझीयाचा मारग दावा : ॥ केला गोवा उगवों द्या ॥ छ ॥ होवें यैसें

---

१ अभंग ८१४ वा ह्य च मागें आला आहे.

नीसंतान : घोईन अन तुजपासी : ॥ २ ॥ तुका म्हणे लाहान मोटा : ॥ सांडा ताठा : हा देवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ४ ॥

१००७

नाही तुझे पडत गळा : पुढें गोपाळा जावं नको : ॥ १ ॥ धृ ॥ चाहाड तुझे दावीन घरीं : ॥ बोलण्यां उरी : नाही यैसा : ॥ छ ॥ तुम्हा आम्हां पडादा होता : सरला आतां सरोवरी : ॥ २ ॥ तुका म्हणे उरती गोठी : ॥ पडीली मीठी : न सुटे : ॥ ३ ॥ छ ॥ ५ ॥ छ ॥

१००८

तुम्हां आम्हां उरि तों बरी : ॥ जनाचारी : आहे तैसी : ॥ १ ॥ धृ ॥ माझे घोंगडें टाकुन देई : ॥ येके ठा [ वं. पृ. ५१ ] ई : मग असों : ॥ छ ॥ वीरोधानें पडे तुटी : कपट पोटी नसावें : ॥ २ ॥ तुका म्हणे तुं जाणता हरी मज वेव्हारी : बोलवीसी : ॥ ३ ॥ ६ ॥

१००९

माझ्या मुषावांटा न यो हें वचन : होंवें हें संतान : ॥ द्रव्य कोन्हा : ॥ १ ॥ धृ ॥ फुकाचा वीभाग पतन दुषासी : ॥ दोंहीं मुळें त्यासी : ॥ तें ची साधे : ॥ छ ॥ नाईकावी नींदा स्तुती माझ्या कानें : ॥ सादर या मनें :होंउं नये : ॥ २ ॥ तुका म्हणे देवो असाध्य या : मुळें ॥ आसा मोहोजाळें : ॥ गुंतलीयां : ॥ ३ ॥ छ छ ॥

१०१०

न मीळो षावया न वाढो संतान : परी हा नारायेणं : कृपा करु : ॥ १ ॥ धृ ॥ यैसें माझे वाचे मज उपदेसीं : आणीका लोकांसीं : हें ची सांगें : छ ॥ वटिंबो शरीर होवी कां वीपती : परी राहो चीतीं : नारायणु : ॥ २ ॥ तुका म्हणे नासीवंत हें सकळ आठवे गोपाळ तें ची : हीत : ॥ ३ ॥

१०११

माझ्या वीठोबाचा कैसा प्रेमभाव : आपणां ची देव होये गुरु : १ ॥ धृ ॥ पंढीये देहभाव : पुरवीते वासना : अंतीं तें आपणापासी न्यांवे : ॥ छ ॥ मार्गे पुढें उभा राहे सांभाळीत : आलीयां अघात नीवारावे : ॥ २ ॥ योगेक्षेम त्याचें जाणें जडभारी । वाट दावी करीं धरुनींयां : ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं वीस्वास ज्या मनी पाहावें पुराणी : वीचारुनी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

---

१ या पानावर मुळांत आंकडा चुकून राहिला आहे.

१०१२

जाळा तुम्हीं माझे जाणतपण : येनें माझा खुन मांडियेला : ॥ १ ॥ धृ ॥ खादलें पचे तरी च हीत : वोकीलीयां थीत पीडी पींड : ॥ छ ॥ तरी च भलें भोगे जोडीलीयां धन पडिलियां खान : ॥ जीवनासी : ॥ २ ॥ तुका म्हणे मज करीं गा वीठला : नेणता ची भला दास तुझा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०१३

येम सांगे दुतां : तेथे नाहीं तुम्हां सता : ॥ जेथे होये कथा : सदा घोश नामाचा : ॥ १ ॥ धृ ॥ नका जांवं तया गावां : ॥ नामधारकांच्या सीवां : सुद्रसेन येवा : घरटी फीरे भोंवंती : ॥ छ ॥ चक्र गदा घेउन हरी : उभा राहे त्याचा द्वारी : लक्षुमीं कामारी : रीधी [ व. पृ. ५२ ] सीधी सहीत : ॥ २ ॥ ते बळीयां सीरोमनी : ॥ हरभिग्त ये मेदीनी । तुका म्हणे कानी : येंम सांगे दुतांचे ॥ ३ ॥

१०१४

हें ची दान दे गा देवा : तुझा विसरु न व्हावा : ॥ १ ॥ धृ ॥ गुण गाईन आवडी : ॥ हे ची माझी सर्व जोडी : ॥ छ ॥ नव्हें मुग्त न मंगे संपदा : संतसंग देई सदा : ॥ २ ॥ तुका म्हणे गर्भवासीं : सुखें घालावें आम्हासी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०१५

आमंची क्रुपाळु तुं होसी माउली : ॥ वीठले साउली : शरणागतां : । ॥ १ ॥ प्रेमपान्हा स्तनी सदा सर्वकाळ द्रुस्टी हे निर्मळ : अमृंताची ॥ २ ॥ ॥ भुक तान दुख वाटों नेंदी सीण : अंतरीचे गुण : जाणोनींयां : ॥ ३ ॥ आसा त्रुस्णा माया : चींता धाडी दुरी : ठाव आम्हां करी : खेळावया : ॥ तुका म्हणे लावी : संताचा सागात : जेथे न पवे हात : कळीकाळाचा : ॥ ५ ॥

१०१६

नागरगोंडें बाळरुप : तें स्वरुप काळीचें : ॥ गाईगोपाळांच्या संगें : आलें लागें : पुंडलीका : ॥ १ ॥ धृ ॥ तें हें ध्यान दीगांबर : कटीं कर मीरवती : ॥ छ ॥ नेणपणें उगे ची उभें : भक्तीलोभें राहिलें : ॥ नेणें वरद्ळाचा मान : ईटे चरण सम उभें : ॥ २ ॥ सहज कटावरी हात : दहीं भात : सीदोरी : ॥ मोहरी पावा गांजीवा पाठी : धरीली काठी : ज्या का : ॥ ३ ॥

रम्ये स्थल चंद्रभागा : पांडूरंगा क्रीडसी : भामां दक्षणमुख वाहे : द्रुस्टी पाहे : समोर : ॥ ४ ॥ तारावेसे मुढ लोक : दीधली भाक पुंडलीका : तुका म्हणे वकुंठवासी : भक्तांपासीं राहीला ॥ ५ ॥

१०१७

[व.पृ.५३] तुज पाप ची नव्हे तैसें : नाम घेतां जवळी वसे : ॥१॥ धृ॥ चाल केळसी मोकळा : म्हण वीठल वेळोवेळां : ॥छ॥ पंच पातकांच्या कोडी : माहां जळतां न लगे घडी : ॥ २ ॥ केली मागें नको राहों : तुज जमान आम्हीं आहों ॥ ३ ॥ करी तुज जीं करवती : आणीक नामे घेउ कीती : ॥ ४ ॥ तुका म्हणे तेथें काळा : रीग नाहीं नीघती ज्वाळा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०१८

आतां तळमळ केली पाहीजे सीतळ : ॥ १ ॥ धृ ॥ करील तें पाहे देव : पाईं ठेउनीयां भाव : ॥ छ ॥ तो ची अनंदाता : नाहीं आणीकाची सता : : ॥ २ ॥ तुका म्हणे दासा : नुपेक्षील हा भर्वसा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०१९

जाणतें लेंकरूं : माता लागे दुरी धरु : ॥ १ ॥ धृ ॥ तैसें न करीं कृपावंते : ॥ पांडूरगे माझे माते : ॥ छ ॥ भेटी मुगताफळा : नव्हे मागुतीया जळा : ॥ २ ॥ तुका म्हणे लोणी : ताका सांडी नीवडूनी : ॥ ३ ॥ छ ॥

१०२०

आँठ प्रहर माता : वाहे वेडीयाचीं चींता : ॥ १ ॥ धृ ॥ तैसें करीं वो माझे आई : ठाव देउन राखें पाईं : ॥ छ ॥ काढीतां तळमळी : बाहेर जीवनातून मासोळी ॥ २ ॥ तुका म्हणे कुडी : जेवी प्राणाची आवडी : ३ ॥ छ ॥ छ ॥

१०२१

आम्हीं उतराई : ॥ भाव नीरोपुनी पाईं : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्हीं पुरववि आळी करावी ते ॥ लडीवाळी : ॥ छ ॥ आमुंचा हा नेम : तुम्हा उचीत हा धर्म : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : जाणो सांगीतली : सेवा ॥ : ॥ ३ ॥ छ ॥

१०२२

वीश पोटीं सर्पा : जन भीतें तया दर्पा : ॥ १ ॥ धृ ॥ [व. पृ. ५४] पंच भुतें नाहीं भीन : ॥ गुण सुख देती सीण : ॥ छ ॥ चंदन प्रीये वासें : आवडे तें जाती यैसें : ॥ २ ॥ तुका म्हणे दाना : ॥ कुंचर मीळो नये अना : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हे तीन्ही अभंग ह्या च क्रमानें ६८९,६९०,६९१ असे पूर्वी आले आहेत.

१०२३

कुंभा अवघ्यां येक आवा : ॥ पाक ये की गुफेडावा ॥ १ ॥ धृ ॥ येसे भीन भीन वांटे : केले परारब्धें साटे : ॥ छ ॥ हीरे दगड येके खानी : ॥ कैचें वीजातीस पाणी : ॥ २ ॥ तुका म्हणे सीरी : ॥ येक येकांची पाईरी ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०२४

तारीयेले जड : उदकावरी जे दगड : ॥१॥ धृ ॥ तो हें न करी तें काइ : ॥ कां रे लीहीन व्हा पाई : ॥ छ ॥ सीळा मनुस्य जाली : ज्याच्या चरणाचे चांली : ॥ २ ॥ वामरांचा हातीं लंका : घेववीली म्हणे तुका ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०२५

जातो न येती ये वाटा : काये नीरवीतो करंटा : ॥ १ ॥ धृ ॥ कैसा जाला बेशरम : साज नाहीं न म्हणें राम : ॥ छ ॥ पाहे वैऱ्यांकडे : डोळे वासुन स्नेहें रडे : ॥ २ ॥ बांधोन येमा हाती : ॥ दील्हा त्याची नाहीं खंती : ३ ॥ नाही यापें काम : यैसें जाणोतो अधम : ॥ ४ ॥ अझुन तऱ्हीं मुंका : काये होसी म्हणे तुका : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०२६

येथाविंधी पुजा करीं : सामग्री तों हे नाहीं : ॥ १ ॥ धृ ॥ आतां माझा सर्व भार : तुं दातार चालवीता : ॥ छ ॥ मंगळ तें तुम्हीं जाणा : नारायेणां : काये तें : ॥ २ ॥ तुका म्हणे समर्पील : तुज विठला : देहभाव : ॥ ३ ॥ छ ॥ छ

१०२७

भवसींधुचे हे च तारुं : मज विचारु : पाहातां : ॥ १ ॥ धृ ॥ चीतीं तुझे धरीन पाये : सुख काये : तेथे तें : ॥ छ ॥ माझ्या खुनं मना पासीं जे ये रसीं : बुडावें तुका म्हणे वर्म आलें : हाता भलें : माझ्या हें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०२८

हे ची तुझी पुजा : अतां करीन केसीराजा [ व. पृ. ५५ ] ॥ १ ॥ धृ ॥ अवघीं च तुझीं पदें : नमस्कारीन अभेदें : ॥ छ ॥ न वर्जती दीसा : जायें तेथें ची सरीसा : ॥ २ ॥ नव्हे येकदेसी : तुका म्हणे संकल्पेसी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हा अभंग ५०० वा पूर्वी आला आहे.

१०२९

जालें भांडवल : अवघा पीकला वीठल : १ ॥ धृ ॥ आतां वाणी कास्या-साटी : वाव धरा वा च पोटी : ॥ छ ॥

१०३०

लांब धावे पाये चोरी : भरोवरी जनाच्या ॥१॥ धृ ॥ आतां कैसें होये यांचें : सीजतां काचें राहीलें : ॥छ॥ खाये वोकी वेळोंवेळां कैसी कळो :राहेल : ॥२॥ तुका म्हणे भावहीण : त्याचा सीणं : पाचावा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

फुगडी १०३१

फुगडी घालीतां उघडी राहें : लाज गे सांडूनीं येकायेकी पाहें : ॥ १ ॥ धृ ॥ फुगडी गे अववें मोडी गे : तरी च गोडी गे : सौंसार तोडी गे ॥ छ ॥ मागें जें सीकली होतीस पोटीं : तें च वीचारुनी : आतां उचारी व्हौटीं : ॥ २ त्रीगुणाची वेणी तुझे उडे ते पाठी : आवरुनी धरीं : घाली मुळबंदी गांठी : ॥ ३ ॥ आगळें पाउल जींके येकायेक : पावसील मांन हे मानवती लोक : ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज मज मधें येकभाव : सम तुकें बार घेवं पावों उंच ठाव : ॥ ५ ॥ छ ॥ छ॥

ळखटा १०३२

लये लये लखटा : ॥ मुळबंदी कासोटा : भावा केलें साहे : आतां माझें पाहे : ॥ १ ×। हातोहातीं गुंतली : जीवपणा मुंकली : धीर माझा निका : सांडी बोल फीका : ॥ २ ॥ अंगींकारी हारी नको पडों केरी : लाज धरीं भांडे । जग झोडी रांडे : ॥ ३ ॥ बैस भावा पाठीं गे : माझ्या आईकें गोठी गे : केला सांडी गोहों : धरीं येथे मोहो : ॥ ४ ॥ पाठमोरा डोल [ व. पृ. ५६ ] आवरीतो बोल : ॥ पांगलीस बाळा : पुढें अवकळा : ॥ ५ ॥ आता उभी ठाईं : उभाउभीं पाहीं : नको होउं डूकरी : पुढें गाढवी कुतरी : ॥ ६ ॥ नाम केलें खरें : आपलें म्यां बरें : तुका म्हणे येरी : पांगवील्या पोरी ॥ ७ ॥ छ ॥ छ ॥

१०३३

मन गुंतलें कुळ्यां : ॥ जाये धावोनी त्या ठाया : ॥ १ ॥ धृ ॥ परती माघारें तो बळी : सुरयेक भुमंडळीं : ॥ छ ॥ नेउन घाली घालां : काये होईल नेंणें याला : ॥ २ ॥ तुका म्हणे याणें : ॥ बहु नाडीले स्याहाणे : ॥ ३ ॥ छ ॥ छ॥

१०३४

भावबळें कैसा जालासी लाहान : मागें सती ध्यान वरणीयेलें : ॥ १॥ तें-मज उचीत करुनी देवा : ॥ दाखवी केशवा : मायेबापा : ॥ २ ॥ पाहोनीयां डोळा

बोलन गोस्टी : आळंगुनी मीठी : देईन पाई : ॥ ३ ॥ चरणी द्रुस्टी उभा राहेन समोर : ॥ जोडूनीयां कर : पुढें दोन्हीं : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे उतकठीत वासना : पुरवीं नारायेणां : अर्त माझें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०३५

क्रुपाळु म्हणउनीं बोलती पुराणें : ॥ नीर्धार वचनें याची मज : ॥ १ ॥ आणीक उपाये नेणें मीं काहीं ॥ तुझें वर्म ठांई पडे तैसें : ॥ २ ॥ नये धड काहीं बोलतां वचन : ॥ रीघालों शरण : सर्व भावें : ॥ ३ ॥ क्रुपा करीसी तरी थोडें तुज काम : ॥ माझा तरी श्रम बहु हरे : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे मज दाखवीं श्रीमुख : ॥ हरैल या भुक : डोळ्यांची ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०३६

माझ्या इद्रींयांसी लागलें भांडण : ॥ म्हणतील कवन : रसना धाली : ॥१॥ करीती तळमळ : ॥ हस्तपादभाळ : नेत्रांसी डुंकोळ पडीला थोर : ॥ २ ॥ गुण गाये मुख : आईकती कान : ॥ अमचें कारण : तैसें नंव्हे : ॥ ३ ॥ दरुशेणें फीटे सकाळांचा पांग : ॥ जेथे ज्याचा भाग : घेईल तें : ॥ ४ ॥ ॥ **तुका** म्हणे यैसें करीं नारायेणां : ॥ माझी ही वासना : यैसी आहे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०३७

[व.पृ.५७] सर्वभावें आलों तुज ची शरण : ॥ कायावाचा मनें सहीत देवा : ॥१॥ आणीक दुसरें न ये माझ्या मना : ॥ राहीली वासना : तुझा पाई : ॥ २ ॥ माझीया जीवासी कांहीं जडभारी : ॥ तुजवीन वारी : कोन येक : ॥ ३ ॥ आम्हीं तुझे दास : आमचा तुं रुणीं : चालत दुरुणी : आलों मागें : ॥ ४ ॥ **तुका** म्हणे आतां घेतलें धरणें : ॥ हीसेबाकारणें : भेटी देई : ॥ ५ ॥

१०३८

कइ मात माझे आईकती कान : ॥ बोलतां वचन संतमुखी : ॥ १ ॥ केला पांडुरंगे : ता माझा अंगीकार : मग होईल धीर : माझ्या जीवा : ॥२॥ म्हणउनी मुख अवलोकीतां पाये : ॥ हे ची मज आहे थारी आसा : ॥ ३ ॥ माझीया मनाचा हा ची वीसवास : ॥ न करीं सायास : साधनाचे : ॥४॥ **तुका** म्हणे मज होईल भर्वसा : तरलों मीं यैसा : साच भावें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०३९

मांउस चर्म हाडें : ॥ हीं अवघीं देवा गोडें : ॥ १ ॥ धृ ॥ जें जें हरीनामीं रंगलें : ॥ काहीं न वजे वांयां गेलें : ॥ छ ॥ वेद साये सखासुर : ॥ त्याचें वागवी कळीवर : ॥ २ ॥ **तुका** म्हणे यैसा हा बराडी भगतीरसा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०४०

घेसी तरी घेंई संतांची भेटीः॥ आणीक ते गोस्टीः नको मना ः ॥ १ धृ ॥ सर्वभावें त्याचें देव भांडवल ः ॥आणीक ते बोल न बोल न बोलती ः ॥ छ ॥ करीसील तरी संताचा सांगात ः॥ आणीक ते मात नको मनाः॥ २ ॥ बैससील तरी संतांच मधी ः ॥ आणीक ते बुधी नको मना ः ॥ ३ ॥ जासी तरी जाईं संताचीया गावां ः ॥ होईल वीसावां ः तेथे मनां ः ॥ ४ ॥ **तुका** म्हणे संत सुखाचे सागर ः मना नीरंतर धणी घेई ः ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०४१

संताचीये गांवी प्रेमाचा सुकाळ ः ॥नाहीं तळमळ दुखलेशः ॥ १ ॥ धृ ॥ तेथे मीं राहेन होउनी याचक ः ॥ घालीतील भीक ः ते ची मज ः ॥ छ ॥ संताचीया घरीं वरो भांडवल ः॥ अवघा वीठल ः धनवीत ः॥ २ ॥ संताचें भोजन अमृताचे पानः॥करीती कीर्तन ः सर्वकाळ ः ॥ ३ ॥ संताचा उदीम उपदेसाची पेठ ः प्रम-सुख साटीं ः घेती देती ः ॥ ४ ॥ **तुका** म्हणे [ व. पृ. ५८ ] तेथे आणीक नाहीं परी ः ॥ म्हणउनी भीकारी ः जालों त्यांचा ः ॥ ५ ॥॥ छ ॥ छ ॥ २ ॥

१०४२

संताचे सुख जालें या देवाः ॥ म्हणउनी सेवा करीं त्यांची ः ॥ १ ॥ धृ ॥ तेथे माझां काये कोण तो वीचार ः ॥ वर्णावया पार ः महींमा त्यांचा ः ॥ छ ॥ नीर्गुण आकार ः जाला गुणवत ः ॥ घालीं दडवत ः पुजुनीयां ः ॥ २ ॥ तीर्थे त्याची ईच्छा करीती नीत्य काळ ः ॥ होवया नीर्मळ ः आपणासी ः ॥ ३ ॥ अस्टमा सीधीचा कोण आला पाड ः ॥ वागो नेदी आड ः कोण्ही तया ः ॥ ४ ॥ **तुका** म्हणे ते बळीयां सीरोमनी ः ॥ राहीले चरणी ः नीकट वासें ः ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०४३

चीतीं नाहीं तें जवळी असोन काये ः ॥ वछ सांडी माये ः तेणें न्यायें ः ॥ १ ॥ प्रीतीचा वायो गोड लागे मात ः जरी जाये चीत ः मीळोनीयां ः ॥ २ ॥ **तुका** म्हणे अवघें फीकें भावेंवीण ः ॥ मीठ नाहीं अन्न त्याणें न्यायें ः ॥ ३ ॥ छ छ ॥

१०४४

वीठो सांपडावया हातीं ः ॥ ठावी जाली येकी गती ः ॥ न धरी भये चीती ः बळ कीती तयाचें ः ॥ १ ॥ धृ ॥ लागे आपण ची हातीं ः कीव भाकीं काकुलती ः करा मग चीतीं ः असेल तें तयाचें ः ॥ छ ॥ येकलीया भागे बळें ः कैं सांपडे

तो काळें : वैस्णवांच्या मेळें : उभा धाकें हाकेसी : ॥ २ ॥ बांधा माझीया जीवासी : ॥ तुका म्हणे प्रेमपासी : न सोडीं तयासीं : ॥ सरवस्वा उदार : ॥ ३ ॥ छ ॥

१०४५

जो मानील तो देईल काये : ॥ न मानी तो घेउन जाये : ॥ १ ॥ धृ ॥ आम्हां वीठल सर्व : भुतीं : राहो चीती : भलतैसा: ॥ छ ॥ अध्यान तें जना काई : जेल्पे वांयांवीण ठांई : ॥ ९ ॥ वंदी नींदी तुज तो गा : ॥ तुका म्हणे पांडूरंगा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०४६

मागें पुढें पाहे : सांभाळुनी दोन्हीं ठाये : ॥ चुकाउनी जाये : गडी राखे गडीयांसी : ॥१॥ धृ ॥ : मुरडे दंडा दोहीं तोंडा : गडीयां सावद करी : ॥ भेडतींयां सागे : तया हाल : तुज वरी ॥ छ ॥ गडीयां गडी : वांटून देई : ज्याचा सोडी : ते ची ठांई : आगळ्या बळें : करील काये [ व. पृ. ५९ ] तुज देनें लागे : डाये: ॥ २ ॥ नवां घरीं पाउला करीं : सांपडे तो तेथे घरीं : जींकोन डाव : करी : टाहो सता आणीकावरी : ॥ ३ ॥ सांपडोनी डांई : बहुकाळ गुंतलासी : बळीया गडी फळी फोडी : न धरतां त्यासी : ॥ ४ ॥ चुकाटी जो खाये : मीळोन आंगी जाये : गुंतलासी काये : तुका म्हणे आझुनी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०४७

सीधीचा दास नव्हे श्रुतीचा अंकीला : ॥ होईन वीठला : सर्व तुझा : ॥ १ ॥ धृ ॥ सर्व काळ सुख आमंचा मानसीं : ॥ राहींलें जयासी : नास नाहीं : ॥ छ ॥ नेणें पुण्यें पाप : न पाहे लोचेनि : ॥ आणीका वांचुनी : पांडूरंगा : ॥ २ ॥ न करीं आस : मुग्तीचे सायास : ॥ भग्ती प्रेमरस : साडूनीया : ॥ ३ ॥ गर्भवासीं धाक नाहीं येतां जातां : ॥ ह्रदई राहातां नाम तुझें : ॥ ४ ॥ तुका म्हणे जालों : तुझा ची अंकीला : नीर्भें मी वीठला : ॥ कळीकाळसी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०४८

जन्मा येउनी तया लाभ जाला : ॥ बीडवई भेटला पांडूरंग : संवसारदुखें नासीलीं तेणें : ॥ उत्तम हें केणें : नामघोश : ॥ १ ॥ धृ ॥ धने ते संत सीध मानभाव : ॥ पढरीचा ठाव : टाकीयेला : प्रेमदाते ते च पतीतपावन : धने दरुसेणं : त्यांला ॥ छ ॥ पाव ट नी यां पंथें : जालीया सीधी : ॥ बोळगे समाधी : -सायो

जीता : ॥ प्रेम आराणुक : नाहीं भये धाक : तेणें सुखें : काही चींता ॥ २ ॥ तें दुर्लभ संवंसारासी : जडजीव उधार : लोकांसीं : तुका म्हणे त्यासी : धने मागे दरुसेने : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०४९

काये दीवस गेला अवघा चीं वऱ्हाडें : ॥ तें आलें सांकडें : कथे माजी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ क्षीण येक ठाई : मन स्थीर नाहीं : आरानुक कई : होईल पुढें : ॥ छ ॥ कथेचें वीरस दोशांमुळ होये : तरण उपायें : कैचा माती : ॥ २ ॥ काये तें सांचुनी उरलें हें मागें : घटीका येक संगें : काये गेलें : ॥ ३ ॥ ते ची वाणी येथे करा उजळनी : काढावीं मथुनी : शब्दरत्नें : ॥ ४ ॥ तुका म्हणे हें ची बोलव [ व. पृ. ६० ] या चाड : उभयेतां नाड : हीत असे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०५०

सुधासुध नव्हिडे कैसें : चर्म मासें भींन नांही ॥ १ ॥ धृ ॥ काहीं अधीक नाहीं उनें : कवन्या गुणें : देवासी : छ ॥ उदक भीन असे काई : ॥ वाहाळा बावी : सरीता नई : ॥ २ ॥ सुर्या तेजें नीवडी काये : रस्मीं रसां : सकळा खाये : ॥ ३ ॥ वरना भीनं दुधा नाहीं : सकळा गाई : सारीखें ॥ ४ ॥ करीतां भीन : नाहीं माती : मडक्या गती : भीनं नावें ॥ ५ ॥ व्रते येकवीध अज्ञीं नाहीं सुधासुध : ॥ ६ ॥ तुका म्हणे पात्रें चाड : कींवा वीश अमृत गोड : ॥ ७ ॥ छ॥

१०५१

देव अवघा प्रतीपादी : वंदी सकळां येका नींदी : ॥ १ ॥ ध ॥ तेथे अवघें गेलें वांया : वीश घांस येक ठाया : ॥ छ ॥ सर्वांग कुवाळी : येकी उपडी रोमावळी : ॥ २ ॥ तुका म्हणे चीत : ॥ नाही जयाचें अंकीत ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०५२

मज माझा उपदेश : ॥ आणीकां नयो याचा रीस : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्हीं अवघे पांडुरंग : ॥ मीं दुस्ट सकळ चांग : ॥ छ ॥ तुमंचा शरणागत : ॥ कांहीं करा माझें हीत : ॥ २ ॥ तुका पाये धरी : ॥ मीं हें माझें दुरी करीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०५३

न धरी प्रतेस्टा कोन्हाची येम : ॥ म्हणतां कारे राम : ॥ लाजा झनीं : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ सांपडे हातींचें सोडवील काळा : ॥ तो का वेळोवेळा : नये वाचे ॥ छ ॥ कोन लोक ज़ो हा सुटला तो येक : गेले कुंभपाक : रवरवांत : ॥ २ ॥ तुका म्हणे हीत तो म्हणां वीठल : ॥ न म्हणे तो भोगील : ॥ कळैल तें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०५४

काये देवें खातां घेतलें हातीचें : तें आलें तयाचें भयें थोर : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणतां गजरें राम येकसरें : पळती पापें थोरें : भये धाकें : ॥ छ ॥ काये वोळंबलें हातपाये आंग : नासलें हें चांग : रुप काई : ॥२ ॥ कोण लोकीं सांग घातला बाहेरी : ॥ म्हणतां हरी हरी तुका म्हणे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०५५

म्हणवीतां हरी न म्हणे तयाला : ॥ दरवडा पडीला देहा माजी : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ आयुस्य धन त्याचें नेलें येमदुती : ॥ भुलवीला नीस्चीती कामरंगें : ॥ छ ॥ नावडती कथा देउळासी [ व पृ. ६१ ] जातां : प्रीये धन सुता : लक्ष तेथे : ॥ २ ॥ कोण नेतो तयां घटीका दीवसा येका : कां रे म्हणे तुका नागवसी : ॥ ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०५६

कथे बैसोनी सादरें : सुखचर्चा परस्परें : ॥ नवल काये तो उधरे : आणीक तरे सुगंधें : ॥ १ ॥ धृ ॥ पुण्यें घेई रे फुकाचें : पाप दुस्ट वासनेचें : पेरील्या बाजाचें : फळ घेई सेवटी : छ ॥ कथा वीरस पाडी अळसें : ॥ छळणा करुणं मोडा रसें : ॥ बुडवी आपणा सरींसें : ॥ वीटाळसें ना वे सी : ॥ २ ॥ सजन चंदनाचीये परी दुर्जन देशत्यागें दुरी : ॥ राहो म्हणे हरी : वीनती करी : तुका हे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०५७

उतरलों पार सत्य जाला हा नीर्धार : ॥ १ ॥ धृ ॥ तुझें नाम धरींलें कठीं : पडीली संवसार तुटी : ॥ छ ॥ तुज मज नाहीं भेद : ॥ केला सहजें वीनोद : ॥ २ ॥ तुं माझा आकार : ॥ मीं तों तु च नीरंधार : ॥ ३ ॥ मीं तुजमाजी देवा : घेसी माझ्या आंगें सेवा : ॥ ४ ॥ मीं तुजमाजी अंचळ : मजमाजी तुझें बळ : ॥ ५ ॥ तुं बोलसी माझ्या मुखें : मीं तों तुजमाजी सुखें : ॥ ६ ॥ तुका म्हणे दवा : वीपरीत ठांई नावां : ॥ ७ ॥ छ ॥

१०५८

जाणें त्याचें वर्म : नेणें त्याचें कर्म : केल्यावीन धर्म : नेणवती : ॥ १ ॥ मैथुनाचें सुख सांगीतल्यां सुन्यें : अनुभवा वांचुन : कळो नये : ॥ २ ॥ तुका म्हणे वीवछाया : ॥ ठांई पावली वीलया : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

० 'र' मुद्दाम समासांत लिहिला आहे.

१०५९

रवी रस्मीं कळा : नये काढीतां नीराळा : ॥ १ ॥ धृ ॥ तैसा आम्हां जाला भाव : आगीं जडोन ठेला देव : ॥ छ ॥ गोडी साखरेपासुनी : ॥ कैसा नीवडती दोन्ही : ॥ २ ॥ **तुका** म्हणे नाद उठी : वीरोन जाये नभापोटीं : ॥ ३ ॥ छ ॥

१०६०

दोन्ही हात ठेउन कटी : उभा भींमरेचा तटी : ॥ कस्टलास साटीं : भग्ती काजें वीठला : ॥१॥धृ॥ भागलासी मायेबापा : बहुश्रंम केल्या खेपा [व.पृ.६२] आम्हांलागी सोपा : दैत्यां काळ क्रुदांतु : ॥ छ ॥ होतास क्षीरसागरी : मही दाटली असुरीं : म्हणउनी घरीं : गौळीयांचे अवतार ॥ २ ॥ केला पुंडलीकें गोवा : तुज पंढरीस देवा : ॥ **तुका** म्हणे भावा : साटी हाती सांपडसी : ॥ ३ ॥ छ ॥

१०६१

राम म्हणे ग्रासोग्रासीं : तो ही जेवीला उपवासी : ॥ १ ॥ धृ ॥ धने धने तें शरीर तीर्थाव्रितांचें माहेर : ॥ छ ॥ राम म्हणे भोगीं त्यागीं तो ही न लीपे ते आंगी : ॥ २ ॥ राम म्हणे वाटे चाली : ॥ येज्ञ पाउलोपाउली : ॥ ३ ॥ राम म्हणे करीतां धंदा : ॥ ध्यान समाधी ते सदा : ॥ ४ ॥ नीत्य राम ध्याये : ॥ **तुका** वंदी त्याचे पाये : ॥ ५ ॥ छ ॥

१०६२

गोड जालें पोट धालें : अवचीत वाचे आलें म्हणतां पाप गेलें : वाठल सेंवा वेसी : ॥ १ ॥ धृ ॥ सत्य माना रे सकळ : उंधरीळा अजामेळ मांहापातकी चांडळ : नामांसाठीं आपुलीया : ॥ छ ॥ चीत पावलें अनंदा : मुख समाधीचें सदा : ॥ म्हणंतां गोवींदा : वेळोंवेळां वाचेसी : ॥ २ ॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी : **तुका** म्हणे दावी : रुप तें ची अरुप : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०६३

तुज नाम नाहीं : तरी माझें सांग काई: ॥ १ ॥ धृ ॥ आतां बोल संतांपुढें। वाद सांगेन नीवाडे : ॥ छ ॥ तुज रुप नाहीं : तरी माझें दावी कांहीं : ॥ २ ॥ अंमर तुं खरा : नव्हें मीं कैसा दातारा : ॥ ३ ॥ खेळसी तुं लीळा : तेथे मीं काये नीराळा : ॥ ४ ॥ साच तुं लटीकी : तैसा मीं हीं म्हणे **तुका** : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०६४

आम्हां सकाळ सुखाचा :॥ जवळी हाट पढरीचा : सादावीती वाचा : रामनाम वैस्णव :॥१॥धृ॥घ्या रे आपुलाले परी : कांहीं नका ठेउं उरी : ॥ वोसरतां भरी : तोंड वरी अंबरें :॥छ॥ वाहे बंदर द्वारका : खेप आली : पुंड–लीका :॥ उभा ची वीकालें येका : संनकादीकां : सांपडलें :॥२॥ धनें हे भुमंडळी : प्रकटली : नामांवळी घेतीं जीं दुबळीं : तीं आगळी सदैवें :॥ ३ ॥ मापें आपुलेन हातें :॥कोन्ही नाहीं नीवारीतें : पैस करु— [ व. पृ. ६३ ] —नियां चीतें : घ्यावें हीतें : आपुल्या :॥४॥नाहीं वांटीतां सरलें : आहे तैसें ची भरलें :॥तुका म्हणे गेलें : वांयावीण नेघता :॥५॥छ॥ छ ॥

१०६५

जयासी नाहीं : येकादसी व्रत : ते ची जाणा प्रेत : रुप शव :॥१॥धृ॥ याचे दीवस नीत काळ : लेखीतोहे :॥रागें दांत खाये : कारकरां :॥छ॥ जयाचे द्वारीं : तुळसीवृंदावन नाहीं : तें समसानग्रहा जाणा :॥२॥जयाचे कुळी नाहीं वैस्णव : त्याचा बुडे भवनदी तापा :॥३॥वीठलाचें नाम नुचारीतां : मुख अधोउर्ध येक कुंभ तैसें :॥ ४॥ तुका म्हणे त्याचे : कस्ट हातपाये :॥कीर्तनां नव जाये :॥ हरीचीया :॥५॥छ॥छ॥

१०६६

कासयानें पुजा करुं केशीराजा : हा ची संदेह माझा : फेडीं आतां : ॥१॥उदकें न्हानु तरी स्वरुप तुझें : तेथे माझें काये वेचे देवा :॥२॥ गंधाचा सुगंधः पुस्पाचा परीमळः तेथे मीं दुबळ : काये करुं :॥३ ॥वावों दक्षणा तरी धातु नारायेण : ब्रह्म तें ची अनं : दुजें काये :॥४॥ फळदाता : तु च तांबोल अक्षता तरी काये आतां : वावों तुज :॥५॥गातां तुं ॐकार टाळी नाद स्वर : नाचावया ठाव : नाहीं कोठे :॥६ ॥ तुका म्हणे मज : अवघें तुझें नाम : धुपदीप राम : कृस्ण हरी :॥७॥छ॥छ॥

१०६७

आगी लगो जाणपणा : आड न यो नारायेणा : घेईन प्रेमपान्हां :॥ भरीन सुख नीवांडें : १ ॥ धृ॥ यासी तुळ यैसें काहा : दुजें त्रीभुवनी नाहीं :॥ काला भात दहीं : ब्रंम्हांदीका दुलभ :॥छ॥ नीमींशा अर्द संतसंगती : वास वैकुंठीं कल्पांती : तीं मोक्षपदें होती ते वीश्रांती : बापुडी :॥२॥ तुका म्हणे हें ची देई : मींतुंपणा खंड : नाहीं :॥ बोलीलों त्या नाहीं : अभेदाचा आडी :॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०६८

संतांपासीं बहु असावें मर्यादा : ॥ फळकेटाचा धंदा : उरफोड : ॥ १ ॥ धृ ॥ वासर तों भुंक गाढवाच परी : उडे पाठीवरी : दंड त्याणें : ॥ छ ॥ समये नेणें तें वेडे चाहाटळ : ॥ अवगुणाचा बोगळ : मन पावे : ॥ २ ॥ तुका म्हणे काये : वाये चाळवाणी : पीट पीट घाणी : हागवनेची : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०६९

[व. पृ. ६४] फटकाळ आंगारा : फटकाळ देव्हारा : फटकाळ विचारा : चाळवीलें : ॥ १ ॥ धृ ॥ फटकाळ हा देव : फटकाळ हा भगत : करवीतो घात : आंणीकां जीवां : ॥ २ ॥ तुका म्हणे अवघे : फटकाळ हें जनं : अनुभवी हे खुण : जाणतील : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०७० आरती

कनकाचा परीयेळीं : उजळुनी आरती : रत्नदीप सोभा : पाजळलीया जोती : ॥ १ ॥ धृ ॥ वोवाळुं गे माय सभा साजीरा : राहीरखुमाईसत्यभामेच्या वरां : ॥ छ ॥ मंडित चत्रभुज दीव्य कानीं कुंडलें : श्रीमुखाची शोभा : प्रभा तेज फांकलें : ॥ २ ॥ वैजयंती माळ वरी शोभे श्रीमंत : संखचक्रगदापद्म : अयोध्यें शोभत : ॥ ३ ॥ सांवळा सकुमार ॥ जैसा कर्दळीगाभा : ॥ चरणीची नेपुरें वांका गर्जती नभा : ॥ ४ ॥ वोवाळीतां मन उभें ठाकलें ठाई : ॥ समाद्रुस्टी तुकया : समाधी लागली पाईं : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१०७१ आरती

तुं चीं तुं आत्मांराम : नव्हेसी देहधारी : स्तुती जरी होये : झडो माझी वैखरी : ॥ पातकी मुढ जन : पडतील आघोरीं : यालागी अवतार : केला महीवरी : ॥ १ ॥ धृ ॥ जयेजया भगतराया : धर्ममुर्ती तुकया : आरती वोवाळीन : भावें तुझीया पांयां : ॥ छ ॥ जये जया भगतराया : ॥ छ ॥ तुझा ठाई असे ब्रह्म : कोन्हां न कळे नेम : जन हें काये जानें : । अनुभवी तो राम : टाकुनी अभीमान : जीवीं धरीलें प्रेम : ॥ बोलोनी महींमा तुझा : जना दिल्हा विश्राम : ॥ २ ॥ अद्भुत महींमां तुझा : काये वर्णु दातारा : उदकेवीण अनें : दीवस कर्मीले तेरा : ॥ आतां हे येसी प्राप्ती : काये घडेल येरां : उदकीं कागद गा : दीन राखीले अठरा ॥ ३ ॥ येकतां तुझें वचन : मन

१ हा अभंग मागें ९१८ वा आला आहे.

होये उन्मन : सचीतानंद गाभा : तुझा ठाई पुर्ण : नित्य हें असो माझें : तुझा पांई अनुसंधान : करुणी कुपादान : देई ईतुकें जाण : ॥ ४ ॥ शास्त्रें आणि वेदांत : सीस्टाचार समस्त आणीला येकवाक्या : जन केलें कुतार्थ : विशेश रामेस्वरा : प्रेम दील्हें बहुत : ॥ वीनवीतो दास वीठा : ठेवीं मस्तकीं हात : ॥ ५ छ ॥ छ ॥ छ ॥

१०७२ ओव्या १००

[व.पृ.६५] गाईन वोवीये पंढरीचा देव : आमंचा तो जीव पांडूरंग : ॥ १ ॥
रंगलें हे चीत माझें : तया पांई : म्हणउनी घेई : हा ची लाहो : ॥ २ ॥
लाहो करीन मीं हा ची सवंसारीः रामकुस्णहरी : नारायेणं ॥ ३ ॥
नारायेण नाम घालितां तुकासी : ॥ न येती या रासी : तपें तीर्थें : ॥ ४ ॥
तीर्थें रज माथां वंदीती संताचे : जे गाती हरीचे : गुणंवाद : ॥ ५ ॥
गुणवाद ज्याचे गातां पुज्य जाले : ॥ बडीवार हा बोले : कोणं त्यांचा : ॥ ६ ॥
त्यांचा पार नाहीं कळला वेदांसी : आणीक ही रुसी : वीचारीतां : ॥ ७ ॥
वीचारीतां तैसा होये त्यांच्या भावें : नीजरुप ठावें : नाहीं कोण्हां : ॥ ८ ॥
कोण्हां कवतुक न कळे हे माव : ॥ नीजेलीयां जीव धंदा करी : ॥ ९ ॥
करुनी कवतुक खेळे हा ची लीळा व्यापुनी नीराळा : पाहातुसे : १० ॥
सेवटी आपण येकला ची खरा : सोंग हा पसारा : नट केला : ॥ ११ ॥
लावीयेलें चाळां मींपणें हें जन भोग तयांकुन भोगवीसी : ॥ १२ ॥
वीशंई गुंतलीं वीसरलीं तुज : ॥ कन्यापुत्र भाज : धनलोभा : ॥ १३ ॥
लोभे गीळी फांसा अवींसाच्या आसा : ॥ सांपडोनी मासा तळमळी : ॥ १४ ॥
तळमळ याची तरी च सपैल : जरी हा वीठल : आठवीती : ॥ १५ ॥
आठवे हा तरी संतांचा सांगात : ॥ कींवा हें संचीत : जन्मातर : १६ ॥
जन्मांतरें तीन भोगीतां कळती : केलें तें पावती : ॥ करीतां पुढें : ॥ १७ ॥
पुढें जानोनींयां : करावें संचीत : पुजावे अतीत : देवद्वीज : ॥ १८ ॥
जन्म तुटे यैसें नव्हे तुम्हां जना पुढील्या पावना : धर्म करा : ॥ १९ ॥
करा जप तप अनुस्टानें याग : ॥ संती हा मारग : स्थापीयेला : ॥ २० ॥
लावीयेलीं कर्मे सुध आचरणें : ॥ कोण्हयां येका तेणें : काळे पवे : ॥ २१ ॥
पावले सत्वर : नीष्कामं उदार : ॥ जींकीली अपार वासना हे : ॥ २२ ॥
वासनेचें मुळ छेदील्या वांचुनीं : ॥ तरलोंसें कोन्हीं : न म्हणावें ॥ २३ ॥
न म्हंणावें जालों पंडीत वाचक : करुं मंत्र घोश : अक्षेराचा : ॥ २४ ॥

पाळेयाला येक ते चा आवडीन :॥ लोक दंभ मान : देह सुख :॥ २५ ॥
सुखें तरी घडे : भजनाचें सार : वाचे नीरंतर : रामराम :॥ २६॥
राम हा उचार तरी च बैस वाचे : अनंतां जन्मांचें : होईल पुण्यें :॥ २७॥
पुन्ये यैसें कोण रामानामापुढें :॥ काये तें बापुडें : यागयेज्ञ :॥ २८॥
याग येज्ञं तपें : सौंसारदायेकें :॥ न तुटे हा येकें : नामेंवीण :॥ २९॥ [व.पृ.६६]
नामेंवीण भवसींधु पावे पार : यैसा हा वीचार : नाहीं दुजा :॥ ३०॥
जाणती हे भगतराज माहामुनी :॥ नामसुख धनी :॥ अमृताची :॥ ३१॥
अमृताचें नीज सारतत्व बीज :॥ गुह्याचें हे गुज : रामनाम :॥ ३२॥
नामें असंक्षात तारीलें आपार :॥ पुराणीं ही सार प्रसीध हें :॥ ३३॥
हें ची सुज आम्हीं घेउं सर्व काळ :॥ करुनी नीर्मळ हरीकथा :॥ ३४॥
कथाकाळीं लागे समाधी :॥ तत्काळ हे बुधी :॥ दुस्ट नासे :॥ ३५॥
नासे लोभ मोहो आसा त्रुस्णा माया : ॥ गातां गुणं तया : वीठोबाचे : ॥ ३६॥
वीठोबाचे गुण मज आवडती :॥ आणीक हें चीतीं न लगे काही :॥ ३७॥
काहीं कोण्हीं नका सांगो हे उपाव : ॥ माझे मनी भाव : नाहीं दुजा :॥ ३८॥
जाणोनींयां आम्हीं दील्हा जीवभाव :॥ द्रुढ याचे पाव : धरीयेले : ॥ ३९॥
धरीयेले आतां नोसी जीवेंसी :॥ केला सेवीसीं नीरधार :॥ ४०॥
नीरधारें आतां राहीलों ये नेटीं :॥ संवसारें तुटी : करुनींयां : ॥ ४१॥
येणे अंगीकार : केला पांडूरंगें : रंगविलें रंगें : आपुलीया : ४२॥
आपुली पाखर घालुनीयां वरी : ॥ आम्हांसी तो करी : येत्न देव :॥ ४३॥
देव राखे तया आणीकांचें काये : करीतां उपा

( पुढें ६७।६८।६९ पूवार्ध हीं पानें फाटलीं गेलीं आहेत. )

[व.पृ. ६९ उ० ] आंगीं : ॥ कर्मत्यागी : लंड तो : ॥ २॥ **तुका** म्हणे लंड त्यासी : । भक्ती दुसी हरीची : ॥ ३॥ छ॥

१०७३

पुर आला आनंदाचा : लाटा उडती प्रेमाच्या :॥ १ ॥ धृ ॥ बाधों वीठल सागडी :॥ पोहोन जाउं पैल थडी :॥ अवघे जन गडी घाला उडी भाईनो :॥ छ॥ हें नाहीं सर्वकाळ : ॥ अमुप अनंदाचें जळ : ॥ २॥ **तुका** म्हणे बहुतें पुन्यें : ॥ वोघ आला पंथें येणें : ॥ ३॥ छ॥ छ॥ छ॥ छ॥

१०७४

गंगा आली आम्हांवरी :॥ संत पाउलें साजीरीं :॥ १ ॥ धृ ॥ तेथे करीन अंघोळी : उडे चरणरजधुळी : येती तीर्थावळी : पर्वकाळ सकळ : ॥ छ ॥ पाप जळालें पळाले : भवदुख दुरावलें :॥ २ ॥ तुका म्हणे धन्ये जालों :॥ सप्त सागरांत न्हालों : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०७५

सकळ चींतामणी शरीर : जरी जाये अहंकार : समुळ आशा: नींदा हींवसा : नाही कपटबुधी : देहे नीर्मळ : स्फटीक जसा : [ व. पृ. ७० ] ॥ १ ॥ धृ ॥ मोक्षाचीं तीर्थे न लगे वाराणसी :॥ येती तयापासी सकळ जने : तीर्थीं तीर्थ जाला : तो येक मोक्षी: तेणें ची दरुसेणे :॥ छ ॥ मन सुध तया काये करीती माळा : मंडीत सकळां भुसणासी :॥ हरीच्या नामें गर्जती सदा: आनद तया मानसी : ॥ २ ॥ तन मन ध्यान : दिल्हें पुरुशोतमा : आश्या नाहीं कवणाची : तुका म्हणे परीसाहुनी आगळा: उपमा काये वर्णु त्याची : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०७६

अणोंरणींयां थोकडा : तुका आकाशायेव्हडा ॥ १ ॥ धृ ॥ गीळुनी सांडीलें ॥ कळीवर :॥ भवभ्रमाचा आकार : ॥ छ ॥ सांडीली त्रीपुटी दीप उजळीला घटी : ॥ २ ॥ तुका म्हणे आतां : उरलों उपकारापुरता : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०७७

धणीं नुपरे गुण गाता : रुप दृस्टी न्याहाळीतां : ॥ १ ॥ धृ ॥ बरवा बरा पांडुरंग :॥ कांती सावळी सुरंग : ॥ छ ॥ सकळ मंगळांचे सार : सुखसीधीचें भांडार : ॥ २ ॥ तुका म्हणे या सुखा : ॥ नाहीं पार नव्हे लेखा : ॥ ३ ॥ छ ॥

१०७८ अभंग १६

नेंणती वेदस्तुति :॥ तुज कोंण्हीं : ॥ आम्हां भावीकां वाचुनी : ॥ १ ॥ धृ ॥ रुप आवडे आम्हांसी : तैसा होसी रुसीकेशी :॥ छ ॥ आम्हीं भावें बळीवंत : ॥ तुज घालुं हृदयांत : ॥ तुका म्हणे तुज धाक : देतां पावसील हाक : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हा अभंग मागें ७६२ वा आला आहे.

१०७९

कळों आलें तुझें जीणें :॥ देवा तुं माझें पोसणें :॥ १ ॥ धृ ॥ वाट पाहासी आठवाची : ॥ सता सतंत कईची : ॥ छ ॥ बोलवीतां यांवें रुपा : ॥सदा नीर्गुणी च लपा : ॥ २ ॥ तुका म्हणे तुं परदेसी : ॥ येथे आंम्हां आंगेंजीसी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०८०

करुं स्तुतीपरत्वें नींदा : ॥ तुम्ही जाणा हें गोवींदा : ॥ १ ॥ धृ आम्हां लडीवाळां : ॥ चे बोल : ॥ करा कवतुक नवल : ॥ छ ॥ बोबडा उतरी : ॥ तुम्हां रंजवीतों हरी : ॥ २ ॥ मागोतों भातुकें : ॥ तुका म्हणे कवतुकें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ३

१०८१

तुं पांढरा स्फटीकमणी : ॥ करीसी आणी— [ व. पृ. ७१ ] —कां त्याहुनी : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी तुझ्या दारा : ॥ न येत ते ठकले दातारा : ॥ छ ॥ तुझी ठावी नांदनुकः ॥ अवघा बुडवीला लोक : तुका म्हेणे ज्याचें घेसी : त्यासी हें ची दाखवीसी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ४

१०८२

तुजसी समदुं ची खोटा : परता परता रे थोंटा : ॥ १ ॥ धृ ॥ देव काये तुझें व्यावें : आप आपणां ठकावें : ॥ छ ॥ जेथे मुद्दल नये हाता : ॥ वेज लेखावें मोजीतां : ॥ २ ॥ तुका म्हणे यैसा : ॥ त्रीभुवनी तुझा ठसा : ॥ ३ ॥ छ ॥ ५

१०८३

याची हाका तुझे दारी : ॥ सदा देखों रीणकरी ॥ १ ॥ सदा करीसी खंडदंड : ॥ देवा बहु गा तुं लंड : ॥ छ ॥ सुंषें गोवीसी मोकला : लपउनीयां आपणा : ॥ २ ॥ येकें येक बुझावीसी : ॥ तुका म्हणे ठक होसी : ॥ ३ ॥ छ ॥ ६

१०८४

आम्हीं जाणो तुझा भाव : ॥ द्रुढ धरीयेले पाव : ॥ १ ॥ धृ ॥ फांकों नेंदु चुकावीतां : ॥ नेघों थोडें बहु देतां : ॥ छ ॥ बहुतां दीसाचें लीगाडः ॥ आलें होत होत जड : ॥ २ ॥ तुका म्हणे आतां : ॥ नेघों सर्वस्व देता : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ७

१०८५

सोंसुनींयां अपती : जोडी दील्ही तुझे हातीं : १ ॥ धृ ॥ याचे हे ची उपकार : अंतीं आम्हांसी वेव्हार : ॥ छ ॥ नाव रुपा जाला ठाव : ॥ कोण म्हणें तुज देव : ॥ २ ॥ तुका म्हणे हरी : तुला ठावा दील्हा घरीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ८ ॥

---

हे तीन हि अभंग ८६६-६७-६८ असे पूर्वी आले आहेत.

१०८६

आम्हीं देतों हाका : का रे जालासी तुं मुंका :॥ १ ॥ धृ॥ नोबलसी नारायेणा : कळलासी : ॥ क्रीयाहीणा : ॥ छ ॥ आधीं करुं चौघाचार : मग साडूं भीडभार :॥ २ ॥ तुका म्हणे सेवटी तुम्हां आम्हां घालुं तुटी : ॥ ३ ॥ छ ॥ ९

१०८७

नव्हे भीडा हें कारण : ॥ जाणे करुं यैसें जन : ॥ धृ ॥ जों जों धरावा लोकीक :॥ रवडवीतोसी आंणीक :॥छ॥ चाल जांवं संतापुढें : तें हें नीवडती कोडें : ॥ २ ॥ तुका म्हणे तुं नीर्लज आम्हां रोकडी गरज : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १०

१०८८

बहु होता भला : पर ये रांडेनें नासीला : ॥ १ ॥ [ व. पृ. ७२ ] धृ ॥ बहु सीकला रंग चाळे : ॥ खरें खोटें याचे वेळे : ॥ छ ॥ नव्हतें आळवीत कोण्हीं : ईनें केला जगरुणीं : ॥ २ ॥ ज्याचें त्यास नेंदी देउं :॥ तुका म्हणे धांवे खांउ : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ११

१०८९

काये करांवें तें आतां : झालें न येसें बोलतां : ॥ १ ॥ धृ ॥ नाहीं दोघांचीये हातीं : ॥ गांठी घालावी येकांती : ॥ छ ॥ होये आपलें काज : तों हे भीड सांडूं लाज : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : हातीं नीवडूं हा गोवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १२

१०९०

गीण वेर हत्या हें तों न सरे नेंदीतां : ॥ धृ ॥ हें कां नेणां पांडूरंगा :॥ तुम्हीं सांगतसा जगा : ॥ छ ॥ माझा समंधु तो कीती : ॥ चुकवा लोकांची फजीती : ॥ २ ॥ तुका म्हणे याची साटी मज घेतां नये तुटी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १३

१०९१

आपलें मागता : ॥ काये नाहीं आम्हां सता : ॥ १ ॥ धृ ॥ परी या लोकीका कारणें : ॥ उरी ठेवीलें बोलणें : ॥ छ ॥ ये ची आतां घडीः ॥ करुन बैसतां चीपडी : ॥ २ ॥ तुका म्हणे करीतों तुला : ॥ ठाव नाहींसें वीठला : ॥ ३ ॥ छ ॥ १४ ॥

१०९२

केली सलगी तोंडपीटी : ॥ आम्ही लडीवाळ : धाकुटीं : ॥ १ धृ ॥ न बोलावें तें ची आलें : ॥ देवा पाहीजे साहीलें ॥ छ ॥ ॥ अवघ्यांमध्यें येक वेडें : ॥ ते ची सळवीती कोडें : ॥ २ ॥ तुका म्हणे मायेबापा : ॥ आम्हांवरी कोपो नका : ॥ ३ ॥ छ ॥ १५ ॥

१०९३

सीकउनी बोल केलें कवतुक नवल : ॥ १ ॥ ध्रु ॥ आपणीयां रंजवीलें : बापें माझया वीठलें ॥ छ ॥ हातीं प्रेमाचें भातुके : ॥ आम्हां देउनीयां नीकें : तुका म्हणे टाहो : ॥ पाहे रखुमाईचा नाहो : ॥ ३ ॥ येकोन अभंग १६

१०९४

मार्गें बहुत : ॥ याची गेले साधुसंत : ॥ १ ॥ धृ येसीं गर्जती पुराणें : । नका जाउं अडराणें :॥ छ ॥ चोखाळल्या वाटा : नलगे पुसाव्या : ॥ धोपटा : ॥ २ ॥ कुंचे झळकती पताका : ॥ गरुडटके म्हणें तुका : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०९५

काये नव्हे केलें ॥ येका चींतीतां वीठलें : ॥ १ ॥ धृ ॥ सर्व साधनाचें सार : ॥ भवसीधु उतरी पार : ॥ छ योग याग तपें : ॥ केलिं तयानें उमापें : ॥ २ ॥ तुका म्हणें जपा : ॥ मंत्र तींअक्षेरीं सोपा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०९६

[व.पृ. ७३] करुनींयां जतन : ॥ कोणां कामां आलें धन : ॥ध्रु ॥ यैसें जाणत जाणतां : ॥ का रे होतोसी नेणता ॥छ॥ प्रीया पुत्र बंधु नाहीं तुज त्यासी समंधु : ॥ २ ॥ तुका म्हणे येका हरीवीण नाही सखा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०९७

माझ्या[1] मुखा बांटा न यो हें वचन होवें हें संतान : द्रव्य कोन्हा : ॥१॥ धृ ॥ फुकाचा वीभाग : पतन दुखासी : ॥ दोन्हीं मुळें त्यासी : तें ची साधे : ॥ छ॥ नाईकावी नींदा अस्तुती माझ्या काने : ॥ सादर या मनें : होउं नये ॥ २ ॥ तुका म्हणें देव असाध्ये यामुळें : ॥ आशा मोहो जाळें गुतलीयां : ॥ ३ ॥ छ ॥

१०९८

नीमळो[2] खावया न वाढो संतान : । परी हा नारायेण कृपा करु : ॥ १ ॥ धृ॥ यैसें माझे वाचे मज उपदेसी :॥ आणीकां लोकासी : हे ची सांगें ॥ छ ॥ वीटंबो शरीर होवीं का वीपती :॥ परी राहों चीती : नारायेणु : ॥ २ ॥ तुका म म्हणे नासीवंत हें सकळ : आठवें गोपाळ : तें ची हीत । ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१०९९

माझ्या[3] वीठोबाचा कैसा प्रेमभाव : ॥ आपण ची देव : होये गुरु : ॥ १ ॥ धृ ॥ पढीये देहभाव पुरवीते वासना : अतीं ते आपणा : पासी न्यावें : ॥ छ ॥

---

१ हे तीन हि अभंग मागें १००९-१०-११ हे आले आहेत.

जाळा तुम्हीं० ॥ येम सांगे० वगैरे पृष्ठ १९८ वर आलेले च अभंग पुन्हां. ‘ नामधारकांच्या ’ ० येथें ७३ पृष्ठ संपतें.

‘ आमची कृपाळु० ’ इत्यादि १०१५ वा पुन्हां.

११००

जीवजीती जीवनासंगें : मछा मरण त्या वीयोगें : ॥ १ ॥ धृ ॥ जया चीती जैसा भाव : ॥ तयाजवळी तैसा देव : ॥ छ ॥ सकळा पढीये भानु : परी त्या कमंळाचे जीवन : ॥ २ ॥ तुका म्हणे माता : ॥ वाहे तान्हया चींता : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११०१

सेजेचा येकांत आगीपासीं कळे : ॥ अधपात ॥ १ ॥ धृ ॥ राहो अथवा मग जळो आगी मधीं : ॥ नीवाडू तो आधी : होउनी गेला : छ ॥ भेणे झडपणी :

[ येथून पुढें दोन बोटें जागा मुळांत कोरी सोडिली आहे. ]

११०२

नाहीं दुकळलों अना परी या मानु जनार्दना : ॥ १ ॥ धृ ॥ देव केला सर्वसाक्षी : ॥ काळी आणी सुध पक्षीं : ॥ छ ॥ भोगी भोगवीता : ॥ बाळा सवें तें ची पीता : ॥ २ ॥ कर्म अकर्मी जळालें : ॥ प्रोढ तुका तें उरलें : ॥ ३ ॥

[ पुढें पान संपेपर्यंत म्हणजे चार बोटें जागा मुळांत कोरी. ]

११०३

[त्र.पृ.७५] आतां येथे लाजे नाहीं तुझें काम : ॥ जाईं मज राम : आठउं दे : ॥१॥धृ॥ तुझे भीडे माझे बहु जाले घात : ॥ केलों या अंकीत : दुर्जनाचा : ॥ छ ॥ मा[illegible] मज पारीखे माहेर : ॥ नटोनी साचार : चाळवीलें : ॥ २ ॥ सुखासा[illegible]ायेलें खांदी : ॥ तेणे बहु मादी मेळवीली ॥ ३ ॥ केला चौघांचा[illegible] :[illegible]ंचा मधीं : ॥ नाहीं दील्ही शुधी : धरुं आशा : ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां घेईन काटीवरी : ॥ र धीतां कैवारी केला देव : ॥ ५ ॥ छ १

११०४

आजीवरी होतों तुझे सतेषाली : ॥ तोंवरी तों केली बीटंबणा : १ ॥ धृ ॥ आतां तुज राहों नेंदी या देशांत : यैसां म्यां समर्थ केला धणी : ॥ छ ॥ सापें रीगु केला कोठें बाळपणी : ॥ होतीती : ॥ पापीणी : काये जाणो ॥ २ ॥ तुका म्हणे म्यां हा बुडवीला वेव्हार : तुझें ची ढोंपय्र सोलावया : ॥ ३ ॥ छ २

देवाच्या नीरोपें पीटीतो डागोरा :॥ लाजे नका थारा : देउं कोण्ही :॥१॥ धृ ॥ मोडीले ये रांड सुपंथ मारग : चालवीलें जग : येमपंथे : ॥ छ ॥ परीचारीं केली अपली च रुढी :॥ पोटाचीते कुडी : ठावी नाही :॥२ ॥ तुका म्हणे आणा राउळा धरुणं फजीत करुणं : सोडूं मग : ॥ ३ ॥ ३ ॥ छ

११०६

कंटी क्रुस्णमणी : ॥ नाहीं अशोभे ते वाणी ॥ १ ॥ धृ ॥ हो कां पुरुश अथवा नारी :॥ रांड तथा नावें षरी :॥ छ ॥ नाही हातीं दान :॥ सुरपणाचें कांकण :॥ २॥ वाळीलीं तीं संती केली बोडुन फजीती : ॥ ६ ॥ तुका म्हणे ताला नाहीं त्याची हीनकळा : ॥ ४ ॥ छ ॥ छ ॥

११०७

आम्हीं सदेवं सुडकें : ॥ जवळी चोर येतां धाके: ॥ जाउं पुडती भीके : कुतरीं घर रापती :॥ १ ॥ धृ॥ नांदनुक तरी येसी सा: गा: ॥ नाहीं तरी वांया भागा :॥ थोरपण आंगा तरी येसें आणावें : ॥ छ ॥ अक्षेई साचार : ॥ केलें सायासांनी घर : येरंड सींवार : दुजा भार न साहाती : ॥ २ ॥ धनकन घरोघरीं : पोट भरे भीकेवरी : जतन तें करि : कोण गुरें वांसरें : ॥ ३ ॥ जाली सकळ ही नींस्चींती: भांडवल सेणमाती : झळझळीत भीती : वृंदावणें तुळसीचें ॥ ४ ॥ तुका म्हणे देवा अवघा नीरवीला हेवा : कुंटुंबाची सेवा : तो ची करी आमुची : ॥ ५ ॥ छ ॥ छ॥

११०८

भुतीं भगवंत भाव : ॥ मात्र सहीत जीव अद्वैत तो ठाव: ॥ नीरंजन येकला ॥ १ ॥ धृ ॥ येसीं गर्जती पुराणें : वेदवाणी सकळ जनें : संत गर्जती तेणें : अनुभवें नीर्भर :॥ छ॥ माझें तुझें हा वीकार : नीरसतां येकंकार : ॥ न लगे काहीं फार : वीचार ची करणें : ॥२॥ तुका म्हणे दुजें :॥ हें तों नाहीं च सहजें संकल्पाच्या काजें : आपेंआप वाढले : ॥ ३ ॥ छ ॥

११०९

धृ मन करा रे प्रसन : सर्व सीधींचें कारण : ॥ मोक्ष अथवा बंधन : ॥ सुखसाधन ईछा तें : ॥ छ ॥ मने प्रतीमा स्थपीली : मने मना पुंजा केली : मने ईछा पुरवीली : मन माउली सकळांची :॥ १ ॥ मन गुरु आणी सीश्य :॥ करी आपुलें ची दास्ये : ॥ प्रसन आपआपण्यांस: ॥ गती अथवा अवगती : ॥ २ ॥

साधक वाचक : आणी पंडीत : ॥ श्रोते वक्ते आईका मात :॥ तुका म्हणे अनुदेवत : नाहीं नाहीं दुसरे : ॥ ३ ॥ छ ॥

१११०

नेणें फुंकु कान : नाहीं येकांतीचे जन : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्हीं आका हो संत : ॥ माझो सादर वृत्तांत : ॥ छ ॥ नाहीं देषीला तो डोळां देव दाषउं ते कळा : ॥ १ ॥ चींतनाच्या सुषें : ॥ तुका म्हणे नेणें दुषें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११११

त्याग तरी येसा करा : ॥ अहंकारा दवडावें : ॥ १ ॥ धृ ॥मग जैसा तैसा राहें : ॥ काये पाहें उरलें तें : ॥छ ॥ अंतरीचें वीसंम गाढें : ॥ येउं पुढें नेदावें : ॥ २ ॥ तुका म्हणे सुध मन : समाधान पाहीजे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१११२

[व.पृ.७७] वेद जया गाती : आम्हां तयाची संगती ॥ १ ॥धृ ॥ नाम धरीयेले कठीं: अवघा सांटवीला पोटीं : ॥ छ॥ ॐकाराचें बीज : हातीं आमुचे तें नीज : : ॥ १ ॥तुका म्हणे बहु मोटें : अणोरणीयां तें धाकुटें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१११३

देव बराडी बराडी : देठासाटीं घाली उडी : ॥१ ॥ देव भ्येड देव भ्येड : राषे बळीचें कवाड : ॥ २ ॥ देव भावीक भावीक : होये दासांचें सेवक : ॥ ३ : देव हो या देव हो या जैसा म्हणे तैसा तया : ॥ ४ ॥ देव लाहान देव लाहान॥ तुका म्हणे अणोंरणं : ॥ ५ ॥ छ ॥

१११४

गेलें पळालें दीवसा रोजें : ॥ काये म्हणतोस माझें माझें : ॥ १ ॥ धृ ॥ सळे धरुणी बैसला काळ फांकों नेंदी घटीका पळ : ॥ छ ॥ कां रे अद्यापी न कळे : केंस फीरले कान डोळे : ॥ २ ॥ हीत कळोनीयां असतां हातीं : ॥ तोडीं पाडुन घेसी मातीः । ३ ॥ तुज ठाउकें मीं जाण्हार : पाया सोधुन करीसी घर। ॥ ४ ॥ तुका म्हणे वेगें : पंढरीराया : शरण रीघें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१११५

धृ ॥ कां रे तुम्हीं नीरमळ हरीगुण गाना : नाचत अनंदरूप वैकुंठा जाणा : ॥ १ ॥ काये गणीकेचा याती अधीकार मोटा : दोसी अजमेळ : येसीं नेली वैकुंठा : ॥ १ ॥ येसे नेणों मागें कीती : अनंत अपार : ॥ पंचमांहादोसी

पातकां नाहीं पार :॥ २ ॥ पुत्राचीया लोभे : नस्ट म्हणे नारायेणं : कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुन्य :॥ ३ ॥

१११६

उठाउठीं अभीमान : जाये यैसें स्छळ कोण :॥ १ ॥ धृ ॥ तें ये पंढरीस घडे खळां पाझर रोकडे :॥ छ ॥ नेत्रीं अश्रुचीया धारा : कोंठें रोमांच शरीरा : ॥२ ॥ तुका म्हणे काळा : कोंठें अभेद देखीला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१११७

[ व.पृ.७८ ] वाघें उपदेसीला कोल्हा : सुखें खावं यावें मला : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ अंती मरसी तें न चुके : मज ही मारीतोसी भुके : ॥ छ ॥ येरु भला : भला निवाड तुझ्या तोंडें जाला : ॥ २ ॥ देहे तों जान्हार :घडेल हा उपकार : ॥ ३ ॥ येरु म्हणे मनी : यैसें जावें समजोनी : ॥ ४ ॥ गांठी ठकांठकां : त्यांचा धर्म बोले तुका : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

१११८

सुखें वाळंब दावी गो हा : माझें दुख तुम्हां न णवे पाहा हो :॥ १ ॥ धृ॥ आवडीचा मारीला वेडा : होये होये कैसा म्हणतो भीडा :॥छ॥ नपिट मज न चले अनं : पाईली गहुं सांजा ती ण ॥ २ ॥ अखंड मज पोटांची वेथा : दुध भात साखर पथ्या : ॥ ३ ॥ हाड गळोन गेले मासें : माझें दुख तुम्हां नेणवे कैसें : ॥ ४ ॥ गेले वारीं तुम्ही आणीली साखर : च्यारी दीस गेली साडे दाहा सेर : ॥ ५ ॥ आंगी चंदन लावीं भाळीं : अखंड सुळ माझे कपाळी : ॥ ६ ॥ दों पाहारा मज लेहेरें येती : म्हणउनी पडें बांज सु पती : ॥ ७ ॥ आथुरुनावरी घालीं फुलें : नसा [ येथें ७८ वे पृष्ठाचा पूर्वाध संपला. ]

घातली ते आन : पालावया : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ ६ ॥

१११९

:॥ गेला तरी सुखें जावो नरकासी : कळकीया वींशी सींवो नये : ॥ १ ॥ धृ ॥ रजस्वला करी वेलासी अघात : ॥ अंतरें तो हीत : दुरी बरें :॥ छ ॥ उगीं च कां आली नासवांवी फळे :॥ वीटाळ वीटाळें कालउनी : ॥ २ ॥ तुका म्हणे लोणी घालुनी सेणांत : ॥ उपेगाची मात : का –ये तेथें: ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

गौळणी ११२०

आजी कां वो तुं दींसतसी दुस्चीती : करीतां काम न लगे तुझां चीती : दीलहे ठेउं तें वीसरसी हातीं :॥ काये नेणों बैसला हरी चीती ॐ। १ धृ ॥ सर परती

जालीस आतां भांड : ॥ कैसें दावीसी जगासी या तोंड : ॥ व्याली मायेते लाजवीली रांड : ॥ नाहीं थार दोन्हीं ठांई जाला खंड वो ॥ : छ ॥ आहे तैसें तें उमटलें [व.पृ.७९] वरी : बाहे संपादनी अंतरीची चोरी : नाहीं मर्यादा नींसंक बावरी : मन गोवींदी ॥ काम तें देहे करी ॐ ॥ २ ॥ नाहीं करीत उत्तर कोण्हासवें : पराधीन भोजन दील्हें खावें : नाहीं अंचळ सांवरावा ठावें : देखों उदासीन गे देहे भावें ॐ : ॥ ३ ॥ कोठे नेणों हा फावला येकांत : सदा कीलकील भोवंती बहुत : ॥ दोघें येकवाट बोलावया मात : नाहीं भये धरीलें दील्हात वो : ॥ ४ ॥ करी कवतुक खेळ खेळे कान्हा : दावी लाघव भांडवी सासुसुना : ॥ परा भक्ती हे शुध तुम्हीं जाणा : तुका म्हणे हें कळों यावें जना : वो : ॥ ५ ॥ १

## ११२१ गोळणी

धृ ॥ याॐ या चला जाउं सकळा : पाहों हा सोहोळा : आजी वृंद्रा-वणीचा : ॥ छ ॥ वाईला गोपाळें वेणुनाद पडे कानीं : धीर नव्हे मनी : चीत जालें चंचळ : ॥१ ॥ उरलें तें सांडा काम नका करुं गोवी : हे ची वेळ ठावी मज कृष्णभेटीची : ॥ २ ॥ नीवतील डोळे याचें श्रीमुख पाहातां : बोलत तीं आता घरींची सोसु वाट. : ॥ ३ ॥ कृस्णभेटीआड कांहीं नावडे आणीक : लाज तरी लोक मने जाली उदास : ॥ ४ ॥ येकायेकीं साधावीत चालीयेल्या सवें : ॥ तुका म्हणे देवें : रुप केल्या तन्मये : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ २ ॥

## ११२२ गौळनी

धरीला पालव न सोडी माझा येणें : कांहीं करीतां या नंदाचीया कान्हें : येकली न ये तें मीं ऐसें काये जाणे : कोठे भरल्यें या अवघड्या राणें : ॥ १ ॥ धृ ॥ सोडी पालव जांउं दे मज हरी : वेळु लागला रे कोपतील घरी : सासु दारुण हा सासुरा ही भारी : तुज मज सांगतां नाहीं उरी : ॥ छ ॥ सखीया वौसीया होती या मजपासी : तुज फावलें रें फांकतां तयांसी : होतें अंतर तरी सांपडतें कैसी येकायेकीं कैसा आंगी जडलासी : ॥ २ ॥ कैसी भागली करीतां उतर : शक्ती मावळल्या असुडीतां वकर : स्वामी तुकयाचा भोगी या चातुर : भोग भोगी त्याचा राखे लोकाचार : ॥ ३ ॥ छ ॥ ३ ॥

## ११२३ गौवळनी

[व.पृ.८०] भरला उलंडून रीता करीं घट : मीस पाणीयांचें गोवींदाची चट : ॥ चाले झडझडां उसंतुनी वाट : पाहे पाळतुनी उभा ते चीं नीट : ॥ १ ॥ धृ ॥ चाळां लावीयेल्या गोपी गोपीनाथें : जाणे आवडी तें रुप तेथे तेथे : ॥ दावी

बहुतांच्या बहुवस पंथें : गुणांतीतें : खेळु मांडीयेला येथे : ॥छ॥ मनी आवडी तें करावें उतर : कांहीं नीत्याचा पाहोनी आधार : उगा राहें कां मारीसी कर : ॥ मात वाढवीते उतरें उतर : ॥ २ ॥सुखें अंतरींच्या बाहे ठसठसी : म्हणे वीनोद हा काये सो ग यांसी : ॥ तुज मज काये सोईरीक यैसी : नंदानदनु या थोरपणें जासी : ॥ ३ ॥ धरीली खोडी देईं टाकुनी यां मागें : नये वीनोद हा कामा मज संगें : ॥ मीठी घालीन या जीवाचीया त्यागें : ॥ नाहीं पडीलीं ठावी तों तुझी सोगें : ॥ ४ ॥ करी कारण तें कळों नेदी कोण्हां : घरीं वीस्वास तो बाहेरंग जना : ॥ मन मीनलें **तुका** म्हणे मना : भोग अंतरीचा पावे नारायेणां : ॥ ५ ॥

११२४ गौळणी

नका काहीं उपचार माझ्या शरीरा : करुं न साहाती : बहु होतो उबारा मनोजन्य वेथा : वेध जाला अंतरा : लवकरी आणा नंदाचीया कुमरा : ॥ १ ॥धृ॥ सखीया वो साजणी तुम्हीं प्राण वल्लभा : नीवेदीला भाव आर्त भुत या लोभा उमटलें आंगीं वो सावळी हे प्रभा : साच हे अवस्था : कळे मज माझ्या क्षोभा : ॥ छ ॥ नये कळों नेदावी हे : कुणीयासी मात : आसावा तयासीं अखंडीत येकांत : येकायेकी साक्षी : तेथे आपुलें चीत : कोण्या काळे होईल नेणें भाग्य उदति ॥ २ ॥ देहेभान स्वादसीन : नीद्रे खंडणं : राहीले ताटस्छ उन्मळीत लोचन : अवघें वोसावोनी : उरलें ते चरण : **तुका** म्हणे दर्शनापें आलें जीवन : ॥ ३ ॥ छ ॥

११२५ गौळणी

आजी नवल मी आलीयें या राने : भेटी अवचीत नंदाचीया कान्हें : गोवीलें सांगतां वो सकळ ही जने : होते संचीत वो आणीयेलें तेणें : ॥ १ ॥ धृ ॥ गेलें होउनी न चले आतां काहीं : साद घालीतां जवळी दुजें नाही [व.प्र.८१]आंगी जडला वो उरलें तें काई : आतां राखतां गुमान भलें बाई :॥ छ ॥ बहु काम मज नाहीं आराणुक : येक सारीतां तों पुढें उभें येक : ॥ आजी टाकुनी आलीयें सकळीक : पुढें रचलें आणीक कवतुक : ॥ २ ॥ चींतां करीतां हरीली नारायेणें : आंगसगें मीळतां दोघेजणें : सुखें नीर्भर जाली त्याच्या गुणें : **तुका** म्हणे खुंटलें गेगेंजाणें : ॥ ३ ॥ ४

११२६ गौळणी

हरी तुझी कांती रे सावळी : मी रे गोरी चांपयांची कळी : ॥ तुझीया स्परुशें होईन काळी : मग हें वाळी जन मज : ॥ १ ॥ धृ ॥ उगा राहे न करी

चाळा : तुज कीती सांगों रे गोवळा : तुझा षरवड रे कांबळा : अरे नंदबाळा अलगटा : ॥छ॥ तुज भये लाज संकां नाहीं : मज सजणें पीसुनें व्याही : आणीक मात बोलों काहीं : कैसी भीड नाही तुज माझी : ॥२॥ मज काये म्हणेल हें जन : धीकारीती : वीभचारीन : तुझे आंगीं देषोनी लक्षण : मग वीटंबना होईल : ॥ ३ ॥ तुझीये आंगीं घुरट घाणी : बहुत षासी दुध लोणी : ॥ घरींचें बाहेरी चोरुणी : ॥ मीं रे चांदीणी सकुमार : ॥ ४ ॥ वचन मोडी नेंदी हात : कळलें न साहेसी मात : **तुकया** स्वामी गोपीनाथ : जीतमुक्त करुनीयां भोगी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ ५

## ११२७ गौळणी

गोरस घेउनी सांते नीघल्या गौळणी : पुढें कुरणाची करणी कायी करी तेथें : ॥ झाला पानसारा मीठी घातली पद्रा : आधीं दान माझें सारा मग चला पंथें : ॥ १ ॥ धृ ॥ सर जाउं दे रे सर जांउं दे रे : सर जांउं दे परता : : मुळीं भेटलासी आतां : नाट लागलें संचीता : षेपा षुंटलीया : ॥ छ ॥ येरी आंसुडी पद्रा : धरी आपण दुसरा : येकी झोंबतील करा : क काये वेडा होसी : ॥ आलों बहुवेळा : नेणो गोरा कीं सावळा : सर परता गोवळा : काये [व.पृ.८२] बोलोतोसी :।२॥ जडला जीव्हारीं : फांकों नेदी तया नारी : जेथे वरम तें धरी जांउं पाहे तीचे : आम्हीं येथे अधीकारी : मागें केली तुम्हीं चोरी : आतां सांपडल्यावरी : मागें कळे त्याचें : ॥ ३ ॥ बोलील्या हांसोनी : आम्हीं सासुरवासिनी : कांरे झोंबसी दुरुणी : करीं मात कांहीं : वांयां परनारी : कैसा धरीसील करी : तयां कळलीयां उरी : तुम्हां तुम्हां नाहीं : ॥ ४ ॥ तया हातां सांपडल्या : हाट पाट चुकवील्या कुस्ण मीळणी मीळाल्या : त्या ही न फीरती : ॥ **तुका** म्हणे चीतीं : काही न धरावी षंती : होतें तुमचा संचीती : वोडवलें आजी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ ६ ॥

## ११२८ गौळणी

पडीली मुळी धांवे ते सईराट : छंद गोवींदाचा चोजवीत वाट : ॥ मागें सांडुनीयां सकळ बोभाट : वंदी पदांबुजें ठेउनी लल्हाट : ॥ १ ॥ धृ॥ कोण्ही सांगा वो या गोवींदाची सुधी : होतें वाईलें लपाला आता खांदी : ॥ कोठें आड अली हे देहभुधी : धांवं आळवीं करुणां कृपानीधी : ॥ छ ॥ मागें बहुतांचा अंतरल संग : मुळें जयाचीया त्याणें केला त्याग : पहिलें पाहातां

हें हारपलें आंग । खुंटली वाट नाहींसें जालें जग : ॥ २ ॥ शोकें योग घडला सकळांचा : गेल्या शरण हा अन्याये आमुचा :॥ केला उचार घढल्यां दोशांचा : जाला प्रकट स्वामी तुकयाचा :॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११२९ गौळणी

मीळोनी गौळणी : देती यशोदे गाऱ्हाणी दहीं दुध तुप लोणी : सीकां नुरे काही: मेळउनी पोरें : जेथे रीघे येकसरें : वेगी आणुणी सामोरें : अवघें ची खाये :१॥धृ॥ हरी सोंकला तो वारी: तुज लाज नाहीं तऱ्ही : आम्हां सांपडतां उरी : तुज [व.पृ.८३] मज नाहीं: ॥ छ॥ तुज वाटतसे कोढ : तया लागलेंसें गोढ : ॥ काय हासतेसी वेड तुज लागलें गे : ॥ आम्हीं जावों तुजवरी पोरें चाळवील्या पोरी : काये सांगो भांडखोरी : लाज वाटे: आम्हां : ॥ २ ॥ मुख मलीन वदनें : उभा हढती येध्योने : तवं दसवंती म्हणे: आणा सीक ळाउं:॥ थोर आणीला कांटाळा : घरीदारीं लोकपाळा: डेरां रीधौनी घुसळा: तेथ लोणी खावें : ॥ ३ ॥ यैस्या मिळौनी सकळा दांवे लाउं त्याच्या गळा ॥ कैस्या बांधती उखळा : येथ राहे रे उगा : ॥ बरा सांपडला हरी : आतां करीसील चोरी : डोळे घालुनीयां येरी येरीं : सवें हासत्याती :॥४॥ तवं फांसल्या सकळा उपढूनीयां उखळा: मोडी वृक्ष मावी मळा: अर्जुन दोन्ही : गजरु दसवंती नव्हे धीरु : ॥ धांवे तुकयादातारु आगील्या वेगी : ॥ ५ ॥

११३०

[व.पृ.८४] भाव हा शरीरी : दुस्टी न फीरे माघारी: तया देषतां हे : ॥ ४॥ वैरभाव नाहीं : आपपर कोण्हां काही : सोक मोहो दुष ठांई : तेथ नीरसली : ॥ तुका म्हणे सुषी : केली आपल्या सारीषी : स्वामी माझा कवतुकीं : बाळवेशें षेळे : ॥ ५॥ छ ॥ छ ॥

( ही अर्धी च ओळ त्या च शाईनें व त्या च लेखणीनें अक्षरास ओळ निराळी काढून अशीच बाजूस लिहिली आहे. )

कळों नेदि माव त्यासि त्याचे ठाउके

११३१ गौळणी

ये रे कृस्णा षुणावीती : षेळों भातुके : माळीनेयां बाळा येके ठाई कवतुके : ॥ षेळोळोतोसे दावी लझलसापें मुकें : ॥ १ ॥ धृ ॥ अषंडीत चटे त्याणी चटवीला कऱ्हां : ॥ आवडे तें त्यासी वाहाती संकल्प मना : ॥

काया वाच मनें रुपीं गुतल्या वासना : येकांताचें सुष जाती घेउनींयां राना : ॥ छ ॥ अवघीयांचा जाणे जाला मेळासा हरी : मीळोनीयां देती तेथे तयां जाये भीतरी : ॥ कळो नेदी घरीच्यां करी गोउनींयां चोरी : हातोहातीं नेती परेपरता दुरी : ॥ २ ॥ आंनदें नीर्भर आपणासी अपण : कींडतील बाळा तजीलें पारीषें जन : ॥ येकायेकीं तेथे नाहीं वीशम भीन : तुका म्हणे येका नारायेणावांचुन : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०३२ गौळणी

धृ ॥ या वो या चला जांउ सकळा : पाहों हा सोहोळा : आजी वृंदावनींचा : ॥ छ वाईला गोपाळें वेणुनाद पडे कानी : धीर नव्हे मनी : चीत जालें चंचळ : ॥ १ ॥ उरलें तें सांडा काम नका करुं गोवी हे ची वेळ ठा मज कृस्णभेटींची : ॥ २ ॥ नीवतील डोळे याचें श्रीमुष पाहातां : बोलत तीं आतां घरीची सोसुं वाईट : ॥३ ॥ कृस्णभेटी आड कांहीं नावडे आणीक : लाज तरी लोक मने जाली उदास : ॥ ४ ॥ यकायेकी सा [व. पृ. ८५] दावीत चालीयेला सवें : ॥ तुका म्हणे देवें रुंपी केल्या तन्मये : ॥ ५ ॥

१०३३ गवळनी

धृ ॥ देंषीला डोळा बैसला मनी : तो वदनी उचारी : ॥ छ ॥ कोण्ही येकी भुलळि नारी : ॥ वीकतां गोरस म्हणे घ्या हरी : ॥ १ ॥ आपलीयाचा वीसरभोळा : ॥ गोवींद कळा : कवतुकें : ॥ २ ॥ तुका म्हणे हांसे जन : ॥ नाहीं कान ते ठाई : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

**१०३४**

आत हरी बाहेर हरी : ॥ हरीनें घरी कोंडीयेलें : ॥ छ ॥ हरीनें कामा घातला चीरा : ॥ वीतावरा मुकवीलें : ॥ १ ॥ हरीनें जीवें केली सांटीं : ॥ पाडीली तुटी सकळासी : ॥ २ ॥ तुका म्हणे वेगळा नव्हे : ॥ हरी भोवें भवंताला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१०३५

हरीनें माझें हरीलें चीत : ॥ भार वीत वीसरलें : ॥ १ ॥ धृ ॥ आतां कैसें जावें घुरा नव्हे बरा : लोकीक : ॥ छ ॥ पारषींयांसी सांगतां गोठी : ॥ घरींचीं कुटी षातील : ॥ २ ॥ तुका म्हणे नींवांत राही : ॥ पाहीलें पांही धनीवरी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ ह्या अभंग मागें ११२१ वा आला आहे.

११३६ गवळनी

होतें दीवस हें बहुत मानसी : आजी नवस ते पुरले नवसी : ॥ भेटी होवी ते जाली गोवींदासी : आंता सेवा करीन नीस्चयेंसी गे : ॥ १ ॥ धृ ॥ स्थीर स्थीर मज ची साहे करा बहुत कस्ट सोसील्या येरझारा : येथें आड मज न साहावे वारा : देउनी कपाट आलें तें दुसरें वारा ॥ छ ॥ मुळ साता हे सायासांची जोडी नेदीं होउं वेगळें येकी घडी : ॥ नाही लोकीक हा स्मरला आवडी : आतां येणे काळें या लोभें वेडी : ॥ २ ॥ उदये उदई धरीला अवकाश : नीस्थीतीनें नीस्चीती सावकास : ॥ धींयें गोडी बहुत आला रस [व. पृ. ८६] तुका म्हणे हा मागुता न ये दीस : ॥ ३ ॥

११३७ गौळणी

स्वयें सुषाचें गे जाले अनुभव : येकीपासी येकी सांगतील भाव : ॥ अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव : ॥ सर्वसाक्षी तेथे ची त्यांचा जीव : ॥ १ ॥ धृ ॥ आपा आपणासी करीती नवल : परी वादावाद न षंडीती बोल : ॥ येका मेघस्यामें जळधरें वोल : रसी उतावळि हृदये सषोल गे : ॥ छ ॥ श्रुती परावीया मुषें रुचीकर : प्रीतीपात्राचा गौरवीं आदर : परस्परें ही सादरें सादर : योगें सजनाच्या सुषा नाहीं पार : ॥ २ ॥ येक वीशयें तो सकळांचा हरि : त्याचे आवडीने आवडी ईतरी : अंध बहीर त्या परतें जनाचारी : ॥ त्याची कीर्ती गाईली पुराणातरी : ॥ २ ॥ भक्ती वालभ न तुटे चराचरीं : अप्त अनाप्त यैसी ठेवी उरी : ॥ दुरी जवळी सचीता यैसी धरी रंगारंगा यैसें होणें लागे हरी : ॥ ४ ॥ तुका लाधला हें उचीस्ट भोजन : आला बाहेरी परीमळें वोसंडोन : पडीलें कानी त्या जीवाची जतन : धरीले येका चीतें सेवंटीं चरण : गे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

११३८

( पुढें अर्धेअधीक पान कोरें आहे. )

[व. पृ. ८७] बैसउनी फेरीं : गडी मध्ये भागी हारी : अवघीयांचें करी : समाधान सारीषें : ॥ १ ॥ धृ ॥ पाहे तो देषे समोर : भोगी अवघे प्रकार : हरुशें झेली कर : कवळ देती मुषी ते :॥ छ ॥ बोले बोलती यासर्वे : देतील तें त्यांचें घ्यावें : ॥ येक येकां ठावें : येरयेरां अदृशे : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : बहु आवडीच्या हेवा : कोण्हांचीया जीवा : ॥ वाटों नेदी विश्रम : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १ ॥

११३९

आम्हां नीकटवासें : कळों आलें जैसें तेसें : नाहीं अनारीसें : कान्होबा अंतरी : ॥ १ ॥ धृ ॥ पीडती आपलाल्या भावना : जैसी जयाची वासना : कर्मीचा देषणा : पाहे लीळा कोतुकें : ॥ छ ॥ षेळु षेळे न पडे डाई :॥ ज्याचा भाव त्याचा ठांई : पडतील डांई : कोण्ही कोडी उगवीती :॥ २ ॥ तुका म्हणे कवळ : हातीं घेउनी गोपाळ : ॥ देतो ज्याचें जैसें बळ : त्यासी तैसा वीभाग : ॥ ३ ॥

११४० काला

काम सारुनी सकळ : आले अवघे गोपाळ : जाली आंतां वेळ : म्हणती आणा सीदोऱ्या : ॥१॥ धृ ॥ देती आपलाला झाडा : गाई बैसवील्या वांडा : दोंदील बोबडा : वांकड्यांचा हरी मेली : ॥ छ ॥ आपलालीये आवडी : मुदा बांधल्य परवडी : नीवडुनी गोडी : हरी मेळवी त्यांत तें : ॥ २ ॥ भार वागवीला षांदी : नव्हती मीळाली तों मादी : सकळांचे संधी : वोझीं अवघीं उतरली : ॥ ३ ॥ मागें करुनी तांतडी ॥ त्यासी रागा येती गडी : येथे काये कुडी : तुझी मीथ्या भावना : ॥ ४ ॥ येक येकाच्या सवादें : कैसैं धाले ब्रम्हांनंदें : ॥ तुका म्हणे पदें : या रे वंदु हरीची : ॥ ५ ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ :

११४१ काला

याल तरी या रे लागें : अवघे माझ्या [ व. पृ. ८८ ] समागमें : ॥ १ ॥ धृ ॥ आजी देतों पोट भरी : पुरे म्हणाल तोवरी : ॥ छ ॥ हळु हळु चाला : कोण्ही कोन्हासी न बोला : ॥ २ ॥ छ ॥ ४ ॥ तुका म्हणे सांडा षोटें : तेणें नका भरुं पोटें : ॥ ३ ॥ ४ ॥

११४२ काला

सीकें लींबयिलें दुरी : होतों तीघांचीये वरी : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्हीं हो : दोहींकडे : मुष पसरुनी गडे : ॥ छ॥ वाहाती ज्या धारा : घ्या रे दोहीं ज्या कोंपरा : ॥ २ ॥ तुका म्हणे हातीं टोका : आधीक उनें नेंदी येका : ॥ ५ ॥

११४३ काला

लपाले ते मेड : त्यांस येथे जाला नाड : ॥ १ ॥ धृ ॥ धीट घेती धनीवरी : सींकी उतरीतो हरी : ॥ छ ॥ आपलीया मती : पडींली वीचारीं चरीती : ॥ २ ॥ तुका लागे पांयां : कई पावाल या ठाया : ॥ ३ ॥ ६ ॥

११४४ काला

धालें मग पोट : केला गड्यानी बोभाट : ॥ १ ॥ धृ ॥ ये रे ये रे नारायेणा : बोल आबोलण्यां धुना : ॥ छ ॥ षांद्यावरी भार : ॥ ते सीणती बहु फार : ॥ २ ॥ **तुकयाच्या** दातारें : ॥ नेलीं सुषी केली पोरें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११४५ काला

पाहाती गौळणी : तवं पालथीं दुधानी : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणती नंदाचीया पोरें : ॥ आजी चोरी केली षरें : ॥ छ ॥ त्यावीण हे नासी : नव्हे दुसरीया यैसी : ॥ २ ॥ सवें **तुका** मेला : त्याणें या गुणा आणीला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

११४६ काला

आतां यैसें करुं : दोघां धरुनीयां मारुं : ॥ १ ॥ धृ ॥ मग टाकी हे षोडी : तोंडी लागली ते गोडी : ॥ छ ॥ कोंडू घरांमधी न बोलोंन जागों बुधी : ॥ २ ॥ बोलावीतो देवा : **तुका** गड्यांचा मेळावा : ॥ ३ ॥ ९ ॥

११४७ ळळीत

पैईल पैईल आले हरी : संष चक्र शोभे करी : ॥१॥धृ॥ गरुड येतो फडत्कारें : [व.पृ.८९]ना भी ना भी म्हणे त्वरें : ॥ छ ॥ मुगुट कुंडळांचे दीप्ती : ॥ तेजें लोपलें गभस्ती : ॥ २ ॥ पीतांबरु झळके कैसा : ॥ उजळीती दाही दीसा : ॥३॥ मेघस्याम वर्णु हरी : ॥ डोळस मुर्ती हे सारी : ॥ ४ ॥ चतुर्भुज वैजयेंती : ॥ गळां माळ असे रुळती : ॥ ५ ॥ **तुका** जा पैं संतुस्ट : ॥ घरा आलें वैकुंठपीठ : ॥ ६ ॥ छ ॥ छ ॥

११४८ ळळीत

वीठल कीर्तनाचे अंती : जये जये हरी जे म्हणती : ॥ १ ॥ धृ ॥ तेंच सुकृताचें फळ : वाचा रामनामें नीषळ : ॥ छ ॥ बैसोनी हरीकथेसी : ॥ होय सावध चीतासी : ॥ २ ॥ **तुका** म्हणे त्याचें जन्म : सुफल जालें भवकर्म : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११४९ ळळीत

न चलवे पंथ : वेच नसतां पालवी : ॥ शरीर वीटंबीलें : वाटे भीक मागवी : ॥ १ ॥ धृ ॥ न करी रे तैसें आप आपणा नीत राम राम तुम्ही सकळ म्हणा : ॥ छ ॥ राम म्हणवीता रांडा पोरें, नीरवीसी : ॥ पडसी येमांहाती रे जाचीती चौऱ्यासी ॥ २ मुषी नाही राम तो अत्महत्यारा : **तुका** म्हणे लाज नाहीं तया गंव्हारा : ॥ ३ ॥

११५० ळळीत

थडीयेसी असतां : पाशाणाच्या सांगडी : ॥ बुडतां मध्ये भागी : तेथे कोण घाली उडी : १ ॥ धृ ॥ न करीं रे तैसें आपआपणीयां : ॥ छ ॥ सावधपणें सोमोळ वाटी भरुनीयां प्याला : मरणा अंती वैद आणवीतो गहीळा : २ ॥ तुका म्हणे ठांई याच करीं हा वीचारुं : ॥ जवं नाहीं पाताळा : हा येमाचा कीकरुं : ॥ ३ ॥ छ

( पुढें वहीचें पान तिसरा हिस्सा कोरें आहे. )

श्रीगणेशाये नमा : ॥ ११५१ अंधळा

[ व. पृ ९० ] देषत होतों आधीं : मागें पुढें सकल : ॥ मग हे द्रुस्टी गेली : वरी आलें पडळ : त्रीमीर कोंदलेसे : वाढे वाढत प्रबळ भींत मीं जालों देवा : काये ज्याल्याचें फळ : ॥ १ ॥ धृ ॥ आतां मज द्रुस्टी देईं : ॥ पांडूरंगा मायेबापा : ॥ शरण आलों आलों आंता : नीवारुनीयां पापा : अंजन लेवउनीं : करीं मारग सोपा : ॥ जाईन सीधपंथें : अवघ्या चूकती षेपा : ॥ छ ॥ होतसे षेद चीता : कांहीं नाठवे वीचार ॥ : जात होतों जना मागें : तो ही सांडीला आ-धार : ॥ हा ना तोसा ठाव जाला : अवघा पडीला आधार : ॥ फीरली माझीं मज : कोन्हीं नेदीती आधार : ॥२॥ जोंवरी चळन गा : तवं म्हणती माझा : मानीती लाहान थोरें : देहे सुखाच्या काजा : ॥ ईंद्रीयें माळवली आला बागुल आजा : ॥ कैसा वीपरीत जाला तो च देह नव्हे दुजा :॥ ३ ॥ गुंतलों या सवंसारें : कैसा जालोंसें अंध : मीं माझें वाढउनी : माया त्रुस्णेचा बध : ॥ स्वहीत न दीसे ची : केला आपला वध : ॥ लागलें काळ पाठीं : सवें कामं क्रोध : ॥ ४ ॥ लागती चालतां गां : गुण दोशांच्या ठेंसा : सांडीली वाट मग : जालों नीराळा कैसा : पाहातों वाट तुझी : थोरी करुनी आशा : ॥ तुका म्हणे वैद राजा : पंढरीच्या नीवासा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

११५२

भगवंतां तुज कारणें गा : मेलों जीत ची कैसी : नीहूकामबुधी ठेलों : ॥ चळन नाहीं तयासी : ॥ न चलती हात पाये : द्रुस्टी फीरली कैसी : जाणतां नेदखों गा : क्षर आणी अक्षेरासी : ॥ धृ ॥ वीठोबा दान दें गा : तुझ्या सारीखें नाम : कीर्त हे वाखानली थोरी वाढली सीमा : ॥ छ ॥ भुग्ती मुग्ती तुं ची येक : होसी सीधीचा दाता : म्हणउनी सांडवली : शोख भयें लज्या चींता : सर्वस्वें त्याग केला : धांवं घातली आतां : [ व. पृ. ९१ ] कृपादान देईं देवा : येउनी

सामोरा आतां : ॥ २ ॥ सर्वसारसागरु गा : भवदुखाचें मुळ : जनवाद आथरुन : माजी केले वींगळ : ॥ ईद्रीयें वज्रघातें : तपे उश्ण व जाळ : ॥सोसीले काये करुं : दुर्भर हे चांडाळ : ॥ ३ ॥ ती हीं लोकी तुझें नाम : वृक्ष पलव शाखा : वेधलों धरी खोडा : भाव घेउनीं टेंका :॥ जानवीं (?) नरनारी : जागो धरम लोकां :॥ पावती पुण्येंवंत : । सोये आमंची येका : ॥ ४ ॥ नाठवे आपपर : आतां काये बा करुं : सारीखा दोहीं सवा : हारपला वीचार :॥ घातला यौगक्षेम : तुज आपला भारु : ॥ **तुकया** शरणागता : देईं अभयें करु : ॥ ५॥ छ ॥ छ ॥ छ ॥

## ११५३ पांगुळ

पांगुळ जालों देवा : ॥ नाही हात ना पाये : बैसलों जयावंरी : ॥ सईराट तें जाये : ॥ खेटीतां कुंपकांटी : खुंट द्रडी न पाहे : ॥ आधार नाहीं मज : कोन्ही बाप ना माये : ॥ १ ॥ धृ ॥ दाते हो दान करा : जाते पंढर-पुरा : न्या मज तेथवरी : ॥ अखंमा तो सोईरा ॥ छ ॥ हींडतां गव्हाने गा : सीणंलों दारोदारीं : ॥ न मीळे ची दाता कोन्हीं : जन्मदुखातें वारी : कीर्त हे संतामुखी : तो ची दाखवा हरी : ॥ पांगळां पाये देतो : नांदे पंढरपुरीं ॥ २ ॥ या पोटाकारणें गा : जालो पांगीला जना : न सरती बाप माये : नाहीं भींके खंडना : ॥ पुऱ्हाडा म्हणती येकें : ॥ तया नाहीं कारुणा : ॥ स्वान हें लागे पाठीं : आशा बहु दारुणां : ॥ ३ ॥ काये मीं चुकलों गा : मागें नेणवे कांहीं : ॥ न कळे ची पापपुन्य : तेथे आठव नाहीं : ॥ मीं माजी भुललों गा : दीपपतंग सोई : ॥ दया मज जीवदान : संत मानभाव काहीं : ॥ ४ ॥ दुरुणीं आलों मीं गा : दुख जालें दारुणं : यावया येथवरी : हें ची होतें कारण : ॥ दुर्लभ भेटी तुम्हां : जालें पाईं दरुसेण : वीनवींतो **तुका** संता : दोन्हीं कर जोडून : ५ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

## ११५४ पांगुळ

देश वेश नव्हे माझा : सहज फीरत आलों : [व. पृ. ९२] करु सता कवणावरी : कोठे स्थीर राहीलों : पाये डोळे म्हणंतां माझें : तीहीं कैसा मोकलीलों : ॥ परदेसी नाहीं कोन्ही : ॥ अंध पांगुळ जालों : ॥ १ ॥ धृ ॥ आतां माझी करीं चींता : दान दे गा भगवंता : ॥ पाठीं पोटीं नाहीं कोण्ही : नीरवीं सजन संता : ॥ छ ॥ चालतां वाट पुढें : भये वाटातें चीती : बहुतें जनें गेलीं : ॥ नाहीं आलीं मागुतीं : ॥ नेदखे काये जालें :

कान तरी आईकती : ॥ बैसलों संदे भागी : तुज धरुनी चीतीं : ॥ २ ॥ भाकीतों करुणां गा : जैसा साडीला ठाव : ॥ न भरे ची पोट कधी : नाहीं नीस्चल पाव : हींडतां भागलों गा : लक्ष चौऱ्यासी गावं : धरुनी राहीलों गा : हा ची वसता ठाव : ॥ ३ ॥ भरवसा काये आतां : कोण आणी अवचीता : ॥ तैसी च जाली कीर्ती : ॥ तयां मज बहुतां : ॥ म्हणउनी मारीं हाका : सोय पावें पुन्यवंता : ॥ लागली भुक थोरी : तु च कृपाळु दाता : ॥ ४ ॥ संचीत सांडवलें : कांहीं होतें जवळी : ॥ वीत गोत पुत माया : तुटली हे लागावळी : नीक्हामं जालों देवा : होतें माझे कपाळी : ॥ तुका म्हणे तुं ची आतां : ॥ माझा सर्वस्वं बळी : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

११५५ अधळा

सहज मीं आंधळा गा : नीजनीराकार पथें : वृती हे नीउर्ती जाली : जन न दीसे तेथे : मीं माजी हारपलों : ॥ ठांई जेथीचा तेथे : ॥ अद्दशे तें ची जालें : कांहीं द्रुशे चें होतें : ॥ १ ॥ धृ ॥ सुखें मी नीजेलों गा : सुन्य सारुनी तेथे : ॥ त्रीकुट सीखरीं गा : ॥ दान मीळे आईतें : ॥ छ ॥ टाकीली पात्र झोळी : धर्म अधर्म आशा : कोल्हाळ चुकवीला : ॥ त्रीगुणाचा वळसा : ॥ न मंगें भीक आतां : ॥ : यैसा जाला भरवसा : पावली सत्रांवीं गा : तीणें पुरली ईछा : ॥ २ ॥ उर्ध मुखें आळवीला : सोहुं शब्दाचा नाद : ॥ अरुप जागवीला : दाता देउनी छंद : ॥ घेउनी आला दान : ॥ नीज तत्व नीज बोध : ॥ स्वरुपीं मेळवीला : नाम ठेवीले भेद : ॥ ३ ॥ शब्द हा बहुसार : उपकारांची रासी : ॥ म्हणउनीया [व.पृ.९३] लवीला : मागें येतील त्यांसी : ॥ मागुनी आली वाट : सीध वोळीची तैसी : ॥ तरले तरले तरती गा : आणीक ही वीस्वासी : ॥ ४ ॥ वर्म तें येक सार : द्रुढ धरावा भाव : जाणीव नागवण : नेदी लागों हा ठाव : ॥ म्हणउनी संग टाकीं : सेवीं अद्वैत भाव : ॥ तुका म्हणें हा ची संती : मागें केला उपाव : ॥ ५ ॥ छ ॥

११५६

उंसिर कां केला कृपाळु बा गा विठ्ठला ॥ १ ॥ मज दिल्हें कोण्हा हाति : छ ॥ कोठवरी धीर धरुं मन करु स्थिर ॥ २ ॥ तुका म्हणे जीव अैसी भाकितसे किव ॥ ३ ॥

---

१ हा अभंग मागें ४६३ वा आला आहे.

११५७

[ व. पृ. ९६ ] ॥ धृ ॥ कोडें रे कोडें : आईका हें कोडें : उग उग्नी फार राहे गुंतोनीयां थोडें : छ ॥ पुसतसें सांगा मीं हें : मीं हें माझें यैसें काई : रुसों नका नुगवे तो झवें आपली आई : ॥ १ ॥ सांगोतो हें मुळ कांहीं न धरावी षंती : ॥ ज्यालें ज्यवो मेलें मरो : ॥ परारब्धा हतीं : ॥ २ ॥ तुका म्हणे अभीमान सांडावा सकळी : न ये आंगावरी : वांयां येउं देउं कळी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

११५८

नुगवे तें उगउन सांगीतलें : भाई : ॥ घालुनीयां ताळा : आतां सुधं राषा घाई : ॥ १ ॥ धृ ॥ आंतां नाहीं काहीं : ॥ राहीलें : ॥ म्यां आपण्या आपण पाही : ॥छ॥ कमाईस मोल येथे नका रीस मानु : ॥ नीवडूनी. नये नीडुं मज कोण्हां वाणुं : ॥ २ ॥ तुका म्हणे पदोपदी कान्हो वणमाळी : जयेजत मग सेवटीले येका वेळीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

११५९

बोलोंनीयां दाउं तुम्ही कां नेणा जी देवा : ॥ ठेवाल ते ठेवा : ठांई तैसा राहेन : ॥ १ ॥ धृ ॥ पांगुळलें मन : कांहीं नाठवे उपाये : म्हणउनी पाये जीवीं धरुनी राहीलों : ॥ छ ॥ त्यागें भोगें दुष काये सांडावें मांडावें : ॥ यैसी धरीयेली जीवें : माझ्या थोरी असंका : ॥ २ ॥ तुका म्हणे माते बाळ चुकलीयां वनी : ॥ न पवतां जननी : मरण पावे वीठले : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११६० भुपाळी

असो वाट पाहें कांहीं नीरोप कां मुळ : ॥ कां हें कळवळ :तुज उमटे च ना : ॥ १॥ धृ॥ अवो पांडुरंगे पंढरीचे नीवासे : लाउनीयां आसे : चाळउनी ठेवीलें : ॥ छ ॥ काये जन्मा येउनीयां केली म्यां जोडी : ॥ यैसें घडीघडी : जीवा येतें आठउ : ॥ २ ॥ तुका म्हणे षरा पावें ची ना वीभाग : ॥ धीकारीते जग : हे ची लाहें हीसोबें : ॥ ३ ॥ छ ॥

११६१

कां गा कींवीलवाणां केलों दीनाचा दीनाचा दीन : काये तुझी हीण : शक्ती जालीसी दीसे : ॥ १ ॥ धृ ॥ लाज येते मना [ व. पृ. ९७ ] तुझा म्हणवीतां दास : गोडी नाहीं रस बोलीलीया सारीषी : ॥ छ ॥ लाजवीली

मागें संताची उतरें : कळों येतें षरें : दुजें येकावरुनी : ॥ २ ॥ तुका म्हणे माझी कोणें वदवीली वाणी : ॥ प्रसादावाचुनी : तुमंचीया वीठला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११६२ भुपाळी

जळो माझें कर्म वांयां केली कटकट : ॥ जालें तैसें तंट : नाही आलें अनुभवा : ॥ १ ॥ धृ ॥ पुढें आंता धीर काये देउं या मना : यैसें नारायणा : प्रेरीलें तें पाहीजे : ॥ छ ॥ गुणवंत केलों दोश जाणा साटी : ॥ माझें माझें पोटी : ॥ बळकट दुशण : ॥ २ ॥ तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा : ॥ बरवा हा ळळा : पाळीयेला सेवटीं : ॥ ३ ॥

११६३

येई गा वीठला येई गा वीठला : ॥ प्राण हा फुटला : आळवीतां : ॥ १ ॥ धृ ॥ पडीयेलों वनी थोर चींत वनी : ॥ उसीर आझुनी : लावीला कां : ॥ छ ॥ काये तुज नाहीं लोकीकाची संका : ॥ आपल्या बालका : मोकलीतां : ॥ २ ॥ तुका म्हणे बहु षंती वाटे जीवा : ॥ धरीयेलें देवा दुरी दीसे : ॥ ३ ॥ छ ॥ छ

११६४

आपल्ये गांवींचें नेदषेंसें जालें: वीदेसीं येकलें : कीती कंठूं : ॥ १ धृ ॥ म्हणउनी पाहें मुळ येतां वाटे : ॥ जीवलग भेटे : कोण्हीं तऱ्हीं : ॥ छ ॥ पाहातां अवघ्या दीसतील दीसा : सकळ ही वोसा : द्रुस्टीपुढें : ॥ २ ॥ तुका म्हणे कोण्हीं नं संगे वारता : ॥ तुझी वाटे चींता पांडूरंगा ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११६५

जन तरी देषें गुंतलें प्रपंचें : ॥ स्मरण हें सांचें त्यांसी नाहीं : ॥ १ ॥ धृ ॥ म्हंणउनी मागें परतलें मन : घालणीचें वन : देषोनीयां ॥ छ ॥ ईंद्रीयांचा गाजे गोंधळ ये ठांई : ॥ फोडीतसे डोई : अहंकार : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा वासन्येच्या आटें : ॥ केली तळपटें बहुतांची : ॥ ३ ॥ छ ॥

११६६

पापपुनें सुषदुषाची मंडळें : येका येक बळें : डाव घेती : ॥ १ ॥ धृ ॥ कवतुक डोळा : [ व. पृ. ९८ ] पाहीलें सकळ : नाचवीतों काळ : जीवांसी

तें : ॥ सर्गांचीया भोगें सरता नरका : मागां पुढा येका येक दोन्हीं : ॥ २ ॥ तुका म्हणे भये उपजलें मना : ॥ वेई नारायेणा : कंडीये मज : ॥ ३ ॥ छ ॥ छ॥

११६७

वींठल हा चीतीं गोड लागे गातां गीती ॥ १ ॥ धृ ॥ आम्हां वीठल जीवन : टाळ चीपळीया धन : ॥ छ ॥ वीठल वीट वाणी : अमृत हे संजीवनी : ॥ २ ॥ रंगला या रंगें तुका वीठल सर्वांगें : ॥ ३ ॥ छ ॥ छ॥ छ ॥

११६८

लुटा संत जन : ॥ अमुप हें रासी धन : ॥ १ ॥ धृ ॥ तारुं लागलें बंदरीं : ॥ चंद्रभागेचीये तीरी : ॥ छ ॥ न लगे कांहीं बळ : ॥ धांवं घाला रे सकळ : ॥ २ ॥ तुका जवळी हमाल : ॥ भार चालवी वीठल : ॥ ३ ॥

११६९

धांवे तास फावे : डुजे उगउनी गोवें : ॥ १ ॥ धृ ॥ घ्यावें भरुनीयां घर : मग नाहीं येरझार : ॥ छ ॥ धनी उभें केलें : पुडलीकें या उगलें : ॥ २ ॥ तुका म्हणे ठसा : ॥ गेला पडोनीयां यैसा : ॥ ३ ॥

११७०

नव्हे मतोळयाचा वाण : ॥ नीत नवा नारायण : ॥ १ ॥ धृ ॥ सुष उपजे सेवने : षरें टांकसाळी नाणें : ॥ छ ॥ लाभ हातोहाती : ॥ आधीक पुडतो पुढती : ॥२॥ तुका म्हणे नेंणो कीती : ॥ पुरोनी उरलें पुढती : ॥ : ॥ ३ ॥छ।

११७१

घातले दुकान : देती आलीयासी दान ॥ १ ॥ धृ ॥ संत उदार उदार : ॥ भरलें अमुप भांडार : ॥ छ ॥ मागत्याची पुरे : धणी आणीकांसी उरे : ॥ २ ॥ तुका म्हणे पोते भरले देवें नव्हे रीतें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११७२

नर अस्तुती आणी कथ्येचा वीकरा : मज नको दातारा : ॥ घडों देउं : ॥ १ ॥ धृ ॥ यैसी ये कृपेची भाकीतों करुंणा : ॥ आहेसी तुं राणा : उदाराचा : ॥ छ ॥ भुतांचा मछर : आणी संतनींदां : ॥ मज नको गोवींदा घडों देउं : ॥ २ ॥ परावीया नारी आणी परधना : नको देउं मना : [व.प्र. ९९] वरी येउं : ॥ २ ॥ देहे अभीमान नको देउं सीरी : ॥ चढो कांहीं परी : येक देवा : ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझ्या पांयाचा वीसर : नको वारंवार : पडों देउं : ॥५॥

१ हा मागें ३३९ वा अभंग आला आहे.

११७३

लोकीका पुरती नव्हे माझी सेवा : ॥ अन्यन केशवा : दास तुझा : ॥१॥ ॥ धृ ॥ म्हंणउनी करी पांयांपासी आळी आणीक वेगळी नेणें परी : ॥ छ ॥ येकवीधें आम्हीं स्वामीसेवेसाटी : ॥ वरी तो ची पोटीं : येक भाव : ॥ २ ॥ **तुका** म्हणें करी सांगीतलें काम : ॥ तुम्हां धर्मांधर्म ठावे देवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११७४

जन्ममरणाची वीसरलों चींता : तुं माझा अनंता : मायेबाप : ॥ १ ॥ ॥ धृ ॥ होतील ते डोळां पाहेन प्रकार : ॥ भयों आणी भार : नीरसली : ॥ छ ॥ लीगाडाचें मुळ होती पंच भुतें : ॥ त्यांचे त्यापुरतें : वीभागलि : ॥ **तुका** म्हणें जाला प्रपंच पारीषा जीवासी तु सषा : पांडुरंग : ॥ ३ ॥ छ ॥

११७५

यांच्यां संगें होतों पडीलों भोवनी : ते केली धोवनी : झाडूनीया : ॥ १ ॥ धृ ॥ आंता येकायेकी मनासी वीचार : करुं नाही भार दुजीयाचा : ॥ छ ॥ प्रसादसेवनें आली उस्टाववळी : ॥ उचीत ते काळी : अवचीत : ॥ छ ॥ **तुका** म्हणे वर्म सांपडलें हातीं : ॥ सांडीयेली षंती : चींता देवा : ॥ ३ ॥ छ ॥

११७६

आवडी भोजन प्रकार परवडी : भीन भीन गोडी : येका रसा : ॥ १ ॥ धृ ॥ भोगीत्या पंगती : लाधलो प्रसाद : ॥ तींहीं नाहीं भेद : राषीयेला : ॥ छ ॥ पाकसीधी संतां हस्तकें वीनयोग आवडीचे भाग सीध केले : ॥ २ ॥ **तुका** म्हणे आला उचीस्ट प्रसाद : ॥ त्याणें हा आनंद : माझ्या जीवा : ॥ ३ ॥

११७७ वासुदेव

[ व. पृ. १०० ] रामनाम दोनी अक्षेरें : सुलभ आणी साचारें : जागा मागीलीया पाहारें : सेवटीचें गोड तें ची खरें : ॥ १ ॥ धृ ॥ राम कुस्ण वासुदेवा : जाणवी जनासी : वाजवी चीपळीया : टाळ घागरीया घोसीं : ॥ छ ॥ गाये वासुदेव वासुदेवा : भीन नाहीं आणीकां नावां : दान जानोनीयां करी यावा : नेठवी उरी कांहीं ठेवा रे : ॥ २ ॥ नीज घेउनी या फीरती : येक वेळ जाणवीती : धरुनी राहा चीती : नेघें भार साडीं काम हाती रे : ॥ ३ ॥ सुपात्रीं सर्व भाव : मी तीं सर्व वासुदेव : जाणती कृपाळुव : ज्यां भीन भेद नाहीं ठाव रे : ॥ ४ ॥ सुर दाने जीवें उदार : नाहीं वासदेवीं वीसर : वाढे कीर्त चराचर : **तुका** म्हणे तयां नमस्कार रे : ॥ ५॥ छ ॥ छ ॥

११७८

बोल बोले आबोलणें : आंत जागें बाहेर नेजेलें : आसे घरांत घरकुल केलें : नेणें अधा कीं उजेडलें गा ॥ १ ॥ धृ ॥ वासुदेव करीतों फीरा : वाडीयांत बाहेर दारा : कोण्हीं काहीं तऱ्हीं दान करा : जाब नेदा च होतों सामोरा गा : ॥ छ ॥ हातीं दीडी टाळ मुखीं गाणें : ॥ होतो गजोर बहु नेत्यानें : नाहीं नीवडीली थोर लाहानें : नका नीजों भीकेचीया भेणें गा : ॥ २ ॥ मीं वासुदेव तत्वता : कळों येईल वीचारीतां : ठावा आहें सभागीयां संता : ॥ २ नाहीं दुजा आणीक मागता गा : ॥ ३ ॥ कांये जागा च नेजेलासी : सुनी जागउनी दारापासी : तुझ्या हीतापाठिं करीतें व्यासी : भेटी नेघेस वासुदेवासी गा ॥ ४ ॥ यैसें जागवीलें अवघें जन : होंतें संचीत तीहीं केलें दान : तुका म्हणे दु(ब)ळीं कोन कोण : ॥ गेली वासुदेवा वीसरो न गा : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

कान्होबाचा ११७९ वासुदेव

( गातो वासुदेव मी आवीका : चीत ठेउनी ठावी भावें येका : डोळे झाकुनी राती करु नका : काळ करीत बैसला लेखा गा : ॥ १ ॥ धृ ॥ राम राम क्ष्मरा आधी : करा लाहो गाठी घाला मुळबंदी :) [व. पृ. १०१] सांडा वाउगीया उपाधी : लक्ष लाउनी राहा गोवीदी गा : ॥ छ ॥ क्षीनभगुर नाही भरवसा :

एवढें लिहून झाल्यावर पान कोरें.

११८०

[व.पृ.१०२] समर्थाचा ठाव संचलाची असे दुबळाचे आसे : पुढें करी : ॥ १ ॥ धृ ॥ पावलें घेईन पदरी हें दानं : येकांती भोजन : करुं जाउं : ॥ छ ॥ न लगे पाहावी उचीता वेळ : ॥ आयाचीत काळ : साधला तो : ॥ २ ॥ तुका म्हणे पोट धालीया उपरी : गोरवा उंतरीं पुजुं देवा : ॥ ३ ॥ छ ॥

११८१

उदार तुं हरी : यैसी कीर्त चराचरी : अनंत हे थोरी : गर्जतील पवाडे : ॥ १ ॥ धृ ॥ तुझ्य पांई माझा भाव : पुसीं जन्ममरणाचा ठाव : ॥ देवाचा तुं देव स्वामी सकळ ब्रंम्हांडा : ॥ छ ॥ मागणें तुज मागों : जीवभाव देवा सांगो : लागों तरी लागों : पांयां तुमच्या दातारा : ॥ २ ॥ दीसों

दसी कोढीसवाणें : तरी तुज ची हें उनें : ॥ तुका म्हणें जीणें : माझें तुज आध्यान : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११८२

पाहा कीती आले : शरण समान ची केले : नाहीं वीचारीले गुण दोश : कोण्हांचे : ॥ १ ॥ धृ ॥ मज सेवटींसा द्यावा : ठाव तयांची ये देवा : नाहीं करीत हेवा : कांहीं थोरपणाचा : ॥ छ ॥ नांही पाहीला आचार : कुळगोत्राचा वीचार : फेंडं आला भार : मग न म्हंणें दगड : ॥२ ॥ तुका म्हणे सर्व जाणा : तुझ्या आल्यावरी मना : ॥ केला तो उगाणां : घडल्या मांहा दोशांच्या : ॥ ३ ॥ छ ॥

११८३

तुझ्या रुपें माझी काया : भरों द्यावी पंढरीराया : दर्पणींची छ्याया : येका रुपे भीनत्व : ॥ १ ॥ सुष पडीलें साटवणें : सता वेच सनेंसने : ॥ अडचणीचे कोणें : च्यान्ही मागें उगवले : ॥ छ ॥ वसो डोळयांची बाहुली : ववळें भीन छ्या आली : कुस्ण अंजनें चाली : नव्हे प्रती माघारी : ॥ २ ॥ जीव ठसावला जीवें : मना आलें तेथे जावें : फांटा पडीला नावें : तुका म्हणे षडले : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११८४

[ व. पृ. १०३ ] आतां चुकलें बंधन : गेलें नीवारोनी दान : आपले ते वाण : सावकासें वीकावें : ॥ १ ॥ धृ ॥ लाभ भोडला अनंत : घरीं सांपडलें वीत : ॥ हातो हातीं थीत : उरों तळ नल्हाची : ॥ छ ॥ होतें गोवीलें वीसारें : माप जालें येकसरें : होतें होरें वारें : तों ची लाहो साधीला : ॥ २ ॥ कराया जतन : तुका म्हणे नीज धन : केला नारायेणं : साहे नेदी वीसंभो : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११८५

सोसों सोंसें मारुं हाका : होईल चुका म्हणउनी : ॥ १ ॥ धृ ॥ मागे पुढें क्षीणभरी : नव्हे दुरी अंतर : ॥ छ ॥ नाम मुषीं बैसला च्याळा : वेळो वेळां पडताळी : ॥२ ॥ तुका म्हणें सुषी केलें : ॥ या वीठलें बहुत : ॥ ३ ॥ ॥ छ ॥

११८६

बैसोनीयां षांउ जोडी : उर्ढा उर्ढी चुकउनी : ॥ १ ॥ धृ ॥ यैसें केलें नारायेणें : बरवें जीणें सुषाचें : ॥ छ ॥ घरीच्या घरीं भांडवल : ॥ न लगे बोल वेचावे : ॥ २ ॥ तुका म्हणे आटाआटी : चुकली दाटी । सकळ : ॥ ३ ॥

११८७

पांडूरंगे पांडूरंगे : माझे गंगे माउलीये : ॥ १ ॥ धृ ॥ पान्हां घाली प्रेमधारा : पुरक्षीरा लाटों दे : ॥ छ ॥ आंगें आंग मेळवणी : करी धणी फेडाया : ॥ २ ॥ तुका म्हणे घेईन उडचा : सांडीन कुडच्या : भावना : ॥ ३ ॥ छ ॥

११८८

धरुनीयां चाली हांवा : येईन गावां : धावंत : ॥ १ ॥ धृ ॥ पाठवीसी मुळ तरी लवकरी वीठले : ॥ छ ॥ नाचैन त्या प्रेमसुषें : कीर्त मुषें गाईन : ॥ २ ॥ तुका म्हणे संतमेळी : पाये धुळी वंदीन : ॥ ३ ॥ छ ॥

११८९

आपल्याचा करीन मोळा : माझ्या कुळाचाराचा : ॥ १ ॥ धृ ॥ अवघीयांचे वंदीन पाये : ॥ ठायाठाये नेदृषें : ॥ छ ॥ [ व. पृ. १०४ ] नेंदी तुटों समाधान : थांबु जन सकळ : ॥ २ ॥ तुका म्हणे झाडा होये : ॥ तों हे सोये न संडी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११९०

मायेबापाचीये[1] भेटी : अवघ्या तुटी : संकोचें : ॥ १ ॥ धृ ॥ भोगीलें तें आहे सुष : खातां मुष मोकळें : ॥ छ ॥ ॥छ॥ उतम तें बाळासाटी : लावी वोंटी : माउली : ॥ २ ॥ तुका म्हणे जाली धणी : अनंद मनी : न समाय : ॥ २ ॥छ॥

११९१

उदासीनाचा देहे रुप : ब्रम्हे रुप : नाहीं पुन्ये पाप लागत या : ॥ १ ॥ धृ ॥ अनुताप आंगी अग्नीचीया ज्वाळा : नाही मृगजळा वीझों येत : ॥ छ ॥ दोश यैस्या नावें : देहाचा आदर : वीटाळी अंतर = अहंभाव : ॥ २ ॥ तुका म्हणे जाये नासोनीयां पतीं : तव चीती : बधतात : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

११९२

बंधनाचा तोडूं फासा : देउं आसा टाकुनी : ॥ १ ॥ धृ ॥ नाही तें च घेतां सीरी : होईल दुरी नीज पंथ : ॥ छ ॥ ॥ नाथीलें ची माझें तुझें : कोण वोझें : वागवी : ॥ २ ॥ तुका म्हणे अंतराये : दवीं काये जीणें तें : ॥ ३ छ ॥ छ ॥

११९३

सकळ पुजा स्तुती : करावी तें व्हावें या रीती : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी वारा जन : संतपुजा नारायेण : ॥ छ ॥ सेजवावें तें वरी : दावी उमटूनी ढेंकरी : ॥२॥ तुका म्हणे सुरा : दुधा म्हणतां केवी बरा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हा अभंग मागें १८९ वा आला आहे.

## ११९४

अहो पंडीत जन तुंमचे वंदीतों चारण : ॥ १ धृ ॥ नका करुं नर अस्तुती : ॥ माझी परीसावी विनती : ॥ छ ॥ छ ॥ अनं अछ्यादन : ॥ परारब्धा हें अध्यान : ॥ २ ॥ तुका म्हणे वाणी सुषें वेचा नारायेणी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

## ११९५ टीपरी

[व.पृ.१०५] दोनी टीपरी येक चीनाद : सगुण निर्गुण नाहीं भेद :॥ कुसरी आंग मोडीतल परी : मेळवीती : येकची छंद : ॥१॥ धृ ॥ कांहीं च नव जाये वांयां रे खेळीया : येक बसवंत अवघीयां : शम वीशम तेथे होउं च नदी : जागवीउनें आगळीयां : ॥छ॥ संत मंत सीध खेळतील घाई :॥ तें ची सांभाळी माझा भाई रें : ॥ हात राखोन हाने टिपऱ्या टीपरें : मीळोंन जांई त्याचे सो + रे : ॥ २ ॥ वतिाळाचें अवघें ची जाईल वांयां : काये ते रमीं रमींघारुणी काया : नीवडूनी बाहेरी काढीती निराळा : नीमळे जो संतांचीया घा रे : ॥ ३ ॥ प्रकाराचें काज : नाहीं सांडीं लाज : नीसंक होउनीयां खेळ रे : नेणतीं नींच येक : पावलीं मान : वीठल नामाचीया बळें रे ॥ ४ ॥ रोमांच गुढीया हालवीती आंग : ॥ भावबळें खेळी येते चाग रे :॥ तुका म्हणे कंठ शद्गदीत : तयांस वीठोबाचा संग रे : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

## ११९६ टिपरी

या रे गडी नो धरुं घाई : जाणे तो ही नेंणता : नाम गावों : टाळी वाहों : आपलीया हीता : ॥ १ ॥ धृ ॥ फावलें तो घ्या रे आतां : प्रेमदाता पांडूरंग : आजी दीवस सोनीयांचा : वोडवला रंग : ॥ छ ॥ हींडती राणों-राण : भुजंगांत कांत्यांवन : सुख तयाहुन : आम्हां गातां नाचतां : ॥ २ ॥ म्हणे तुका ब्रह्मादिकां : सावळे सुखा दुलभ तें : आजी येथें आलें सुखें : नाम मुखें : कीर्तनीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

## ११९७ टिपरी

भीमातीरीं येक रचलें नगर : त्याचें नावं पंढरपुर रे : तेथील मोकासी : च्यारी हात त्यासी बाईला सोळा हजार रे : ॥ १ ॥ धृ ॥ नाचत जावं त्याच्या गांवां रे : खेळीया सुख देईल वीसावां रे : ॥ पुढें गेले ते नीधाई जालें : वानी-तील त्याची सीमा रे : ॥ छ ॥ बळीया आगळा : पाळी लोकपाळां : रीगु नाहीं

कळीकाळा रे : पुंडलीकु पाटील : केली कुळवाडी : तो जाला भवंदुखा वेगळा रे : ॥ २ ॥ संत सजन मांडीला दुकान : जया जें पाहीजे तें आहे रे : ॥ भुगती मुगती फुका च सार्टी : तयेसी कोण्ही न पा (हे) रे :॥३॥ दोनी च हाट भरीयेले दाट : आपार मीळाले वारकरी रे : ॥ न वजों म्हणती आम्हीं वैकुंठा : जीं [ व. पृ. १०६ ] हीं देखीली पंढरी रे : ॥ ४ ॥ बहुत दीवस मज होती आस : आजी घडलें सायासीं : तुका म्हणे होये तुमंचीया पुण्यें : भेटी तयाच्या पांयांसी : ॥ ५ ॥ छ ॥

## ११९८ टीपरी

षळु मांडीला वाळुवंटी घाई : नाचती वैस्णंव भाई रे : ॥ क्रोध अभीमान केला पाउटणी येकयेकां लागतील पाई रे : ॥१॥धृ॥ नाचती अनंद कळोळी रे : पवीत्र गाणें नामावोळी : कळीकाळावरी घातलीसे कास येकाहुनी येक बळी रे : ॥ छ ॥ गोपींचंदन उटी तुळसीच्या माळा : ॥ हार मीरवती गळां : टाळमृंदंग घाई पुस्पवरुशाव : अनुंउपम्यें सुख सोहोळा : ॥२॥ ल्बुद (लुब्द) ली नादीं लागली समाधी : ॥ मुढ जन नारी नर लोका: पंडीत ज्ञानी योगी मानभाव : येक ची सीध साधका : रे : ॥ ३ ॥ वर्ण अभीमान वीसरली याती :॥ येकयेकां लोटांगणी जाती : नीर्मळ चीतें जाली नवनीतें : : ॥ पाशाणा पाझर सुटती रे : ॥ ४ ॥ होतो जयेजयेकार गर्जे अंबर : ॥ मातले वैस्णंव वीर रे : तुका म्हणे सोपी केली पायेवाट : उतराया भवसागर : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ छे ॥

## ११९९ ळळीत

[ वै. पृ. १०९ ] संतगाती हरी कीर्तनी : त्यांचें घेईन पायेवणी : ॥ ॥ १ ॥ धृ ॥ हे ची तप तीर्थ माझें : आणीक नेणें काहीं दुजें ॥ छ ॥ काया कुरवंडी करीन : संत मंत वोवाळीन : ॥ २ ॥ तुका म्हणे नेणें काही : अवघें आले संतापाई : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

---

१ पुढें सर्व पान कोरें च सोडिलें आहे.

२ पृ. १०७ व १०८ वर पंढरीचा महीमा लिहिला आहे. तो सदासीवाचा आहे.

१२०० लळीत

कथेची सामग्री देहे अवसान वरी : ॥ १ ॥ धृ ॥ नको जाऊं देऊं भंगा : गात्रें माझी पांडुरंगा : ॥ छ ॥ आयुस्य करी उने : परि मज आवडी कीर्तन ॥ २ ॥ तुका म्हणे हाणी यावांचुन मना नानी : ॥ ३ ॥ छ ॥ छँ ।।

१२०१ लळीत

रत्नजडीत सीहासण : वरी बैसेले आपण : ॥ १ ॥ धृ ॥ कुंचे ढळेत दोहीं बाही : जवळी रषुमा राही : ॥ छ ॥ नाना उपचारी : ।। सीधी वोळगती कामारी : ॥ २ ॥ घेऊन पायेरषा : उभा बंदी : जन तुका : ॥ ३ ॥

१२०२ लळीत

हींरा शोभला कोंदनी : जडीत माणीकाचीं षाणी : ॥ १ ॥ धृ । कैसा दीसे नारायेण : सुष सुषाचें मंडण : ॥ छ ॥ कोटी कोटी कळा : ॥ पुर्णमेच्या पुर्ण कळा : ॥ २ ॥ तुका म्हणे द्रुस्टी धाये : ॥ ण हातांची मागें न ये : ॥ ३ ॥ छ ॥ ४ ॥ छ

१२०३ लळीत

गांव वानु तुज तुझा करूं अनुवादु : जीकडे देषों तीकडे : सर्वमये गोवींदु : ॥ १ ॥ धृ ॥ अनद रे वीठोबा जाला माझे मनी : ॥ देषीले लोचनी ईटेसहीत पाउले : ॥ छ ॥ न करीं कांहीं तप रे मुक्तीचे सायास : ॥ हा च जन्मो जन्मीं गोडभक्तीचा सौरस : ॥ २ ॥ तुका म्हणे प्रेमा आम्हां उनें तें काई : ॥ वैकुंठीचा राणां : सांटवीला : हृदई : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

:॥ फाक : ॥ १२०४

[ व पृ. ११०. ] संषे करीसी ज्याच्या नावें: त्याचें तुज नाहीं ठावे : ॥ आईक सागोतों येक्या भावें : ॥ सांपडे घरीं तें जीरउन खावें : रे वीठल : ॥ १ ॥ टीळे माळा करंडी सोंग : धरुनीयां चाळवीलें जग : ॥ पसरीं हात नाहीं त्याग दावी दगड आणी पुजी तें भग : वीठल ॥ २ ॥ राख लाउनी आंग मळी : वाहे ठोक मीं येक बळी : वासने हातीं बांधावी नळी तया योनी गीळी उगळी रे वीटल : ॥ ३ ॥ कोण ते राहाडीचें सुख : ॥ वरते पाये हडतें मुख : ॥ करवी पीडा भोगवी दुख : पडे नरकी : न पळे मुर्ख रे वीठछ : ॥ ४ ॥ सीकला फाका मारी हाका : रांडा पोरें मेळवी लोका : वीटंबी शरीर : मागे रुका : केलें ते गेलें अवघें च फुका : रे वीठल : ॥५॥ कळांवें जना मीं येक बळी : ॥ उभा राहे मांडूनीयां फळी : ॥ फोडूउनी गुढघे कोंपर चोळी .

---

१ हा अभंग मागें ९६७ वा आला आहे.

आपला घात करुनी : आपण ची तळमळी : रे वीठल ॥ ६ ॥ फुकट खेळें ठकलीं वायां : धरुनी सोंग बोडक्या डोया : सींवों नये ते अंतरी माया : संपादनी वीन : वीठंबीली काया : रे वीठल : ॥ ७ ॥ धुळी माती खेळों च नका : जवादी चंदन घ्यावा बुका : आपणा परीमळ : आणीका लोकां : मोलाची महींमा : फजीती फुका : रे वीठल : ॥ ८ ॥ बहुत दुखी जालीयां खेळें : आंगी बुधी नाहींत बळें : ॥ पाठीवरी तोबे तोंड काळें : रसना ईंद्रीयें उपस्थाच्या मुळें रे वीठल : ॥ ९ ॥ काये सांगोतो तें आईका तुका : ॥ खेळ काहीं अवगों च नका : चला जांव : आधीं पोटीं लागल्या भुका : घाल्यावरी टाकमंटीका रे वीठल : ॥ १० ॥ छ ॥ छ ॥

१२०५

आहे तें ची आम्हीं मागों तुजपासी : ॥ नव्हों अपैसी क्रीयाहीनें : ॥ १ ॥ धृ ॥ नोबलावीं वर्मे तों च बरें दीसे : प्रकट ते कैसें गुण करुं : ॥ छ ॥ येका यैसें येका द्यावयाचा मोळा : हें तुम्हां गोपाळा : नाहीं यैसा : ॥ २ ॥ तुका म्हणे लोकां नाहीं कळो आलें : ॥ करावें आपुलें जतन तों : ॥ ३ ॥

१२०६

आम्हीं याची केली सांडी : कोठें तोंडीं : [ व. पृ. १११ ] लागावें : ॥ १ ॥ धृ ॥ आहे तैसा असो आंतां : ॥ चींते चींता वाढेते : ॥ छ ॥ बोलीलयाचा मानी सीन : ॥ भीने भीन रांहावें : ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हां णे आम्हांपासी : धीरा यैसी जतन : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२०७

आम्हांपासी याचें बळ : कोण काळ वरीतों : ॥ १ ॥ धृ ॥ करुनी ठेलों जीवें साटी : होये भेटी तोंवरी : ॥ छ ॥ लागलों तो न फीरें पाठीं : पडील्या गांठी : ॥ वांचुनी तुका म्हणे अवकासें : ॥ तुमच्या यैसें हो देवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२०८

बोलीलें ची बोलें पडताळुनी : उपजत मनी : नाहीं संका : ॥ १ ॥ धृ ॥ बहुतां ची माये बहुत कृपाळु : साहोनी कोल्हाळ : ॥ बुझावीसी : ॥ छ ॥ बहुतांच्या भावें वांटीसी भातुकें : बहु कवतुकें : षेळवीसी : ॥ २ ॥ तुका म्हणे यैसें जाणतसों वर्म करुणां तो स्रम : न वजे वायां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२०९

नाहीं भ्यांलों तरी पावलों यां ठाया : ॥ तुम्हां आळवायां : ॥ जवळीके : ॥ १ ॥ धृ ॥ सताबळें आतां मागैन भोजन : ॥ केलें तें चींतन : आजीवरी : ॥ छ ॥ नवनीता साटीं : षादला हा जीव : ॥ थोड्या साटीं कीव : कोण करी : ॥ २ ॥ तुका म्हणे ताक न लगे हें घाटें : ॥ पांडूरंगा षोटें ॥ चाळवणें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२१०

सारीन तें आतां येका ची भोजनें : ॥ वारीन मागणे : वेळोवेळां : ॥ १ ॥ धृ ॥ सेवटीचा घांस गोड करीं माते : अगे कृपावंते पांडूरंगे : ॥ छ ॥ वंचु नये आतां कांहीं च प्रकार :धाकल्याचें थोर जाल्यावरी : ॥ २ ॥ तुका म्हणे आता बहु जाला वावो : ॥ कांहीं नेदी ठाव : उरों मागें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२११

पोट धालें मग न लेगे परती : जालीयां नीस्चींती षेळ गोड : ॥ १ ॥ धृ ॥ आपुलीया हातें [ व. पृ. ११२ ] देई वो कवळ : वीठल सीतळ : जीवन वरी : ॥ छ ॥ घराचा वीसर होईल अनंदें : ॥ नाचैन मी छंदें प्रेमाचीया : ॥ २ ॥ तुका म्हणे तों च वरी करकर : मग हें उतर षंडईल : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२१२

बोलावीसी तरी : तुझ्या येईन उतरी : ॥ १ ॥ धृ ॥ कांहीं कोड कवतीकें : ॥ हातीं द्यावया भातुकें : ॥ छ ॥ बोलवीसी तैसें : करीन वनसरीसें : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : माझें चळण तुज सवा : ॥ ३ ॥ छ ॥

१२१३

दील्हीं जीवभाव : तेव्हां साडी म्यां ठाव : ॥ १ ॥ धृ ॥ आतां वर्ते तुझी सता ॥ येथ सकळा अनंता : ॥ छ ॥ माझीया मरणें : तुम्ही बैसवीलें ठाणें : ॥ २ ॥ तुका म्हणे कांहीं : मीं हें माझें येथे नाही : ॥ ३ ॥ छ ॥

१२१४

येकांचीये वेठी : सांपडलों फुकासाटीं ॥ १ ॥धृ॥ घेतो काम सताबळें : माझें करुनी मेंडोळें : ॥ छ ॥ धावें मागें मागें : जायें तीकडे ची लागें : ॥ छ ॥ तुका म्हणे नेले माझें सर्वस्व वीठलें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२१५

करावी ते बोंब : आतां वाढवावा श्रम : ॥ १ ॥ धृ ॥ अवघें ची येकमये : राजे बोलों चालों नये : ॥ छ ॥ दुजीयाची सता : ॥ न चलेसी जाली अतां : ॥ २ ॥ आतां नाहीं तुका : ॥ पुन्हा हारपला लोकां : ॥ ३ ॥

१२१६

येणें पंथें आली त्यांची नीसंतानें जाली : ॥ १ ॥ धृ ॥ यैसी अवघड वाट : ॥ आलों कळोनी बोभाट : ॥ छ ॥ नागवीलीं थाटें : ॥ उरों नेंदीती लंगोटें : ॥ २ ॥ तुका म्हणे चोर : पुढें उभा कटी कर : ॥ ३ ॥ छ । छ ॥

१२१७

बराडीयाची आवडी पुरे : ॥ जया झुरे सार्टी तें : ॥ १ ॥ धृ । तैसें जालें माझ्या मना : ॥ तुठी चरणावरुणी : ॥ छ ॥ भागलीयां पेणें पावे : ॥ वीसांवे तें ठाकणी : ॥ २ ॥ तुका म्हणे छाया भेटे : बरें वाटे बरें वाटे तापे त्या : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२१८

आतां द्यावें अभयेदान : ॥ जीवन ये कृपेचे : ॥ १ ॥ धृ ॥ उभारुनी बाहो देवा : [ व. पृ. ११३ ] हात ठेवा : मस्तकीं : ॥ छ ॥ ना भे ना भी या उतरें : करुणाकरें सांतवीजें : ॥ २ ॥ तुका म्हणे केली आस : त्या हा दीस फळाची : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२१९

बहु जन्मे सोस केला : त्यांचा जाला परीनाम : ॥ १ ॥ धृ ॥ वीठलसें नाम कंठीं आवडी पोटीं : संचीतें : ॥ छ ॥ येथुन तीथवरी आतां : न लगे चींतां : करावी : ॥२॥ तुका म्हणे घालें मन : हें ची दान सकुनाचें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२२०

उसंतील्या कर्मवाटा : बहु मोटा आघात : ॥ १ ॥ धृ ॥ आतां सीघ्र यांवें सीघ्र यांवें : हातीं न्यावें धरुनी : ॥ छ ॥ भागलों ये षटपटे : ॥ घटेषटे करीतां : ॥ २ ॥ तुका म्हणे कृपावंतां : माझी चींता षंढावी : ॥ ३ ॥

१२२१

तुम्हांसी हें अवघें ठावें : कीती द्यावें स्मरण : ॥ १ ॥ कां बा तुम्हीं यैसें नेणें : नीस्टुरपणें टाळीत असा : ॥ छ ॥ आळवीता मायेबाप : ॥ न ये कृपा आझुनी ॥ २ ॥ तुका म्हणे जगदेशा : ॥ काये असा नीजेले : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२२२

नेलें सळेंबळें चीतांवीतांचें गांठाळें : ॥ १ ॥ धृ ॥ साहे जालीं घरीच्या घरीं : होता ठांई च कुंठोरी : ॥ छ ॥ मीं पातलों या भावा : ॥ कपट तें नेनें देवा : ॥ २ ॥ तुका म्हणें उघडें केलें : माझें माझ्या होते नेलें :॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२२३

जाला हा डांगारा : मुषीं लाह नाचे थोरा : ॥१॥ धृ॥ नागवीलों जणा चारी :॥ कोण्हीं बैसों नेंदी दारीं : ॥ छ ॥ संचीताचा ठेवा : ॥ आतां आला तैसा घ्यावा : ॥ २ ॥ तुका म्हणे देवें : म्हंणो : केलें हें बरवें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२२४

सोंषें सोष वाढे : ॥ हीमतीचें धीर गाढें : ॥ धृ ॥ येथे केलें नव्हे काई लंडीपन षोटें भाई : ॥ छ ॥ करीती हाये हाये : ॥ परी नव्हे कोण्ही साहे : ॥ २ ॥ तुका म्हणे घडी : साधलियां येकी थोडी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२२५

उगवल्या गुंती : यैशा मार्गे नेणो कीती :॥ १ ॥ धृ ॥ ष्यात केली आजामेळें : ॥ होतें नीघालें दीवाळें : ॥ छ ॥ मोकलीला प्रायेस्चीती [ व. पृ. ११४ ] कोण्हीं न धरीती हाती : ॥ छ ॥ ॥ २ ॥ तुका म्हणे मुक्त वाट : वैकुंठीची घडघडाट :

१२२६

कीती चौघाचारें : येथे गोवीली वेव्हारें : ॥ धृ॥ आसे बांधवीले गळे : ॥ होउं न सकती नीराळे : ॥ आपलें आपण: कलें कां नाहीं जतन । २ ॥ तुका म्हणे षंडदंडें : येरझारी परती लंडे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२२७

पांडूरंगा यैसा साडूनी वेव्हारा : आणीकांची करा : आस वांयां : ॥ १ ॥ धृ ॥ बहुतांसी दील्हा उधार उदारें : ॥ नीवडीना षरें षोटें कांहीं : ॥ छ ॥ याचीया अंकीता वैकुंठ बंदर : आणीक वेव्हार : चाळीत ना : ॥ २ ॥ तुका म्हणे माझे हातीचें वजन : ॥ यासी बोल कोण : ठेउं सके : ॥ ३ ॥

१२२८

ठेउनी ईमान राहीलों चरणी : ॥ म्हणउनी धणी कृपा करी : ॥ १ ॥ धृ ॥ आम्हांसी भाडार करणें जतन : ॥ आलें गेलें कोण : उंचनीच : ॥ छ ॥ करुणी साभाळीं राहीलों नीराळा : ॥ येक येक वेळा : ॥ अज्ञा केली : ॥ १ ॥

तुका म्हणे यावा दाषवी नीत : ॥ देवा नाहीं चीत : येथे देणें : ॥ ३ ॥ छं ॥ छं ॥

१२२९

बहु कोंळी बहु कोंळीं : आम्हीं देवाची गोवळी : ॥ १ ॥ धृ ॥ नाहीं वीट देतो भातें : जेंउं बैसवी सांगातें : ॥ छ ॥ बहु काळें बहु काळें : माझें पांघरे कांबळें : ॥२॥ तुका म्हणे नाहीं : ॥ साचें आमंचें : येसें कांहीं : ॥ ३ ॥ छ ॥

१२३०

बहु बरा बहु बरा : या सांगातें मीळे चारा : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी जीवें साटी : घेतली कान्होंबाची पाठी : ॥ छ ॥ बरवा बरवा दीवस : ॥ समागमांचा नीमीस्य : ॥ २ ॥ पुढती पुढती तुका : ॥ सोंकला सोंकवीतो लोकां:॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२३१

आतां जागें रे भाई जागें रे : ॥ चोर नीजेल्यां नाडून भागे रे : ॥ १ ॥ धृ ॥ येसें ठाउकें आसोन नेंगा : दुष पावाल पुढीले प्यणां : ॥ छ ॥ आतां नका रे भाई नका रे : ॥ [ व. प्र. ११५ ] आहे गाठीं तें लुटउं लोका रे : ॥ २ ॥ तुका म्हणे येकांच्या घायें : कां रे जाणोनी न धरा भये :॥ ३ ॥ छ ॥ छ॥

१२३२

मुदल जतन जालें : ॥ मग लाभाचें तें काये आलें : ॥ १ ॥ धृ ॥ बरी देउनी अंतर गांठी : ॥ राषा पारीष्या मिठी : ॥ ७ ॥ घाला पडे थोडे च वाटे : ॥ काम मेंदाचे च पेटे : ॥ २ ॥ तुका म्हणे वरदळ षोटें : फांसा अंतरीच्या कपटें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२३३

मज आंगाच्या अनुभवें : ॥ काये वाईट बरवें : ठावें : ॥ १ ॥ १ ॥ धृ ॥ जालों दोंहींचा देषणां : ॥ मागें पुढें हीं न ये मना : ॥ छ ॥ वोस वसती ठावी : ॥ परी हे चाली दुष पावी : ॥ २ ॥ तुका म्हणे घेउं देवा : ॥ सवें करुनी बोळावा : ॥ ३ ॥

१२३४

पाववावें ठाया : ॥ येसें सवें बोलों तया : ॥ १ ॥ धृ ॥ भावा येसी कीऱ्या ( = क्रीया ) राषे : ॥ षोत्या षोटेपणें वाषे : ॥ छ ॥ नेठउं अंतर : ॥

काहीं भेदाचा पदर :॥ ३ ॥ तुका म्हणें जींवें भावें सत्य मानी जे हें देवें : ॥ ३॥ छ॥ छ॥ छ॥

१२३५

येकांचीया घात्या टोंके : येक फीके उपचार : ॥ १ ॥ धृ ॥ यैसी सवे गोवळीया : ॥ भाव तया पढीयेंता : ॥ छ ॥ येकांचे थे उरुटें षाये : ॥ येकां जाये टाकुनी : ॥ २ ॥ तुका म्हणे बहु सोंपें : बहु रुपें अनंत : ॥ ३ ॥ छ ॥

१२३६

कन्हयां रे जगजेठी : देंई भेटी येक वेळ : ॥ १ ॥ धृ ॥ काये मोकलीलें वनी : ॥ सावजानी वेढीलें : ॥ छ ॥ येथवरी होतां संग : ॥ आगें आंग लपवीलें : ॥ २ ॥ तुका म्हणे पाहींलें मागें : ॥ यकऱ्या वेगें : अतरला : ॥ ३ ॥

१२३७

आपल्या आम्हीं पुसीलें नाहीं : ॥ तुज कांहीं करणें : ॥ १ ॥ धृ॥ माग मागें धांवती आलों : ॥ कांहीं बोलों यासाठीं : छ ॥ बहु दिस होतें मनी : घ्यावी धणी येकाती : ॥ २ ॥ तुका म्हणे उभा राहे : ॥ कान्होंबा पाहे : यांकडें : ॥ छ ॥ छ ॥

१२३८

[ व. पृ. ११६ ] धन्ये बाया यैशा नारी : ॥ घरीं दारी नादेत्या ॥ १ धृ ॥ चोरुनीया : येती त्यांसी : न कळता : ॥ छ ॥ दोहीं ठांई समाधान : संग कठीण : बहुत : ॥ २ ॥ तुका म्हणे जींवें साटीं : ॥ दुर्लभ भेटी : हे देवा : ॥ ३॥

१२३९

तुजवरी ज्याचें मन : दरुशण : देंई त्यांचे : ॥ १ ॥ धृ॥ कैसा जाती सुध भाव : हात पाये नांव रीती : ॥ छ ॥ अवघीयांचा करुनी मेळा : ॥ तुज डोंळा रोंखीलें : ॥ २ ॥ तुका म्हणे मज आड : लपोनी कोड दावीं देवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२४०

उदासीना पावल्या वेगीं : ॥ आंगा अंगी जडलीया :॥ १ ॥ धृ॥ वेढाळीला भोंवंता हरी : ॥ मधें फेरीं नाचती : ॥ छ ॥ मना आले करीती चार : ॥ त्या फार तो येकला : ॥ २ ॥ तुका म्हणे नारायेणीं : ॥ नीरांजनी : मीनलीया : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२४१

वीशमाची संका वाटे : ॥ सारीषें भेटे : तरी सुष : ॥ १ ॥ धृ ॥ म्हणउनी चोरीलें जना : ॥ आल्या राणा येकांती : ॥ छ आंतां दुजीयास कळों नये : जयां सोये नाहीं हे : ॥ २ ॥ तुका म्हणे मोकळें मन : नारायेण : भोगासी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२४२

आळींगणें कंठाकंठी : ॥ पडे मीठी सर्वांगें : ॥ १ ॥ धृ ॥ न घडे मागे परते मन : ॥ नारायेण : संभोगें : ॥ छ ॥ वचनासी वचन मीळे : ॥ रीघती डोळे डोळ्यांत : ॥ २ ॥ तुका म्हणे अंतरधींनी : जीव जीवनी वीराला : ॥ ३ ॥

१२४३

कोण्हीं सुना कोण्ही लेंकी : ॥ कोण्हीं येकी सतंतां :॥१॥ धृ ॥ अवघींयांची जगनींद : ॥ जाली धींद सारीषी : ॥ छ ॥ अवघ्या अ(व)घ्या जाल्या चोरा :॥ वींता वरा मायेबापा : ॥२॥ तुका म्हणे करा सेवा : आलें जीवावरी नऱ्हीं : ॥ ३ ॥

१२४४

[ व. पृ. ११७ ] येथील जे येकी घडी : तये जोडी पार नाहीं : ॥ १ ॥ धृ ॥ कीती त्यांचा सासुरवास : ॥ कैंचा रस हा तेथे : ॥ छ ॥ अवघे दीस गेले कामें : ॥ नाहीं जन्में षंडणा : ॥ २ ॥ तुका म्हणे रतल्या जनी : सोडा झनी : कान्होबा : ॥ ३ ॥ छ ॥

१२४५

माझा पाहा अनुभव : ॥ केला देव आपला : ॥ १ ॥ धृ ॥ बोलीलें तें ची दचाल : तरी होवें ते काळी : ॥ छ ॥ सोसीलीयां जगनींद : ॥ मग गोवींद : म्हंणीयारा : ॥ २ ॥ तुका म्हणे धीर केला : त्याणें याला : गोवीलें ॥ ३ ॥

१२४६

आलीयें धावंती धावंती : भेटी होईल म्हुण : ॥ तवं ते टळालि वेळ वो माझा उरला सीण : ॥ १ ॥ आंतां काये करुं वो मज भेटेले कैसा : ॥ हरीलागी प्राण फुटे वो थोरी लागली आसा : ॥ छ ॥ लावीला उसीर बहुतीं बहु वोढीती वोढा : सांभाळीतां सांग असंग : दुष पावलें पीडा : ॥ २ ॥ जळो अंतां सर्व-

सार वो : कयीं सेवट पुरे : ॥ तुकयाच्या स्वामी गोपाळालागी जीव हा झुरे : ॥ ३ ॥

१२४७

जेथे आठवती स्वामीचे मज पाये : उतम ते ठाये : रम्ये स्थळें : ॥ १ ॥ धृ ॥ राण अथवा घर : येकांत लोकांत : ॥ समाधान चीतनें ते घरी : ॥ धने काळ सरे अंनद जो रुपें : वाहातां संकल्पें : गोवींदाच्या : ॥ ५ ॥ तुका म्हणे लाभ काळ तें ची चीणें : ॥ भाग नारायेणें : उतम ते : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

१२४८

आतां नव्हे गोड कांहीं करीतां संसार : ॥ आणीक संचार जाला माजीं : ॥ १ ॥ धृ ॥ ब्रम्हंरसें गेलें भरोनीयां आंग : ॥ आधील तो रंग पालटला : ॥ छ ॥ रसनेचीये रुची कंठीं नारायेण : बैसोनीयां मन नीववीलें : ॥ २ ॥ तुका म्हणें आंता बैसलें ठाकणी : ॥ ईछेची ते धणी : पुरईल : ॥ ३ ॥

१२४९

प्रथम भेटी आळींगण : मग चरण वंदावे : ॥ १ ॥ धृ ॥ येसा माझा भोळा बाप : ॥ हरी ताप कवळुनी : छ ॥ नं संगतां सीण भाग : पांडु [व. पृ. ११८] रंग जाणतसे : ॥ २ ॥ तुका म्हणे कृपावंतें : ॥ द्यावें भातें : न मंगतां : ॥ ३ ॥ छ ॥

१२५०

सर्व काळ माझे चीतीं : ॥ हे च षंती राहीली : ॥ १ ॥ धृ ॥ बैसलें तें रुंप डोंळां : वेळोवेळां : आठवे : ॥ छ ॥ वेव्हाराची सरली मात अषंडीत अनुसंधान : ॥ २ ॥ तुका म्हणे वेध जाला : आंगा आला : श्रीरंग : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२५१

आतां कास्यासाटी दुरी : अंतर उरी राषीली : ॥ १ ॥ धृ ॥ करीं लवकरी मुळ : लाहाने तीळ मुळीचीया : ॥ छ ॥ दोहीं ठाई उदेगवाणें : ॥ दरुसेणें नीस्चींती : ॥ २ ॥ तुका म्हणे वेग व्होवा : येसी जीवा उदकंठां : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२५२

कोठें भोग उरला आंता : ॥ अठवीतां तुज मज : ॥ १ ॥ धृ ॥ आड कांहीं न ये दुजें : ॥ फळ बीजें : आणीलें : ॥ छ ॥ उद्वेग ते वांयांवीण : ॥ केंचा सीण : चींतने : ॥ २ ॥ तुका म्हणे गेला भ्रम : तुमच्या धर्मे पांयांचा : ॥ ३ ॥ छ ॥

---

१ मागें १८८ च अभंग आला आहे.

१२५३

संसार तो कोण देषे : ॥ आम्हां सषे हरीजन : ॥ १ ॥ धृ ॥ काळ ब्रम्हांनदे सरे : ॥ आवडी उरे संचली : ॥ छ ॥ सपणी हीं नाही चींता : राती जातां दीवस : ॥ २ ॥ तुका म्हणे ब्रह्मरसें : ॥ सेउं सरीसें भोजन : ॥ ३ ॥ छ ॥

१२५४

चींता नाहीं गावीं : वीस्णुदासांचीये : घोश जयेजयेकार सदा : ॥ १ ॥ धृ ॥ नारायेण घरीं सांटवीलें धन : ॥ अवघाची वाण : तया पोटी : ॥ छ ॥ संवंग सकळां पुरे धनीवरी : ॥ सेवावया नारी नर बाळां : ॥ २ ॥ तुका म्हणे येणें अनदें अनंदु : ॥ गोवींदें गोवींदु : पीकवीला ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२५५

करीती तयांस वेवसाव आहे : ॥ येथे व्हो रे साहे : येकमेकां : ॥ १ ॥ धृ ॥ गातां आईकतां समान चीं घडे : लाभें लाभ जोडे : वीशशता : ॥ छं ॥ प्रेमाचें भरीतें भातें घ्यावें आंगी :॥ नटें टाळी रंगीं : सुरत्वेंसी : ॥ २ ॥ तुका म्हणे बहु जन्माचें षंड [ व. पृ. ११९ ] णं : होईल हा सीण : नीवारोणी :॥ ३ ॥

१२५६

पडीली हे रुढी जगा परीचार : ॥ चाळीती वेव्हार : सत्य म्हुण : ॥ १ ॥ धृ : ॥ मरणाची कां रें नाहीं आठवण : ॥ संचीताचा धन : लोभ हेवा : ॥ छ ॥ देहाचें भये तें काळाचें भातुकें : ग्रासुनी तें येकें टेवीलेंसे : ॥ २ ॥ तुका म्हणे काहीं उघडा रे डोळे : ॥ जाणोनी आंधळे होउं नका : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२५७

हीत नाहीं ठावें जननी–जनका : ॥ दावीला लोकीकाचार तीहीं : ॥ १ ॥ धृ ॥ अंधळ्याचे काठी लागलें अंधळें : घात येका वेळें पुढें मागें : ॥ छ ॥ न धरावी चाली : करावा वीचार : वराल आहार गळीं लावी : ॥ २ ॥ तुका म्हणे केला नीवाडा रोकडा : ॥ राउत हा घोडा हातोहातीं : ॥ ३ ॥ छ ॥

१२५८

जेथे पांहें तेथे कांडीती भुस : ॥ चीपाडें चोंबुन : पाहाती रस : ॥ १ ॥ धृ ॥ काये सांगो देवा भुलले जीव : ॥ बहु यांची येतीसे कीव : ॥ छ ॥ वेठीचें मोटलें लटीकें च्ची फुगे : ॥ पेनीयां जाउन भीक्षा मागे : २ ॥

तुका म्हणे कां उगे ची षोल :॥ जवळी दाषवीं :॥ आपण्यां बोल :
॥ ३ ॥ छ ॥

१२५९

जाणीवेच्या भारें चेंपला उर :॥ सदा बुरबुर सरे ची ना :॥ १ ॥ धृ॥ कीती यांचें आईको कानी :॥ मारीलें घाणी नाळकरी :॥ छ ॥ मीठेंवीण अंळणी बोल कोरडी फोल घसघस :॥ २ ॥ तुका म्हणे ढेंगा : न कळे हीत : कीती फजीत : करुं तऱ्ही :॥ ३ छ ॥

१२६०

मोकळें मन रसाळ वाणी : यां जें गुणी संपन :॥ १ ॥ धृ ॥ लक्षुमीं ते अैस्या नावें : भाग्यें ज्यावें तरी येणें :॥ छ ॥ नम्रता नमन आंगी : नेघे रंगी पलट :॥ २ ॥ तुका म्हणे ज्याच्या नावें : घेतां होवें संतोसी :॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२६१

[व.पृ.१२०] ब्रम्हनीस्ट काडी : जरी जीवानावें मोडी :॥ १ ॥ धृ ॥ तया घडली गुरुहत्या :॥ गेला उपदेस तो मीथ्या :॥ छ ॥ सांगीतलें कानी : रुप आपलें ची षाणी :॥ २ ॥ भुतांच्या मछरें :॥ ब्रम्हज्ञान नेलें चोरें :॥ ३ ॥ सीकल्या सांगे गोस्टी :॥ भेदें क्रोध वाहे पोटीं :॥ ४ ॥ तुका म्हणे वानी :॥ नींदा स्तुती लावी स्तनी :॥ ५ ॥ छ ॥

१२६२

गहुं येकी जाती : परी त्या पाधानी नासीती :॥ १ ॥ धृ ॥ वर्म जाणावें तें सार : कोटे काये थोडें फार :॥ छ ॥ कमाईच्या सार : जाती दावीती प्रकार :॥ २ ॥ तुका म्हणे मोल :॥ गुण मीथ्या फीके बोल :
॥ ३ ॥ छ ॥

१२६३

जातो वाराणसी : नीरवी गाई घोड्या म्हैसी ॥ १ ॥ धृ ॥ येतो गेलों नाहीं यैसा :॥ सत्य माना हा भरवसा :॥ छ ॥ वरळा भुस षावें :॥ नका काढु माझीं पेवें :॥ २ ॥ बोकीलीया वोका : नाहीं वेचीला म्यां रुका :
॥ ३ ॥ सांगा जेवाया ब्राम्हण :॥ तरी माझी कापा मान :॥ ४ ॥

भीकारीयाचे पाठी : ॥ लागा घेउनीया काठी : ॥ ५ ॥ नाहीं माझे मनी : पोर रांडा नागवणी : ॥ ६ ॥ तुका म्हणे नस्ट : होतें तैसें केलें पस्ट : ॥ छ ॥ छ ॥

१२६४

पतीतमीरासी : ॥ ते म्यां धरीयेली जीवासी : ॥ १ ॥ धृ ॥ आतां बळीया सांग कोण : गोही तुझें नाम मन : ॥ छ ॥ पावनाचा ठसा : ॥ दावीं मज तुझा कैसा : ॥ २ ॥ वाव तुका म्हणे जालें : ॥ रोष पाहीजे दावीलें : ॥ ३ ॥ छ ॥

१२६५

हरी हरी तुम्ही म्हणा रे सकळ : ॥ त्याणें मायाजाळ तुटईल : ॥ १ ॥ धृ ॥ आणीकां नको काबाडाचे भरी : ॥ पडों येथे थोरी नागवण : ॥ छ ॥ भावें तुळसीदळपाणी जोडी हात : ॥ म्हणवीं पतीत वेळोवेळा : ॥ २ ॥ तुका म्हणे हा कृपेचा सागर : ॥ नामासाठीं पार पाववील : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२६६

संतांच्या हेळना बाटैल जें तोंड : ॥ प्रतक्ष तें कुंड चर्मकाचें : ॥ १ ॥ धृ ॥ भैंसळीचें वीर्य वैस्या आनुभवें : ॥ आपलें परावें नाही षळा : ॥ छ ॥ सत्यासी जो शोध काढीतो चांडाळ : ॥ धरावा वीटाळ बहु त्याचा : ॥ २ ॥ तुका म्हणे केला प्रज्ञा याची साटी : ॥ काहीं माझे पोंटी संता(का) न व्हो : ॥ ३ ॥ छ ॥

[व. पृ. १२१]

१२६७

भुमी अवघी सुध जाणा : ॥ अमंगळ हे वासना : ॥ १ धृ ॥ जैसे वासपळे जीव : ॥ साडीं नसतां आंगी धाव : ॥ छ ॥ जीव [1]अवघे देव : ॥ षोटा नागवी संदेह : ॥ २ ॥ तुका म्हणे सुध : ॥ मग तुटलीयां भेद : ॥ २ ॥ छ ॥

१२६८

सरतें माझें तुझें : तरी हें उतरतें वोझें : ॥ १ ॥ धृ ॥ न लगे साडावें माडवें : ॥ आहे सुध ची स्वभावें : ॥ छ ॥ घातला तो आशामोहें जाळें गळा फांसा : ॥ २ ॥ करीता नारायेण : येव्हडें वेचीतां वचन : ॥ ३ ॥ लाभ हाणी हे समान : तैसा मानअपमान : ॥ ४ ॥ तुका म्हणे याचे नावं साधीलें तें साचें : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

---

१ हा अभंग पूर्वी ९१९ वा आला आहे.

१२६९

जप करीता राग : आला जवळी तो राग:॥१॥धृ॥ नको भोवंताले जगी : पाहों जवळी राष आंगी : ॥ छ ॥ कुडीयाची पंगती : ॥ सदा भोजन पंगती: ॥२॥ तुका म्हणे ब्रम्ह : ॥ साधी वीरहीत : हे कर्म : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२७०

गावे म्हुण गीत : ॥ धरुन राहें तैसें चीत : ॥ १ ॥ धृ ॥ हें ची थोर अवघड आहे : ॥ अनं देषोनी भुक राहे : ॥ छ ॥ अईकावी म्हुण कथा : तैसें धरुनी राहें चीता : ॥ २ ॥ तुका म्हणे धनी : नव्हे जेवील्यावांचुनी : ॥ ३ ॥ छ ॥

१२७१

मांहारासी सीवे कोपें : ब्राम्हण तो नव्हे : ॥ १ ॥ धृ ॥ तया प्रास्चित कांहीं : देहेत्याग करीतां नाही : ॥ छ ॥ नातळे चांडाळ : त्याचा अंतरी वीटाळ ॥ २ ॥ ज्याचा संग चीतीं : ॥ तुका म्हणे तो ते याती : ॥ ३ ॥

१२७२

तेलीनीसी रुसला वेडा : रागें कोरडें षातो भीडां : ॥१ ॥ धृ ॥ आपलें हींत आपण पाही : ॥ संकोच तो न धरीं कांही : ॥छ॥ नावडे लोकां टाकीला गोहो : ॥ बोडीले डोंकें सांडीला मोहो : ॥ २ ॥ सेजारीनीच्या गेली रागें : ॥ कुतऱ्यानी घर भरले मार्गे : ॥ ३ ॥ पींसा रागें भाजीलें घर : ॥ नागवली नेणे फार : ॥ ४ ॥ तुका म्हणे वोंच्या रागें : ॥फेडीलें सावलें देषीलें जगें : ॥ ५॥

१२७३

[ व. पृ. १२२ ] करीतां देवार्चन : ॥ घरा आलें संत जन ॥१॥ धृ ॥ तरी तें सारावे परते : हे च पुजावे आरतें : छ ॥ साळेग्राम वीस्णुमुर्ती : ॥ होत भलते हे जाती : ॥ २ ॥ तुका म्हणे संधी : ॥ आधीक वैस्णवांची मांदी : ॥ ३ ॥ छ ॥

१२७४

करावें गोमटें : ॥ बाळा माते तें उमटे : ॥ १ ॥ धृ ॥ आपलीयाहुनी : ॥असे वाल्हें तें जननी : ॥ छ ॥ वीयोगें तें तीस : तीच्या उपचारें वीश : ॥ २ ॥ तुका म्हणे पायें : ॥ डोळा उपचारे ज्या न्यायें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२७५

संताचा अतीक्रर्म : देवपूजा ते अधर्म : ॥१॥ धृ ॥ येती दगड ते वरी :॥ मंत्रपुस्पें देवासीरी ॥ छ ॥ अतीतासी गाळी : देवा नीवेद्यास पोळी : ॥ २ ॥ तुका म्हणे देवा : ॥ ताडण भेदकांची सेवा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२७६

यैसे कुळी पुत्र होती : बुडवीती पुर्वजा : ॥ १ ॥ धृ ॥ चाहाडी चोरी भांढवला : वांटा आला भा(गा)सी : ॥ छ ॥ याचीयाने दुषी मही :॥ भार तो ही न साहे : ॥ २ ॥ तुका म्हणे ग्रामपसु : केला नासु आयुशाचें : ॥ ३ ॥ छ ॥

१२७७

करणें तें देवा : ॥ हे ची येकी पावे सेवा : ॥ १ ॥ धृ ॥ अवघें घडें याणें सांग : ॥ भक्त देवाचें तें आंग : ॥ छ ॥ हें ची येक वर्म : ॥ काये बोलीला तो धर्म : ॥ २ ॥ तुका म्हणे षरें : षरें त्रीवाचा उतरें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२७८

गांठोळीस धन भाकावी करुणा : ॥ दाउनी संजना कीव पीडी : ॥ १ ॥ नाठेळाची भक्ती कुचराचें बळ : ॥ कोरडे वोंगळ मार षाये : ॥ छ ॥ सांडोव्यास घाली देवाची करंडी : वील्हाळ त्या धोंडी : पुजा दावी : ॥ २ ॥ तुका म्हणे यैसे माकडाचे छंद : ॥ अवघें ची धंद धदली ते : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२७९

चालावा पंथ त्या पावीजे तें ठाया : ॥ आईकील्या वांयां : वारता त्या : ॥ १ ॥ धृ ॥ आईका जी वोजे पडतुसें पायां : भावाची ते जांयां : वाट नव्हो : ॥ छ ॥ व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव : सांगतां तो भाव : येत नाही : ॥ २ ॥ तुका म्हणे येथे पाहीजे आराले : बीव नीवळलें तरी भासे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

[ व. पृ. १२३ ] १२८०

अनुतापयुक्त : गेलीयां अभिमान : वीसरु वचन मागीलाचा : ॥ १ ॥ धृ ॥ त्याचे पाये माझे लागोत कपाळी : भोगे उस्टावळी धन्य काळ : ॥ छ ॥ शढ उर्मी जीहीं हाणीतल्या लाता : ॥ शरण यां संता आल्यां वेगी : ॥ २ ॥ तुका म्हणे जाती वळे लौकरी : ॥ ठाईची अंतरी : सुध होती : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२८१

अनुताप दोश : ॥ जाळी न लगतां नीमीश ॥ १ ॥ ध्रु॥ परी तो राहे वीशांवला :॥ आदी अवसान तो भला : ॥ छ॥ हें ची प्रास्चीत: अनुतापीं न्हालें चीत : ॥२॥ तुका म्हणे पापा : नये सीवों अनुतापा : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२८२

षोल वोले पडे तें पींकें उतमं : उथळाचा श्रम : वायां जाये :॥ १ध्रु ॥ लटी-क्याचे आम्हीं न व्हों सांटेकरी : थींतें घाले भरी पदरींचें : ॥ छ ॥ कोणा येहे-लोकीं पाहीजे पसारा : दंभ पोट भरायाचे चाडे : ॥ २ ॥ तुका म्हणे कंसी आगी जें उतरे : ॥ तें ची येथे सवे : जाती शुध :॥ ३ ॥ छ॥

१२८३

गोमंटच्या बीजाची फळें हीं गोमटीं : बाहे तें ची पोटीं समतुक : ॥ १ ॥ ध्रु॥ जातीच्या संतोशें : चीतासी वीस्रांती : प्रतोनी मागुतीं फीरों नेणें : ॥ छ ॥ षऱ्याचे पारषी येत नाहीं तोटा : ॥ नीवडे तो षाटा : ढाळें दुरी : ॥ २ ॥ तुका म्हणे मज सत्याची आवडी : करीतां तांतडी : येत नाही : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२८४

जीहुवे जाला चळ : नेघे अवसान ते पळ : ॥ १ ॥ ध्रु ॥ हें ची वोसनां वोन-उटी : ॥ देव सांटवला पोटीं : ॥ छ ॥ नाहीं वोढा वारा : पडीला प्रसंग तो बरा : ॥ ॥ २ ॥ तुका म्हणे जांली : मज हे अनावर बोली : ॥ ३ ॥ छ ॥

१२८५

मन जालें भाट : ॥ कीर्त मुषें घडघडाट : पडीयेली वाट : ये च चाली स्वभावें : ॥ १ ॥ ध्रु ॥ वोलें देवाचे पवाडे : नीत नवे ची रोकडे : ज्यांपरी आवडें : तैसा तैसा करुनीं : ॥ छ ॥ रोंषी राहावें समोर : पुढें मागें चाले भार : करावें उतर : सेवा रुजु करुणी : ॥ २ ॥ पुरवरसळा देकारें : संतोशाच्या अभयें-करें : आंगीच्या उतारें : तुक्या स्वामी : ऋनधारी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२८६

[ व. पृ. १२४ ] दुरी तों ची होतों आपुले असंके : ॥ नव्हते ठाउके मुळभेद : ॥ १ ॥ आंतां जेथे तेथे येईन सांगातें : ॥ लपाया पुरतें उरों नेदी : मिथ्या मोंहें मज लावीला उसीर : ॥ तरी हें अंतर जालें होतें : ॥ २॥ तुका म्हणे कां रे दाषवीसील भीन : लटीकाची सीट : लपंडाई : ॥३॥

१२८७

कळो न ये तों ची चुकावीतां बरें : मग पाठमोरें काये काज : ॥ १ ॥ धृ ॥ धरीलेती आतां धाजी माझा डाव : सांपडतां भाव : यैसा आहे : ॥ छ ॥ होतासी अंतरें झांकलीया बळी : तो मी हा न्याहाळी : धरुणी दृस्टी :॥ २ ॥ तुका म्हणे तुज रडीची च षोडी : आहा च बराडी : तो मी नव्हें : ॥ ३ ॥

१२८८

पोटाचे नटतीं नये पाहों छंदें :॥ वीषयांच्या भेदें : वीषरुप : ॥ १ ॥ धृ ॥ अर्थी परमार्थ कैसा घडों सके :॥ चीत लोभीं भीके : सोंगें वांया :॥ छ ॥ देवाची चरीत्रें : दाखवीती लीळा : लाघवाच्या कळा : मोहावया :॥ २ ॥ तुका म्हणे चीती राहे अभीळास : दोघां न(र)येवा(स)स मानची :॥ ३ ॥ छ ॥

१२८९

मोल देउनीयां सांटवावे दोश :॥ नटांचे वेश : पाहोनीयां :॥ १ ॥ धृ ॥ हरीदासां मुखें हरीकथा श्रवण :॥ तेथे पुन्यें पुनें वीशसता :॥ छ ॥ हरीतील घस्त्रें गोपीकांच्या वेशें :॥ पाप त्यासरीसें मात्रागमन :॥ २ ॥ तुका म्हणे यैसें बहु जालें जन :॥ सेवाभक्तीहीण रसीं गोडी :॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२९०

ध्रु ॥ वीठोबा वीसांवया :॥ वीसांवया पडों देई पायां :॥ छ ॥ बहु क्षीद क्षीणं : आलों सोसुनीयां वन :॥ १ ॥ बहुतां काकुळती : आलों सोसीली फजीती : ॥ २ ॥ केली तुजसाटीं : तुका म्हणे बहु आटी :॥ ३ ॥

१२९१

कां गा धर्म केला : आसोन सतेचा आपुला ॥ १ ॥ धृ ॥ उभाउभीं पाये जोडीं : आतां फांकों नेंदी घडी :॥ छ ॥ नको सोडुं ठाव : आतां घेउं नेंदी वाव : ॥ २ ॥ तुका म्हणे ईछा :॥ [ व. पृ. १२५ ] तैसा करीन सरीसा :॥ ३ ॥ छ ॥

१२९२

तुमंची तों भेटी नव्हे यैसी जाली :॥ कोरडी च बोली : ॥ ब्रम्हंज्ञान : ॥ १ ॥ धृ ॥ आतां ने बलावें यैसें वाटे देवा : ॥ संग न करावा : कोण्हांसवें : ॥ छ ॥ तुम्हां नीर्मील्यासी सांपडलें आंग : ॥ नेदावा हा संग : वीचारीलें :॥ २ ॥ तुका म्हणे माझी राहीली वासना : आवडी दरशेणांची च होती : ॥ ३ ॥ छ ॥

१२९३

मोक्षाचें आम्हांसी नाही आवघड : तो आसे उघड : गांठोळीस : १ ॥ धृ ॥ भक्तीचे डोहोळे : होतील जीवासी : नवल तेवीसी : पुरवीता : ॥ छ ॥ ज्याचें त्यासी देणे कोण तें उचीत : मानुनीयां हीत : ॥ घेतों म्हुंण : ॥ २ ॥ तुका म्हणे सुखें देई सवंसार : ॥ आवडीस थार करीं माझे : ३ ॥ छ ॥

पुढें अर्धे पानापासून 'ज्ञानेश्वराचि आदि' पृ. १३० अखेरपर्यंत कोणीं दुसऱ्यानें लिहिली आहे. पृ. १३१ वर कान्होबाची आरती कडवी ५ लिहिली आहे. पुढें पृ. १३२ वर ज्ञानेश्वराची आदी पूर्ण करून निर्थावळि ज्ञानदेव–नामदेव संवाद लिहिला आहे. तो १६४ पानापर्यंत लिहिला आहे. शेवट

> अभंग तासन : संपुर्ण तीर्थावळीचे : ॥ सकें १६१० वीभव नाम सवछरे पौशवदी ३० अमवाश्या वार सुकुरवा ते दीनी समाप्त हस्त अक्षर संताजी तेळी जगनाडे याची पोथी कसबे चाकण : शुभं भवतु.

असा आहे.

१२९४

[व. पृ. १६४] धन्य दीवस आजी दरुशणं संतांचें : ॥ नादे तयां घरीं : देवत पंढरीचें : ॥ १ ॥ धृ ॥ धने पुन्येवंत कैसा जाला सौंसारु : देव आणी भक्त दुजा नाहीं वीचारु : धन्ये पुर्व पुर्वपुन्य वोडवलें नीरुतें : संतांचें दरुशेण : जालें भाग्यें बहुतें : ॥ २ ॥ तुका म्हणे धन्य मज जोडली जोडी : ॥ संतांचे चरण : न वीसंभें अर्ध घडी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ १ ॥ छ ॥

व. पृ. १६५ कोरें आहे.

व. पृ. १६६

१२९५

मातेचीये चीती : अवघी बाळकाची व्याप्ती : ॥ १ ॥ धृ ॥ देहे वीसरे आपुला : जवळी घेतां सीण गेला : ॥ छ ॥ दावी प्रेमभाते : आणी आंगावरी चढतें : ॥ २ ॥ तुका म्हणे संतांपुढें : ॥ पाई झोंबें लाडेंकोडें : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२९६

कोणा पुण्या फळ आलें : आजी देषीली पाउलें : ॥ १ ॥ धृ ॥ यैसें नेणे नारायेणा : ॥ संती सांभाळीलें दीना : ॥ छ ॥ कोण लाभ काळ : दीन आजी मंगल : ॥ २ ॥ तुका म्हणे जाला : येव्हडा लाभ कां वीठला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२९७

योगाचें तें भाग्य क्षमाः आधीं दमा इद्रीयें:॥ १ ॥ धृ ॥ अवघीं भाग्यें येती घराः देवसोयेरा : जालीयाः ॥ छ ॥ मीरासीचें सेत: नाहीं देत: पीक उगलें : ॥ २ ॥ तुका म्हणे उचीत जाणा : उगीच सीणा कास्याला : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१२९८

मान इछी तो अपमान पावे : ॥ अमंगळ सवे : ॥ अभाग्याची :॥ १ ॥ धृ ॥ येकाचीये आंगीं दुजीयाचा वास : आसा पुढें नास : सीध करी : ॥छ॥ आधीं फळासी कोठें पावों सके : वासनेची भीके : वरी चाली : ॥ २ ॥ तुका म्हणे राजहंस ढोरा नावें काये तया द्यावें : अलंकाराचें :॥ ३ ॥ छ ॥

१२९९

जालें समाधान : ॥ तुझे धरीले चरण : ॥ १ ॥ धृ ॥ आतां उठावेंसें मनाः॥ येत नाहीं नारायेणां : ॥ छ ॥ सुरवाडीकपेणें : येथे सांपडलें : त्यणें : ॥ २ ॥ तुका म्हणे भाग : गेला नीवारला लाग : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३००

मुषाकडे वास : पाहें धरुनीयां आस : ॥ १ ॥ धृ ॥ आतां होईल तें सीरी : ॥ मनोगत अज्ञा धरी : ॥ छ ॥ तुम्हीं अंगीकार : ॥ केला (पा)हीजे हें सार : ॥ २ ॥ तुका म्हणे दारी : उभे याचक मीं हरी : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३०१

नाहीं माथा भार : तुम्हीं घेत हा वीचार : ॥ १ ॥ धृ ॥ जाणोनीयां यैसें केलें : ॥ दुरी आंगेंसी लावीलें : ॥ छ ॥ आंतां बोलावें आवडी : नाम घ्यावें घडी : ॥ २ ॥ तुका म्हणे दुरी : देवा षोटी यैसी उरी : ॥ ३ ॥

१३०२

माझें जड भारीं : ॥ आतां अवघें तुम्हांवरी : ॥ १ ॥ धृ ॥ जालों अकीत अकीला तुमंचा मुकलों मागीला : ॥ छ ॥ करीतो जें काम : माझी सेवा तुझें नाम : ॥ २ ॥ तुका पांयां लागे : काहीं नेदी ना न मगे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३०३

चीता यैसी नको देउं आठवण : ज्याणें देवाचे चरण : अंतरे तें : ॥ १ ॥ धृ ॥ आलीया वचने राम नाम ध्वनी : आईकावी कानी : यैसें गोड : ॥ छ ॥ मछ-

राचा ठावो नको देउं शरीरी : लाभेंवीण दुष देतो जीवा : ॥ २ ॥ तुका म्हणे राहे अंतर सीतळ : ॥ शांतीचें तें बळ क्षेमा आगीं : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३०४

तुम्हीं आम्हीं भलें आतां : ॥ जालों चीतां कास्याची : ॥ १ ॥ धृ ॥ आपलाल्य असों स्थळी मौन्य कळी : वाढेनी : ॥ छ ॥ सहजें मनी होतें : तें उन्वीतें घडलें : ॥ २ ॥ तुका म्हणे नसतें आगा : येतें संगा : सारीषें : ॥ ३ ॥ छ ॥

१३०५

कोण पुन्य कोना गांठी : त्यांस यैसीयांच्या भेटी : ॥ १ ॥ धृ ॥ जीहीं हरी धरीला मनी : दील्हें सवंसारा पाणी : ॥ छ ॥ कोण हा भाग्याचा : यैसीयांसी बोले वाचा : ॥ २ ॥ तुका म्हणे तुटी : सोसार त्यांचे भेटी : ॥ ३ ॥ छ ॥

१३०६

मज दास करी त्यांचा : संत दासांच्या दासांचा : ॥ १ ॥ धृ ॥ मग होत कल्पवरी : सुषे गर्भवास हरी : ॥ छ ॥ नीच वृती काम : परी मुषी तुझें नाम : ॥ २ ॥ तुका म्हणे सेवे : ॥ माझें संकल्प वेचावे : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥

१३०७ डाक

आंम्हीं वीर जुंझार : करुं जमदाढे मार : तापटीले भार : मोड जाला दोइयांचा : ॥ १ ॥ धृ ॥ जाला हाहाकार : आले हाकीत जुंझार : संषचेक्राचे सुंघार : कंठी [ व पृ. १६८ ] हार तुळसीचे : ॥ छ ॥ रामनामाकीत बाण : गोपी लावीला चंदन : झळकती नीशान : गरुड टके पताका : ॥ २ ॥ तुका म्हणे काळ : जालों जींकोनी नीस्चळ : ॥ पावला सकळ : भोग आम्हां आमुचा : ॥ ३ ॥

१३०८ डांका

षेचर षडतर : काळ कांपती असुर : नांदे भीमरातीर : पंढरपुरपाटणी : ॥ १ ॥ धृ ॥ करीं का रे हाकारा : सहश्रु नामे येकसरा : दवडींते षेचरा : अंगसंगें करुनीयां : ॥ छ ॥ सीते जाली झडपनी : राहाण वासुगीचा बणी : पावली जननी झोंटी मोकळीयां कैसी : ॥ २ ॥ लावीलें कावरें : प्रल्हादा म्हैसासुरें : आली आली येकसरें : दांत षाती रंगासी : ॥ ३ ॥ वसुदेवांचीं बाळें : सात षादलीं ज्या काळें : आली आली भोगवेळे : तया कारणें तेथे : ॥ ४ ॥ पांडवे बापुडीं : वांझें केली फीरती वेडी : धावोनीयां काढी : आंगसगें त्राहाटीली : ॥ ५ ॥ नामाचें

चींतन : तेथे धांवते आपण : न वीचारीता हीन दीन : भाव देषे जयाचा : ॥ छ ॥ कुळीची देवता : **तुका** म्हणे आम्हां माता : काये भयें भुतां : काळ येम-दुतांचे : ॥ १ ॥

१३०९ डांक दुसरी

वीनती घातली अवधारी : मज देव अभयें कंरी : पडीले षेचरी : आणीका वारी : नावांची : ॥ १ ॥ धृ ॥ येंई गे येकलो : रंग वोडवला : हरीनामी उठीला : गजरु केला हाकारा : ॥ छ ॥ देवांचे देवते : तुज नीमीलें आदीनाथे : ये गे रुपावंते : भोगा माझ्या धावंती : ॥२॥ न लवीं आतां वेळ : अईत सारीली सकळ : **तुका** म्हणे कुळ : आमुचीये देवते : ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ ३ ॥

१३१० डांक

पुढें येते देवी : तीची जती चालों द्यावी मागील झाडावी : झाड मान आसुडी : ॥ १ ॥ ध्रु ॥ येकीवीरा आली आंगा : आतां नीवारील रोगा : माझ्या भक्तापासीं सांगा : पुजा भावें करावी : ॥छ॥ मेढां मारावा वालोळ : पुजा पावली सकळ : [व. पृ. १६९ ] तुम्हीं केलें बळ : मग ते ठांई न पडे ची ॥ २ ॥ **तुका** म्हणे मुळी लागली ते आली ते आली कुळी : वंदुनी सकळी : जीवेंभावें (ओ)वाळा : ॥ ३ ॥ छ ॥ ४ ॥

१३११ डांक

देवी देव जाले भोग सरला यावरी : सांगाया दुसरी : पुढें नाहीं उरली : ॥ १ ॥ धृ ॥ हरी नाम देव नाम : तुम्हीं गाउनीयां जागा : पेंठवनी मागा : नका ठेउं लीगाड : ॥ छ ॥ सेवटीं सुताळी बरवी वाजवावी डांक : ॥ ताळा घाली येक : सरलीयाचे सेवटीं : ॥ २ ॥ गुंडाळा देव्हारा : मान नेती मानकरी : ॥ **तुका** म्हणे बरी : आजी कोडीं उगवली : ॥ ३ ॥ ५ ॥

ळळीत १३१२

न कळे माव मुनी मागे येकी अंतुरी : ॥ साटी सवछरा : जन्म तया उदरी : ॥ १ ॥ धृ ॥ कैसा आकळ गे माये चपळ : ॥ त्रीभुवनव्यापक सकळ गे : ॥ छ ॥ हनुमंता भेटी : गर्व हरीला दोहींचा : गरुड वीटंबना : रुपा सत्यभामेच्या : ॥ २ ॥ द्रौपदीचा भेद पुरवीला समई : रुसी फळवणी देंठीं लावीतां ठाई : ॥ ३ ॥ अर्जुनाचे रथीं कपी स्थिर्वी ठेवीला : दोहीं पैजा गर्व तेथे हरी दाडुला : ॥ ४ ॥ भावभक्ती सत्वगुण : जाला दुर्जना : ॥ **तुका** म्हणे सकळां छदें : षेळे आपण : ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥

ळळीत १३१३

गळीत जाली काया : हें च ळळीत पंढरीराया : ॥ १ ॥ धृ ॥ आळें अवसानापासी : रुप धरीयेलें मानसी : ॥ छ ॥ वाईला कळस : येथे स्थीरावला रस : ॥ २ ॥ तुका म्हणे गोड जालें : नारायेणें पोट धालें : ॥ ३ ॥ छ ॥

तुळसीस्तोत्र व हिंदी पद लिहीणारे अन्य हि भिन्न आहेत.१८९ वें अर्धगान कोरें आहे. १९० व्या पानापासून नामदेवाचे १७ अभंग आहेत. ते १९४ अर्ध्या पानापर्यंत आहेत. पुढें एका जनार्दनाचे आहेत. ते १९५ च्या अर्ध्यापर्यंत आहेत. पुढें ४ ओळी अन्यलिखित तुकाराम अभंग असून पुढील पान कोरें आहे १९६ चें अर्ध पान कोरेंच आहे. पुढील अर्धावर 'वीठळ मुंढा' असा मथळा असून हिंदी पदें आहेत तीं.

१३१४

अवल नाम अला बडा : ले ते भुल न ज्याये : ईलाम त्याकालजमु-पर : तां ही तुंब बज्याये : ॥ १ ॥ धृ ॥ अला येक तु नबी येक तुं : ॥ छ ॥ काटते सीर पावों : हातें नहीं जीव उरायें आगले देषे पछिले बुझे : ॥ आपें हजुर आये : ॥ २ ॥ सब सवरी नच्याव म्याने : षडा अपनी सात : हात पावों रषते जबाब नहीं अगली बात : ॥ ३ ॥ सुनो भाई बाज्यार नहीं : सब ही नीरच्ये लाव : ॥ नंन्हां बडा नही कोये : येक ठोर मीलाव : ॥ ४ ॥ येक तार नहीं पयार : जीवतनकी आस : कहे तुका सो हि मुंढा : राषलीये पाये न पास : ॥ ५ ॥

१०७५ मुंढा

संबाल येरां उपर तल्हें : दोन्हों मारके चोट : नज(र)र करे सोही राष : पसुवा जावे लुट : ॥ १ ॥ धृ ॥ प्यार षुदाई प्यार षुदाई : प्यार षुदाई रे बाबा जीकीर षुदा [ व. पृ. १९७ ] ॥ छ ॥ उडे कुदे ढुंगा न च्यावे : अगले भुल न पयार : लडबड षडबड : का हे का षच्यलावे भार : ॥ २ ॥ कहे तुका च्येलो येका : हमें जीन्हों के सात : ॥ मीलावे तो उस्य यना : तो ही चढे गा हात : ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ २ ॥ छ

१३१६ मुंढा

तंम भज्याये तं बुरा : जीकीर ते करें : सीर काटे उर कुटे : तांहा सब डरें : ॥ १ ॥ धृ ॥ तांहा येक तुं हीं : ॥ तां हा येक तुं ही तां हा येक तुहीं रे बाबा हमें तुम्हें नही : ॥ छ ॥ दीदार देषो भुले नहीं कीस्य पस्याने कोये : सच्या न हीं पकडुं सके : झुटाझुटे रोवें : ॥ २ ॥ कीसे कहे मेरा : कीन्हों सात

लीया भास: ॥ नहीं मोलों मीले जीवना झुटा कीया नास: ॥ २ ॥ सुनो भाई कैसा तोही: होये तैसा होये : ॥ बांट षाना अला कन्हां: येक बारां तो हे ॥ ४ ॥ भला लीया भेष: मुढें अपना नफा देष : कहे तुका सोडी संका: हक अला येक ॥ ५ ॥ छ ॥ छ ॥ ३ ॥

१९७ वें अर्धे पान कोरें आहे.

१३१७: ॥ ळळीत:

[व. पृ. १९८] बहडवाळजन मन जालें नीस्चळ: चुकउनी कोल्हाळ: ॥ आला तुका: ॥ १ ॥ धृ ॥ प्रयेंकी नद्रा करावें शयेन: रषुमाई अ'पण: समवेत ॥ ॥ छ ॥ घेउनीयां आलों हाती टाळवींणा: सेवेसी चरणा: स्वामाचाया: ॥ २ ॥ तुका म्हणे आतां परीसांवी सादरें: बोबडी उतरें पांडूरगे: ॥ ३ ॥ छ ॥

ळळीत १३१८

मांचे गाण माझा जवळील ठाव : ॥ नीरोपीन भाव होईल तो : ॥ १ ॥ धृ ॥ तुम्हां नीद्रा मज अज्ञां तें स्वभावें : उतरुनी जीवें : जाईन लोण : । छ ॥ येकायेकी बहु करीन सुस्वरें : मधुरें उतरें : आवडीची : ॥ २ ॥ तुका म्हणे तुं ज(ग)दानी उदार फेडीसील भार : येका वेळें : ॥३॥ २

ळळीत १३१९

सीणलती सेवकां देउनी इछादाने : केला अभीमाने : अंगीकार: ॥ १ ॥ धृ ॥ आहो दीनानाथा आनंदमुर्ती : तुम्हांसी सोभती ब्रीदें यैसी : ॥छ॥ बहुतां वीनवीलें बहुतां प्रकारीं : सकळा ठांई हरी : पुरलेती : ॥ २ ॥ तुका म्हणे जी कुंटुंबवछळा : ॥ कोण तुझी लीळा जाणें यैसी : ॥ ३ ॥ छ ॥

ळळीत १३२०

अस्तुती करुं तरी नव्हे ची वेदां : ॥ तेथ माझा धंदा : कोणीकडे : ॥ १ ॥ धृ॥ परी हे वैषरी गोडावली सुषें : ॥ रसना रस मुषें : इछीतसे : ॥ छ ॥ रुप वर्णावया कोठे पुरे मती : ॥ रोमीं होती जाती : ब्रम्हांडें ही : ॥ २ ॥ तुका म्हणे तुं यैसा येक साचा : यैसी तवं वाचा: नाहीं जाली : ॥ ३ ॥ छ ॥ ४ ॥

१३२१ : ॥ ळळीत:

नामपाठ मुग्तांफळाच्या वोवणी: ॥ हें सुष सगुणी: अभीनव: ॥ १ ॥ तरी आम्हीं जालों उदास नीर्गुणा: भक्तांचीया मना: मोक्ष न ये: ॥ छ ॥ [व. पृ १९९] दयांवें घ्यांवें यैसा येथे उरे भव: काये ठायें ठाव: पुसुनीयां: ॥ २ ॥ तुका म्हणे आतां अभयेदान: करा म्हणा वीस्वंभरा : दील्हें तुज यैसें : ॥ ३ ॥ छ ॥ ५ ॥

लळीत १३२२

पावला प्रसाद : आतां उठुनी जावे : ॥ आपला तों श्रम कळे आपुलीया जीवें : ॥ १ ॥ धृ ॥ आतां स्वामी सुषें नीद्रा करा गोपाळा : पुरले मनोरथ जातों आपुलीया स्थळा ॥ छ ॥ तुम्हांसी जागउं आम्हीं आपुलीया चाडा : शुभाशुभ कर्मे : दोश वाराया पीडा : ॥ २ ॥ तुका म्हणे दील्हें उचीस्टाचें भोजन : ॥ नाही नीवडीलें आम्हां अपणीया भीन : ॥ ३ ॥ ६ ॥

१३२३ लळीत.

उठुनीयां तुका गेला निजस्थळा : उरले राउळा : माजी देव : ॥१॥ धृ॥ नीहुल जालें सेवका स्वामीत : अज्ञे करुन चीत समाधान : ॥ छ ॥ पहुडलीयावरी अनंत शयेनावरी : तेथे नाही उरी कांहीं कामें : ॥ २ ॥ अवघीं बाहेरी घालुन गेला तुका : सांगीतलें लोकां : निजेले देव : ॥ ३ ॥ छ ॥७



## टीप

तुकारामाच्या कवित्वाच्या संताजीनें लिहिलेल्या दोन वह्या मला मिळाल्या त्यांवरून ही गाथा (भाग १ पृ. १ ते १६९ व भाग २ पृ. १७० ते २६२) छापली आहे. सर्व पृष्ठें एक ठिकाणीं बांधून घेतां यावींत म्हणून पृष्ठांचा अनुक्रम दुसरे भागास निराळा न देतां एकंदर धांवता दिला आहे. अभंगांचा अनुक्रम हि तसाच धांवता ठेविला आहे. या पुस्तकाचे शेवटीं अभंगाची सूची देणें इष्ट आहे, व त्याप्रमाणें सूची तयार हॅ केली आहे. ती शेवटीं द्यावी असा प्रथम विचार होता. परंतु तुकारामाच्या अभंगांची संताजी जगनाड्यानें लिहिलेली आणखी तिसरी एक वही हातीं येण्याचा बराच संभव वाटूं लागला आहे. या करतां सूची देणें तूर्त तहकूब केलें आहे. तिसरी वही सुदैवानें हातीं आल्यास ती हि या दोहोंप्रमाणें च छापण्याचा विचार आहे. यावह्यांत असलेले अभंग या गाथेंत जसेच्या तसे च छापले आहेत. दुबार आलेले अभंग हि दुबार छापले गेले आहेत. ही गाथा छापतांना मूळाची नकल करण्याची व छापखान्याचीं प्रुफें तपासण्याची काळजी फार घेतली आहे. मुळांतील अक्षरें फार काळजीपूर्वक तपासून तशींच छापण्याचा यत्न केला आहे. पण इतकें हि करून चूक होणें शक्य आहे च. तरी अशा चुका फार क्वचित् आढळतील अशी खात्री वाटते. जेथें मूळ वहींत अक्षरें कागद फाटल्यामुळें नाहिशींच झालेलीं आहेत तेथें + + अशा फुल्या घातल्या आहेत. व कागद चोळवटून किंवा चुरगडून जेथें अक्षरें नीट लागलीं नाहींत, तेथें तीं जशीं लागलीं तशीं तीं कंसांत दिलीं आहेत. पण जेथें हा निर्णय मुळींच करितां आला नाहीं तेथें ? असें प्रश्नचिन्ह घातलें आहे. पृष्ठ १६९ वरील २ टीपेवरून पहिल्या भागांत 'ल' बद्दल 'ळ' असें अक्षर–चिन्ह व 'ळ' बद्दल 'ळ' असें अक्षर–चिन्ह मूळ वहींत नाहीं, असें ध्वनित केल्याचा भास होतो, पण तसा प्रकार नाहीं. दोन्ही वह्यांत 'ल' बद्दल 'ळ' व 'ळ' बद्दल 'ळ' अशीं च चिन्हें आहेत. दोन्ही वह्यांचें लिखाण अगदीं एक धाटणीचें आहे.

